राष्ट्रीय ग्रंथ प्रकाशन—पहिले

# जानपद आणि अतिमानव.

ले.—द. मा. देशमुख.

---

संपादक व प्रकाशक :

द. ग. देशपांडे,

जाफ्राबादकर B. A., LL. B., वकील, औरंगाबाद

संचालक : राष्ट्रीय ग्रंथ प्रकाशन मंडळ.

नागपूर व औरंगाबाद.

---

प्रथमावृत्ति १००० ] मूल्य रु. २॥ [ इ. सन १९४६

मिती श्रावण शु. १ ते भाद्रपद शु. १ शके १८६७ ता. २ मेहेर ५४ क

पासून ते ता. २ आबान ५४ क पर्यंत क्रमशः

श्री. द. मा देशमुख

यांनी स्वमुखानें सांगितल्या प्रमाणें

श्री द. ग. देशपांडे

[illegible] यांनी लिहून काढलें असें.



मुद्रक:—

पु. रा. खांडवेकर,

बी. एस्सी., एल्.एल्. बी.,

मॅनेजर

गोपाल प्रिंटिंग प्रेस,

महाल, नागपूर.



कै० श्री. बाबासाहेब देशमुख, संस्थापक विदर्भ मिल्स

या पुण्यश्लोक महाभागाचे चरणी आमची स्मृतिरूप श्रद्धांजली अर्पण असो.

## मुद्रणानंतर

राष्ट्रीय ग्रंथ प्रकाशन मंडळाचा उपक्रम विशेषतः प्रस्तुत ग्रंथ पसंत पडून एलिचपुरचे सुविख्यात दानवीर श्रीमंत नानासाहेब देशमुख यांनी उदार अंतःकरणानें मुद्रण व्ययसहाय म्हणून रु. ५०० देणगीदाखल दिले याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहो. श्रीमान ती. स्व. दादासाहेब पार्डीकर यांचे समयोचित प्रोत्साहन व सहाय्याचे जेवढे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

विशेष लिहीण्यासारखे स्थित्यंतर हे की द. मा. देशमुख यांनी जानेवारी १९४६ पासून वकीली सोडली असून सर्वस्वी हिंदुराष्ट्र व धर्माच्या सेवेस वाहून घेतले आहे.

—संपादक

# संपादकीय

अनेक वर्षांच्या दीर्घ परिश्रमानंतर श्रीमान् द. मा देशमुख यांचे कडून त्यांच्या विशिष्ठ मतप्रणालीचे सूत्रमय दिग्ददर्शन करणारा एकदां ग्रंथ लिहून घ्यावा ही आमची महत्त्वाकांक्षा आज ईशकृपेनें फलद्रुप झाली आहे याबद्दल आम्हाला सानंद अभिमान वाटतो. महाराष्ट्रांतील सर्वसामान्य वाचकास सुबोध होईल असा सविस्तर विवेचन असलेला नि सोप्या भाषेत लिहिलेला ग्रंथ वाचकांच्या हातीं पडावा अशी आमची बरीच इच्छा होती. परंतु विषय अति गहन व संपूर्ण जागतिक इतिहासाचें क्षेत्र दृष्टीसमोर ठेवून अति उंच पातळीहून केलेले समीक्षण, सूक्ष्म, भेदक नि शास्त्रोक्त तर्कवादानें केलेले विचार मंथन यांनीं ओतप्रोत भरलेली सुसंस्कृत भारदस्त भाषाशैली व या सर्वांहून अधिक म्हणजे हजारों पृष्ठें भरेल एवढा मजकूर अगदीं थोड्या जागेंत सूत्ररूपानें ग्रथित केला असल्यानें ग्रंथाची दुर्बोधता टाळता येणें लेखकास अशक्य झाले असावे असे दिसते. श्री. देशमुख यांच्या निकट सहवासाची भाग्यशाली संधी आम्हास गेल्या दहाबारा वर्षांपासून लाभली व ह्या अवधींत त्याचे समग्र तत्त्वज्ञान ऐकून स्वत: पूर्णपणें समजून जरी घेता आले नाहीं तरी त्याचें अत्यंत व्यापक विशाल नि भव्य स्वरूप आमच्या लक्षात आल्यावाचून राहिलें नाहीं. आजवर ह्यांची शेकडों व्याख्यानें व प्रवचनें निरानिराळ्या विषयांवर महाराष्ट्रांतील निरनिराळ्या शहरांतून झाली. त्यांच्या स्वयंस्फूर्त व ओजस्वी वक्तृत्वातून जे अमोलिक तात्त्विक विचार वेळोवेळीं प्रगट होतात ते सर्वत्र एकत्ररूपानें उपलब्ध होतील अशी योजना आम्ही करीतच आहोत. आज फक्त त्यांच्या तत्त्वज्ञानांतील राज्यशास्त्र विषयक एका प्रमुख सिद्धां-

तार्चे दिग्दर्शन करणारा ग्रंथ वाचकासमोर ठेवण्याची संधी प्राप्त झाली आहे. प्रस्तुत ग्रंथांत फक्त सिद्धांताचीच मांडणी केली आहे. त्यांचे सोपपत्तिक विवेचन केलेले नाहीं. ऐतिहासिक घटनांची उदाहरणें प्रमाणादाखल दिली नसून नमुन्यासाठीं लेखनाच्या ओघात आलेली आहेत. लेखकाचा समग्र ग्रंथसंग्रह प्रसिद्ध झाल्यावरच त्यांच्या तत्त्वज्ञानाचे सम्यग्दर्शन घडूं शकेल हे उघडच होय. राज्यशास्त्रात Theory of State व समाजशास्त्रांत समाज–विकास नि समाजिकरणाचे अंतिम ध्येय, तसेंच तत्त्वज्ञान नि नितिशास्त्र यातील जीवन–हेतु–विषयक प्रश्न या संबंधी नव्या दृष्टिकोनानें सुसंगत तत्त्व–प्रणालीच्या रुपांत निश्चित सिद्धात सागणारा मराठींतील हा पहिलाच ग्रंथ होय. लेखकाची मूलगामी विचारसरणी ही खरोखरच आश्चर्यजनक आहे. हिंदुस्थानच्या प्रातकालीन राजकीय परिस्थितींत मार्ग-दर्शक होईल असे बरेंच या ग्रंथांत सांपडण्याजोगे आहे. गेल्या षडवार्षिक महायुद्धानंतर जगातील सर्व राष्ट्रांची आर्थिक नि राजकीयदृष्ट्या जी आगतिक परिस्थिति झाली आहे व एव्हवीच विसाव्या शतकांतील प्रचंड वैचारिक आंदोलनानी शतकानुशतक निश्चित सिद्धांत म्हणून उराशीं बाळगलेली जीवनधारा अशी शेंकडों नैतिक मूल्ये मातिमोल ठरून व्यक्ति जीवनाचा आणि समाज जीवनाचा पायाच हादरल्यासारखी अवस्था अखिल मानव जातीची झाली आहे. अशा प्रसंगी प्रस्तुत ग्रंथांत मांडलेली क्रांतिकारक विचारसरणी केवळ भरतखंडातच नव्हे तर अखिल जगतात युगप्रवर्तक ठरण्याचा संभव आहे. श्री. देशमुख यानी प्रस्थापित केलेल्या राजकीय सिद्धांतासंबंधीं इष्टानिष्ठ कांहीं लिहिण्याचा आमचा अधिकार नाहीं म्हणून त्यांच्या मत–प्रणालीसंबंधीं कसलेंहि मत आम्ही प्रगट करूं इच्छित नाहीं. शास्त्रीय तर्कवादानें व जागतिक इतिहासाच्या नि सर्व शास्त्राच्या सहाय्यानें आपली मतप्रणाली सिद्ध करून दाखवूं असा ग्रंथकर्त्यास आत्मविश्वास आहे. विद्वानांची मान्यता अथवा कालाचा निर्णय यापैकीं कोणत्या तरी निकषावर त्यांच्या मूलगामी विचारसरणीचें मोल ठरो अशी आमची इच्छा आहे.

लवकरच हिंदी व इंग्रजी भाषेंतून या ग्रंथाची भाषांतरे प्रसिद्ध होणार आहेत. तेव्हांच या ग्रंथास हवा तसा वाचकवर्ग मिळून त्याचे योग्य ते चीज होईल. या ग्रंथास अर्थवाहक टिपा नि संदर्भविवेचन करणारी पुस्ती जोडावी असा आमचा मानस होता. पण आहे या स्वरुपांतच ग्रंथाची पहिली मराठी आवृत्ति प्रसिद्ध करण्याच्या लेखकाच्या हट्टामुळें आमचा निरुपाय झाला. प्रस्तुत ग्रंथांत अनेक रूढ शब्दांचा विवक्षित अर्थच लेखकास अभिप्रेत आहे; उदाहरणार्थ 'संस्कृति' हा शब्द थेट इंग्रजी Calture या शब्दाच्या अर्थानेंच उपयोगिला आहे. वास्तविक Mathew Arnold या इंग्रजी लेखकानें Culture वर सविस्तर व्याख्यान केले आहे त्यावरून वाचकास या अर्थाची खरी कल्पना येईल. परंतु रूढ मराठींत मात्र 'संस्कृति' हा शब्द Culture नि Civilization या दोन्ही अर्थानें अत्यंत अशास्त्रीयरीत्या वापरल्या जातो. ग्रंथकर्त्यांच्या मतें विशिष्ठ समाजाचें संकलित चारित्र्य, शील, नि निरपेक्ष नीतिशास्त्र-दृष्टया त्यांची मनोभूमिका यावरूनच त्या समाजाचा सांस्कृतिक दर्जा निश्चित करावयाचा असतो, त्यामुळें 'संस्कृति' हा तत्वज्ञान अगर संघमानसशास्त्र यांतील पारिभाषिक शब्द म्हणूनच या ग्रंथात सर्वत्र आलेला आहे.

आमच्या मतें ग्रंथाचा यापेक्षां अधिक परिचय करून देणें आम्हांस शक्य नि इष्ट नाहीं. ग्रंथकर्त्यांचा अल्पपरिचय महाराष्ट्रीय वाचकांस करून दिल्यानें आम्ही आमचे कर्तव्य बजावले असे होईल.

श्रीमान् द. मा. देशमुख हे हैद्राबाद संस्थानांतील मुदखेड या गांवचे रहिवाशी. यांचे घराणे त्या भागांत प्रख्यात आहे. मॅट्रिकच्या वर्गांत असतांना वयाच्या १४ व्या वर्षी इंग्रजी भाषेंत 'Fragrant Flowers या नांवानें एक कविता - संग्रह त्यांनीं लिहून प्रसिद्ध केला त्याची कविवर्य रविंद्रनाथ टागोर वगैरेंनीं मुक्तकंठानें स्तुति केली.

बी. ए. ला असतांना निरनिराळ्या सामाजिक, धार्मिक नि वाङ्मयीन विषयांवर व्याख्यानें देऊन हैद्राबाद येथील जनतेस त्यांनीं आपल्या ज्ञानाचा लाभ दिला. याच सुमारांस त्यांनीं आपल्या विशिष्ट राजकीय मतसांप्रदायाचा पुरस्कार आणि प्रचार प्रारंभ केला. कांहीं फुटकळ लेख, मराठी, हिंदी व उर्दू कविता, 'समाजजीवन नाटक' व 'कालाच्या ओघांत' हे वैचित्र्य - दर्शन ( Variety show ) एवढे वाङ्मयीन लिखाण त्यांनीं पार पाडले. एल्एल्. बी. च्या अंत्यवर्षी उस्मानिया विद्यापीठातील वंदेमातरम् चळवळीत प्रामुख्याने पुढाकार घेऊन सर्व विद्यार्थ्यांना घेऊन नागपूर येथे ह्यानीं प्रयाण केले. भागानगर निःशस्त्र प्रतिकार या चळवळींत मध्यप्रांत व वऱ्हाड या भागात हिंदुसभेचें प्रचार-कार्य जोमानें केले. याच वेळेस अनेक ठिकाणी लोकानीं स्वयंस्फूर्तीनें दक्षिण सावरकर, बालसावरकर व हैद्राबाद सावरकर या नांवानें त्याचा गौरव केला. 'भागानगर हिंदूंची हांक' हे सरकारी हुकुमान्वये जप्त झालेले पुस्तक याच काळात ह्याच्या लेखणीतून उतरले व नागपूर हिंदु सभेने ते प्रसिद्ध केले. इ. स. १९३९ मध्ये औरंगाबाद येथे वकिलीस सुरवात केली व एक प्रथितयश वकील म्हणून लौकिक संपादिला. 'मराठी भाषेचे पुनरुज्जीवन' या विषयावर ह्याचे नांदेड येथें झालेले व्याख्यान रुपाने प्रसिद्ध झाले आहे. लवकरच वकीलीचा धंदा कायमचा सोडून सार्वजनिक कार्यास सर्वस्वी वाहून घेण्याचा ह्यांचा मानस आहे.

अलौकिक बुद्धिमत्ता व अभिजात प्रतिभा, इंग्रजी, उर्दू, मराठी व हिंदी या भाषावर सारखेच प्रभुत्व, अगाध विद्वत्ता आणि बहुतेक सर्व शास्त्रांचा गाढ व्यासंग या सर्व गुणानी श्री. देशमुख यांचे व्यक्तित्व मोठमोठ्यांनाहि सहज दिपविण्यासारखे आहे. आपल्या विद्वत्ताप्रचुर, अस्खलित, ओजस्वी नि प्रभावशाली वक्तृत्वाच्या बलावर हजारो लोकास आपल्या चतुरस्त्र बुद्धिमत्तेनें नि तर्कशुद्ध विचारसरणीनें आकृष्ट करून

घेण्याची ह्यांची शैली अवर्णनीय नि अलौकिक आहे याची पूरेपूर कल्पना मध्यप्रांत, वऱ्हाड, मराठवाडा व पुणेप्रांत यांतील जनतेस आहे. निरनिराळ्या ठिकाणीं त्यांच्या व्याख्यानांतून प्रगट होणाऱ्या अभूतपूर्व नि क्रांतिकारक मतप्रणालि संबंधीं वादविवाद करण्यासाठीं येणारे विरोधक पांच सात मिनिटांतच विरोधाची भूमिका सोडून विनम्र श्रोत्याची भूमिका स्तब्धपणें स्विकारीत शेवटी समाधानानें परत जातात असा आश्चर्यकारक प्रकार आम्हांस अनेकवार अनुभवण्यास सांपडला.

वयाच्या दहाव्या वर्षापासून त्यांना वाचन नि मननाचें जणूं व्यसनच लागले होते. चाऱ्ही भाषेंतील ललितवाङ्मय, इतिहास, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान, तौलनिक प्राचीन पुराण शास्त्र व वैदिक धर्मसांप्रदायाचा तुलनात्मक विचार करून त्यांनी सखोल अध्ययन केले आहे. भौतिक शास्त्राची बाजूहि पण मागें पडूं दिली नाही. अल्पवयांत एवढें अफाट वाचन करणारा, कुशाग्र बुद्धि, अचाट स्मरणशक्ति, उत्पादक मननपद्धति आणि सहृदय अंतःकरणाचा त्यांच्यासारखा विद्वान वास्तविक दुर्मिळच. आपल्या प्रचंड बुद्धिवैभवाला साजेल असेच चारित्र्य, धैर्य नि तेजस्वी ध्येयनिष्ठा त्यांच्या अंगी आहे हे साभिमान सांगावेसे वाटते.

लवकरच त्यांचे "अभिनव भारताचें राजकीय तत्त्वज्ञान", 'महाभारतीय तत्त्वज्ञान' 'उर्दुभाषेंतील प्रेमकाव्य,' 'व्याख्यान संग्रह' नि 'काव्यविलास' इत्यादि ग्रंथ संपादित करण्याची सुसंधी आंम्हास लाभेल अशी आशा आहे.

हा ग्रंथ श्री. आर्यश्रेष्ठ देशमुख याचे कडून लिहविण्याचें काम आमच्या दृष्टीनें अतिशय कठीण होते. स्वाभाविक आळस, कार्यबाहुल्य, वेळेचा अभाव व लेखनकार्याचा कंटाळा इत्यादि गुणामुळें त्यांच्याकडून प्रस्तुत ग्रंथाचें काम करून घेणें अशक्य प्राय झाले असते. श्री. भुजंगराव साहेब कुळकर्णी, एम्. एस्. सी., श्री. माधवराव साहेब नांदेडकर, बी. ए.

एल्एल्. बी. नांदेड, श्री. मारुतरावजी जोशी, बी. ए. एल्एल्. बी. पींप्रीकर, श्री. कविराज ल. घ. आळे, श्री. रावसाहेब शं. ना. देशपांडे रांजणीकर, श्री. बापुसाहेब दहिभाते जमीनदार विटे, या प्रेमळ हित-चिंतकांनीं वेळोवेळीं मीड खर्च करून आमच्या चिकाटीस पाठिंबा दिला व सर्वांत विशेष म्हणजे श्री. सौ. सुमित्रादेवी देशमुख यांनी आपल्या प्रेमळ आग्रहानें त्यांना कार्यप्रवृत्त केले व आम्ही समग्र ग्रंथ त्यांच्या सांगण्याबहरहुकूम लिहून काढण्याचें काम स्वीकारले तेव्हांच हा सुयोग जुळून आला. आम्ही उपरिनिर्दिष्ट सर्व महाजनांचें मनःपूर्वक आभारी आहोत. याशिवाय श्री. मूर्लीधरराव साहेब घाणेकर एम्. ए., श्री. डॉ. पी. जी. विटकर हैद्राबाद, श्री. धर्मवीर यशवंतराव जोशी कार्यवाह हैद्राबाद संस्थान हिंदुसभा, श्री. वीर स. र. कुर्वलकर, श्री. खेडकर, श्री. डॉ. आर. डी. देशपांडे बायोकेमिस्ट औरंगाबाद व श्री. प्राध्यापक वि. घ. देशपांडे एम्. ए. चिटणविस, अखिल भारतीय हिंदुसभा दिल्ली, यांनीं वेळोवेळी जें अमोल सहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

| | |
|---|---|
| औरंगपुरा - ओरंगाबाद | द. ग. देशपांडे जाफराबादकर, |
| मि० चैत्र १ शु. शके १८६७ | बी. ए. एल्एल्. बी., हायकोर्ट वकील. |



ॐ ॥

卐

# जानपद आणि अतिमानव

**मानवीसमाज संस्थापनेपासून तों आजतागायत समाज-विकास** नि समाजांतर्गत उलाढालींचा इतिहास यांचें सूक्ष्म परीक्षण केल्यास आपणांस ही गोष्ट ताबडतोब आढळून येईल कीं मानवी समाजाच्या उत्कर्षाचा इतिहास हा निव्वळ द्वंद्वाचा अगर कलहाचा इतिहास होय. मग या द्वंद्वाची मांडणी करतांना **हेगेल** सारखा एखादा तत्त्ववेत्ता डायलेक्टिक मेथडच्या स्वरूपांत ती प्रगट करो अथवा मानवी समाजांतील भिन्न भिन्न वर्गाच्या कलहाचा रंग चढवून भौतिक वादावर ज्याचा पाया आधारलेला आहे आणि ज्याचें शिखर अनाकलनीय अशा भविष्यवादाच्या अंतराळांत लोंबत आहे अशा इमारतीच्या स्वरूपांत एखादा **कार्लमार्क्स** त्याची उभारणी करो. पण एवढें मात्र निश्चित कीं या कलहाला अथवा द्वंद्वाला असली कोणतीही एकांतिक बाजू नसून निसर्ग आणि मानव, मानव आणि मानव, समाज आणि समाज नि व्यक्तिगत प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत सहस्रावधि परस्पर विरोधी भावना नि कल यांच्या अंतर्गत नि बहिर्मुख अशा सहस्रामुखी कलहाचें भव्य नि व्यापक स्वरूप त्या कलहाचें आहे ! एका खासगी माणसाच्या आयुष्याला सुद्धां अनेक बाजू असतात नि एका किरकोळ माणसाचा स्वभाव सुद्धां मानस-शास्त्रवेत्त्यांना गुंतागुंतीचे कोडें वाटूं शकते तर कोट्यवधि मानवाच्या

परस्पर संघर्षानें निर्माण होणाऱ्या जागतिक उलाढालींचा इतिहास, एकरंगी कल्पनेनें रंगवून त्यांतून सूत्रमय असें एकच तत्त्व निघतें असें सांगणें धाडसाचें होईल. या सहस्त्रावधि द्वंद्वापैकीं ज्या एका द्वंद्वानें जगाचा इतिहास प्रामुख्याने घडविला आहे नि आजहि घडत आहे त्या द्वंद्वाविषयीं आपणांस विचार करणें आहे. आमच्या मतें हें द्वंद्व म्हणजे अखिल मानवीसमाज नि जगांतील महान् वीर पुरुष यांच्या आपसांतील ओढाताणीचा खेळ होय. समुद्रावर उठणाऱ्या असंख्य लाटा वाऱ्याच्या धक्कयामुळें असो अथवा स्वयंस्फूर्तीने असो सतत उंच उंच उसळ्या मारीत नि लांब लांबची झेंप टाकीत किनाऱ्याकडे धांव घेण्याचा प्रयत्न करतात. पण दुर्दैवानें त्यापैकीं एकहि लाट किनाऱ्यापर्यंत येऊन पोंहोंचूं शकत नाहीं. अहोरात्र समुद्राच्या छातीवर तांडवनृत्य करणाऱ्या ह्या लाटा वायुची स्फूर्ति अंगांत संचरल्या बरोबर भोंवतालच्या लक्षावधि जलबिंदूंना आपल्याशीं संबद्ध करून आकाशांत उंच उडी मारतात. पण हवेचा दाब समपातळीवर राहण्याचा पाण्याचा णधर्म नि शेंकडों फूट खोल लपलेल्या पृथ्वीमातेचें आकर्षण या योगें शतशः विदीर्ण होऊन ती लाट खालीं कोसळते नि आसमंतांतील पाण्यांत दडी मारून सागराच्या अथांग जळाशीं एकरुप होऊन जाते. वाऱ्यानें निर्माण केलेल्या महत्त्वाकांक्षा पाण्यांत विरून जातात. किनाऱ्याचें बांध तोडून स्वैरपणें पृथ्वीवर आपलें साम्राज्य पसरविण्याच्या ईर्षेने एकापेक्षां एक मोठ्या असंख्य लाटा निर्माण होऊन किनाऱ्याकडे धांव घेतात, प्रत्येक मागील लाट शक्तिक्षया बरोबर विरून जातां जातां पुढच्या लाटेला धक्का देऊन पुढें लोटते पण ती सर्व शक्ति, अथांग विस्तार नि अपरंपार साठा (volume) असलेल्या त्या जलाशयावर खात्रीलायक परिणाम घडून आणण्यास अपुरी पडते. पण सरते शेवटीं एक दिवस असा येतो कीं जें काम चंचल वायूच्या

लाटांनी साध्य झालें नाहीं तेंच पृथ्वीच्या आकर्षणावरहि मात करणारा चंद्रमा आपल्या वर्धिष्णु नि जयिष्णु सहस्त्रकराचें जाल समुद्रावर फेंकून किनाऱ्याच्या बंधनांत तळमळणाऱ्या त्या लाटांना बलतेजाची भरती आणून बंधमुक्त होण्याची संधी आणून देतो.

मानवी समाजाच्या इतिहासाचेंहि असेंच आहे. प्रत्येक मनुष्य आपलें खासगी जीवन जगतां जगतां अखिल मानव जातीच्या विकासाची नि प्रगतीचा गाडा पुढें सरकविण्याची नकळत कां होईना पराकाष्ठा करीत असतो. पण हे असले प्रयत्न लक्षावधि मानवाकडून सहस्त्रवधि वर्षे पर्यंत सतत चालू राहिले असले तरी सुद्धां प्रगतीच्या मार्गावर मानवजातीचें पाऊल एक इंच सुद्धा पुढें पडलें नसतें. अमावस्येच्या रात्री उगवणाऱ्या कोट्यवधि ताऱ्यांनीं तिमिराचा नाश होत नाहीं पण प्रतिपदेच्या दिवशीं उगवून पंधरा दिवस वाढत जाणाऱ्या चंद्राचें तेज मात्र रात्रीचा दिवस करून टाकण्यास पुरें पडतें तद्वतच विश्वाच्या अथांग सागरांत असहाय्यपणें मोकाट सुटलेलें हें समाजाचें तारूं निसर्ग लहरींवर नाचत प्रलय-कालपर्यंत जिथल्या तिथंच राहिलें असतें. पण अनंताच्या पोकळींतून स्फूर्त होऊन त्याला सतत धक्के देऊन मार्गदर्शन करणाऱ्या वाऱ्या-नेंच त्याला ध्येयाच्या मार्गावर लावलें आहे. स्थिरता आणि गति यांच्या विरोधांत गतीचा अल्पांशानें क्षय होऊन स्थिर वस्तु गतिमान् होतात. सत् आणि असत् यांच्या झगड्यांत सत्याचें तेज कमी होऊन असत् उजळूं लागते. अंधाराचा नाश करतां करतां सूर्याचें प्रखर तेज सुद्धां उषेच्या सौम्य स्वरूपांत सृष्टीला दृग्गोचर करूं लागतें त्याप्रमाणेंच हा दुर्बल मानवी समाज सहस्त्रावधि वीरश्रेष्ठांच्या शक्तीचा क्षय करीत करीत स्वतः हळूंहळूं उत्कर्षाप्रत जात आहे. जगांत आजवर जेवढ्या म्हणून थोर विभूति होऊन गेल्या त्या सर्वांचें

आयुष्य म्हणजे मानवी समाजांत सदैव चालणाऱ्या एका महान् झगड्याचें प्रतीक होय. मनुष्यमात्राला अज्ञानाकडून ज्ञानाकडे, अंधाराकडून प्रकाशाकडे, दुर्बलतेकडून सामर्थ्याकडे नि हीनत्वाकडून श्रेष्ठत्वाकडे नेण्याकरतां जे जगद्व्यापी प्रयत्न आजपर्यंत जगांतल्या वीरपुरुषांनीं केले त्यांचा इतिहास लिहिला म्हणजे सबंध जगाचाच इतिहास लिहिल्या सारखें होईल. आहार निद्रा भय मैथुनंच इत्यादि नित्यकर्म करणाऱ्या बहुजन-समाजाच्या हजारों वर्षांचा इतिहास मात्र चार ओळींतच आटोपतां येईल. हजारों वर्षांपूर्वी नग्नावस्थेंत भक्षाच्या शोधार्थ रानांवनांतून भटकणाऱ्या हिंस्रश्वापदाला विसाव्या शतकांतलें मानवी समाजाचें भव्य नि व्यापक स्वरुप आणून देण्यास केवळ मानववंशसातत्य नि सृष्टिक्रम हे कारणीभूत झाले नसून समाजांत क्रांतीचें चैतन्य उत्पन्न करून आपल्या दिव्य स्फूर्तीच्या प्रकाशांत पुढील दोन दोन तीन तीन शतकांचा मार्ग समाजाला स्पष्ट दिसेल अशी योजना आंखणाऱ्या आणि समाजांतील दुर्बलतेचा नाश करण्यां-करतां आपल्या अतिमानवी सामर्थ्यानें क्रांति आणि रक्तपात यांच्या सहाय्यानें समाजाला दूर खेंचीत नेणाऱ्या महाभागांनीं जगांतील सर्व उलाढालींचा इतिहास घडविला आहे. **कार्लाइलनें** Heroes and Heroworship या पुस्तकांत जगांतील थोर विभूतींना मानवी संस्कृतीच्या उत्कर्षमार्गावरील miles stones ची उपमा दिली आहे. पण जरा खोल दृष्टीनें विचार केल्यास हे miles stones नसून समाजानें आंधळ्या आत्मघातकी प्रवृत्तीच्या भरांत ज्या महाभागांचें खून पाडले त्यांच्या थडग्यावरील स्मारकें म्हणूनच त्यांचा उल्लेख करावा लागेल. अगदीं प्राचीन काळांतील अवतारी पुरुषापासून तों थेट आजच्या काळां तील हिटलर मुसोलीनी पर्यंत सर्वांना समान असेंच हे वर्णन आहे. या दु:खपर्यवसायीं घटनांची कारणमिमांसा आपणांस करावयाची आहे.

जगांतील थोर विभूतींच्या तेजस्वी सद्गुणांत जरी त्रिकाला-बाधित साधर्म्य दिसत असलें तरी सर्वांचें कार्य मात्र भिन्नभिन्न स्वरूपाचें आहे. शांत विहिरींत खडा टाकून कोमल आणि सुंदर तरंग—लहरी निर्माण व्हाव्या तद्वतच् आपल्या ललितकलेनें लोकांच्या अंत:करणांत गुदगुल्या उत्पन्न करणारा कलावंत आपल्या भोंवतालच्या जडविश्वांत रम्य निसर्गाचें चैतन्य कसें खेळत आहे हें निदर्शनास आणून देतो. कांता सम्मित तयोपदेशयुजे अशा सुरम्य कलेचा आश्रय घेऊन भौतिक जडवादाच्या निस्वार्थी व्यवहारिक जीवनाच्या कक्षेचा भेद करून या पार्थिव वैभवापेक्षांहि उदात्त नि श्रेयस्कर असलेल्या सत्य, सुंदर नि भावनामय सृष्टीचें दर्शन या जगताला घडवून देतो. जीवनांत जगण्यासारखें कांहीं आहे एवढेंच नव्हे तर जीवनापेक्षांहि ज्या करतां मरावें असें जगांत कांहीं आहे हें शिकविणारा धर्मोपदेशक व्यास पीठावरच दिसतो असें नव्हे तर शारदेच्या मंदिरांत सुद्धां आढळून येतो. झंझावाता-प्रमाणें अज्ञात ठिकाणाहून निघणारा नि अनेक वावटळी निर्माण करून धूळ कचरा आणि जें जें कांहीं टाकावू असेल तें वाहून नेत निसर्गाचा क्रम मानवा करतां क्रांतिरूप करणारा सोसाट्याचा वारा ज्याप्रमाणें उत्पात करतो त्याप्रमाणें चमत्कार करणारा क्रांतिकारी चळवळीचा पुरस्कर्ता जगांतल्या प्रत्येक देशांत निर्माण झाला. समुद्रावर हजारों वादळें निर्माण करणारा वरुण देवाच्या शक्तीला हिनविणारा नि समुद्राच्या पाठीवर डौलानें मिरविणाऱ्या मानवी प्रयत्नाचे विजय चिन्हच अशा शेकडों नौकांना रसातळीं नेणारा वायु ज्याप्रमाणें निसर्गाचें भेसूर स्वरूप प्रगट करतो त्याप्रमाणें दुर्दमनीय नि कधींहि तृप्त न होणाऱ्या महत्त्वाकांक्षा नि वैभवलालसा यानें उन्मत्त होऊन जगाच्या राजकारणांत क्रांतीचें लोट उसळविणारे

वीरश्रेष्ठहि कांहीं कमी झाले नाहींत. आजन्म पोटासाठीं जगणाऱ्या कृमिकीटकांप्रमाणें ज्यांचें आयुष्य शतकानुशतक चालत आलें अशा लोकांना उच्च ध्येयाची स्फूर्ति देऊन निसर्गाशीं युद्ध करण्याला सज्ज झालेल्या मानव सैन्याच्या शिस्तीनें सुसंघटित समाजाच्या स्वरूपांत उभें करून शक्ति, वैभव नि यश हें मिळवून देणारा, नवे तत्त्व, नवी संस्कृति व नवे जीवन यांचा प्रचार साऱ्या जगांत करण्याकरतां एका विशिष्ट मानववंशाची जगद्व्यापी विजिगिषुलाट साऱ्या जगभर फैलावणारा **शिकंदरहि** प्रत्येक मोठ्या राष्ट्राच्या इतिहासांत होऊन गेला आहे. तरवार गाजविणारा **सीझर**, उदात्त तत्त्वज्ञान सांगणारा **सॉक्रेटीस**, उत्कृष्ट कला निर्माण करणारा **रॅफेल** आणि क्रांतिकारक तत्त्वांची स्फूर्ति, दुर्बल, हताश निस्त्रैण झालेल्या समाजास देऊन त्यांच्यांत चैतन्य निर्माण करणारा **रूसो** अथवा **कार्लमार्कस** अथवा आपल्या हिंदुस्थानांतील उदाहरणें द्यावयाची तर शिवाजी, आर्यचाणक्य, समुद्रगुप्त, कालीदास, भवभूति, बाजीराव पेशवा ( पहिला ) अशीं अनेक नावें सांगतां येतील. यांपैकीं प्रत्येकाच्या कार्यांत विजेची चमक आणि अग्नीची प्रखरता या बरोबरच उषःकालचें वैभव नि संध्याकालचें सौंदर्य ही आपणांस दिसून येतात. पण आपणांस ज्या गोष्टीवर विचार करावयाचा आहे ती म्हणजे त्यांच्या समकालीन जगानें त्यांच्याशीं कशा प्रकारचें वर्तन केलें आणि त्यांच्या नंतरच्या निकटवर्ती कालांत त्यांच्या कार्याचा काय परिणाम झाला ही होय. या दोन गोष्टींचा आढावा आपण घेतला म्हणजे चार पाऊलें पुढें नि दोन पाऊलें मागे अशा ओढाताणीच्या स्वरूपांत समाज विकासाचा इतिहास कसा घडला हें आपणांस समजून येईल.

मनुष्यमात्राच्या सामाजिक स्वभावाचें प्रमुख अंग म्हणजे

त्याचा स्थिरत्वाचा गुण होय. कोणत्याहि देशांतील समाजास सर्वांत जास्त तिटकारा परिवर्तनाचाच असतो. आपली पातळी कायम ठेवण्याचा जसा पाण्याचा गुणधर्म आहे तसेंच सर्व साधारण समाजाला एक उपजत ओढ या गोष्टीची लागलेली असते कीं आहे या स्थितींत बदल होऊं नये, आहे या स्थितींतच कोरूनकारून सुखाचा आभास निर्माण करावा नि त्यांत आनंद मानून घेऊन आपलें रूढीनुसार चालत आलेलें जीवन जगावें. समाजाच्या विषम रचनेमुळें अथवा योगा योगानें ज्यांना जीवनोपभोगाचीं अनेक साधनें उपलब्ध आहेत अशा लोकांची ही प्रवृत्ति असणें सहाजिक आहे. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे ही कीं दारिद्र्य, दुर्दैन्य, दुःख यांनीं युक्त अशा मानरहित अवस्थेंत ज्याचे आयुष्यक्रम चालले आहेत अशांना सुद्धां परिवर्तनाची भीति वाटते. विहिरीच्या कांठावर उभे राहून पाण्याकडे पाहाणाऱ्या पटाईत पोहणाराला सुद्धां पाण्याच्या बुडाशीं काय आहे या संबंधीच्या नुसत्या अज्ञानामुळें किंवा संशयामुळें एकक्षण मात्र कां होईना पण भीति वाटतेच. अंधाऱ्या काळोखीची भीति वाटत नाहीं असा कोण आहे ? मरणानंतर काय असतें हें जर नक्की माहित असतें—आणि ज्यांना माहित असते त्यांना सुद्धां आपल्या माहितीची खात्री वाटत नाहीं——तर मरणाला भिणारांची संख्या बरीच कमी झाली असती. ज्ञाताकडून अज्ञाताकडे जाण्याचा मार्ग हा निःसंशय प्रगतीचा मार्ग आहे हे माहित असून सुद्धां नि ज्ञाताचें क्षेत्र अत्यंत मर्यादित नि अपूर्ण आहे याची वेळोवेळीं खात्री पटत असून सुद्धां बहुजन समाजाचा नित्य कल नेहमींच जिज्ञासा आणि संशय यांना प्रतिरोधक असतो. परवशतेचा नि सांस्कृतिक अधःपाताच्या खोल गर्तेत कुजत पडलेल्या राष्ट्रांना सुद्धां क्रांतीनंतर जन्माला येणाऱ्या नव्या सामाजिक जीवनाची भीति वाटते याच्याहि

बुडाशीं बहुजनसमाजाची स्थिरत्वाची ओढच कारणीभूत आहे. एवंच स्थिरत्व, जडत्व, गतानुगतिक जीवन चैतन्य रहित अवस्थेंत जगण्याचा मोह या शिवाय बहुजनसमाजाला अनादिकाला पासून जडलेला महान् रोग म्हणजे आपणापेक्षां कांहीं निराळे ज्यांत आहे त्या संबंधीचा दीर्घ द्वेष होय. कृत्रिम उपायानें उंचीवर नेलेलें पाणीसुद्धां कृत्रिम साधनांचा अभाव उत्पन्न झाल्याबरोबर चटदिशीं आपल्या पातळीवर येते नि त्या साधनांच्या अस्तित्वांत सुद्धां आपल्या पूर्व स्थितीवर येण्याची धडपड सारखी चालूच असते त्याप्रमाणें बहुजनसमाजाची सारी शक्ति आपल्या परिस्थितींत बदल घडून आणू पाहाणाऱ्या कोणत्याहि नवोदित शक्तीशीं टक्कर देऊन आपल्या स्थिर स्थितीशीं चिकटून राहण्यांत खर्च होते. अर्थात् या सामुदायिक प्रतिक्रियेचें स्वरूप सदासर्वदा सारखेंच असतें असें नाहीं. कधीं दुर्लक्ष करून अशा क्रांतिवीराचें भूत विस्मृतीच्या कराल उदरांत गडप करावयाचें, तें जमल्यास ह्याच्या भोंवतीं वाघाच्या हांका करणाऱ्या बाजारबुणग्याप्रमाणें अपकीर्ति, निषेध, तिरस्कार नि धिःकार याचें वादळ उठवून त्याला पराभूत करावयाचें किंवा या उपायानें शत्रू आटोक्यांत येण्याजोगा नसेल तर आपल्या बहुसंख्येच्या जोरावर चोहोंबाजूनें त्याच्यावर हल्ला चढवून त्याला नेस्तनाबूत करावयाचें व जितक्या जोरांत साऱ्या जगाला पुढें ढकलण्याकरतां एखाद्या वीर श्रेष्ठानें धक्का दिला असेल त्याच्या दुप्पट जोरानें आपल्या प्रतिगामी शक्तीच्या बळावर जगाला भूतकालाकडे खेंचीत नेणें हे प्रकार इतिहासांत नेहमीं दिसून येतात. मानवी संस्कृतीच्या प्रगति रेषेला कांहीं तत्त्ववेत्त्यांनीं समुद्राच्या लाटांची उपमा देऊन आभासात्मक गतिमानतेच्या बुडाशीं बंदिस्त जडस्थिरत्व असल्याचा दाखला दिला तर कांहीं शास्त्रज्ञांनीं इतिहासाची पुनरावृत्ति होते असे प्रतिपादन करून

या रेषेला चक्रव्यूहांतल्या वर्तुळाकार वक्र रेषेची उपमा दिली पण अधिकांश विद्वानांनीं समाजशास्त्राच्या सूक्ष्म अभ्यासानंतर असा सिद्धांत प्रस्थापित केला आहे कीं या रेषेचा मार्ग वाटोळ्या जिन्या-प्रमाणें गोलाकार पण उभट असा असून प्रत्येक गिरकी बरोबर ती रेषा जमीनी पासून उंच उंच होत जाते पण या पैकीं एकहि सिद्धांत प्रत्यक्ष परिस्थितीशीं लागू पडत नाहीं तर एका मध्यबिंदू-पासून आरंभ होऊन अधिकाधिक विकसित पण पूर्ण न होणाऱ्या अशा वर्तुळांच्या स्वरूपांत ही रेषा एकमेकांचा छेद न करतां सारखी गोल फिरत आहे असे हजारों उदाहरणांनीं सिद्ध करतां येईल. गतिशास्त्रांतील एक महत्त्वाचा सिद्धांत असा आहे कीं एखाद्या वाटोळ्या स्थिरवस्तूवर दोन विरुद्ध दिशांनीं सारखी शक्ति ओढण्यास वापरली तर ती वस्तू आपली जागा न सोडता गरकन् आपल्या भोंवतीच फिरत राहून गतिमान होते. सूर्यमालेंतील ग्रहांना सूर्या-पासून दूर ओढून नेऊं पाहाणारी अज्ञात विश्वशक्ति नि आपल्या मूलस्थानाकडे ओढणारी सूर्याची आकर्षण शक्ति या दोहोंच्या परस्पर संघर्षानें पृथ्वीला तिची दैनंदिन गति प्राप्त झाली आहे. याच दैनंदिन गतींतून परिणत होऊन दीर्घ वर्तुलाकृति वार्षिक गतीहि पण प्राप्त झाली. त्याजबरोबर त्या अज्ञातशक्तिच्या प्रभावानें पृथ्वीला मध्यबिंदुवत् असणाऱ्या सूर्यदेवाचें अधिष्ठानहि मूलस्थानापासून चलित होऊन आपल्या अज्ञात ध्येयाकडे—कदाचित् पूर्णत्वाकडे सूर्याची गति चालू झाली व त्याच्या आश्रयाला असलेली सारी ग्रहमाला अवकाशांतील आपापल्या कक्षा सोडून नकळत पुढें चालू लागल्या. थोडाफार फरकानें मानवी समाजाच्या प्रगतीचें राहाट-गाडगेंहि असेंच चाललें आहे. तीच अज्ञात दिव्य शक्ति वेळोवेळीं अनेक पुरुषश्रेष्ठांच्या रूपानें मूर्तत्व पावून समाजाला पुढें खेंचीत जात

नि समाजाच्या जीवनप्रवृत्तीचें सूत्ररूप असलेली स्थीरप्रिय प्रवृत्ती समाजाला साधारण मनुष्याच्या रूढीप्रिय अंध, हीन नि असहिष्णु स्वभावाच्या रूपानें प्रगटून मागें खेंचीत राहाते. मानवजातीच्या प्रागतेतिहासाचा आढावा म्हणजे या जगद्व्यापी लढ्याचें इतिवृत्त होय.

सर्वसाधारण समाजाच्या या प्रवृत्तीचें मानसशास्त्रीय परीक्षण करणें फार हितावह होईल. नेत्र रोग्याला ज्या प्रमाणें प्रकाशाचा झोत दुःसह होतो. त्या प्रमाणेंच न्यूनगंड असलेल्या मनुष्याला कोणत्याहि महत् तत्त्वाचा अथवा महान् शक्तीचा भास सुद्धां जाचक वाटतो. जें जें सृष्टींत उदात्त म्हणून दिसेल, जे तेजस्वी दिव्य नि शक्तिशाली असेल त्यांची दुरून आराधना करणें निराळें नि त्याच्याशीं एकरुप होण्याचा प्रयत्न करणें निराळें. हा भेद ध्यानांत ठेवणें या करतां आवश्यक आहे कीं बहुजन समाजांतील विभूति पुजेचें स्तोम पाहिले म्हणजे पुष्कळ विचारी नि विद्वान लोकांनाहि किंचित् असा भ्रम होतोहि कीं खरोखर जगांत आजवर निर्माण झालेल्या महान् नरश्रेष्ठांच्या कार्यांचे यश सर्वस्वी साधारण समाजाच्या सहकार्यावरच अवलंबून होते. पण हा केवळ आभासच आहे. आपली गुणग्राहकता नि रसिकता प्रगट करण्याची ही हाव केवळ निष्क्रियता, आलस्य, नि न्यूनगंड यांतूनच जन्माला आली आहे. ज्या उदात्त तत्त्वाचा आपण केव्हांहि अवलंब करूं शकत नाहीं आणि जें आचरणात आणण्याची सक्ती आपणांवर केव्हांहि केली जाणार नाहीं अशी खात्री असतांना त्या तत्त्वाचा उदोउदो करणें हे आपल्या तत्त्वनिष्ठेचा पोकळ डौल मिरविण्याच्या दृष्टीनें फार सोपें असतें. हातांत तलवार घेऊन पारतंत्र्य-पंकांत रुतलेल्या, दुर्गुणांनीं पोखरलेल्या नि अज्ञान सम्मोह इत्यादि विकारांनीं मनोविकल झालेल्या आपल्या देशबांधवांना स्वातंत्र्य युद्धास आव्हान देणाऱ्या वीरोत्तमाच्या हांकेला तत्परतेने ओ देणारे क्वचितच्

पण असहाय्य, परित्यक्त नि मित्रांनींहि ज्याचा घात केला अशा लाजिरवाण्या परिस्थितींत ज्याला आत्माहुती द्यावी लागली नि ज्याचा सर्वस्वी कार्य नाश झाला अशा हुतात्म्याच्या थडग्यावर आपल्या दुबळ्या नशीबाचें रडगाणें गात अश्रूंच्या माला चढविणारें देशभक्त मात्र फार. त्यांची विभूति पूजा पाहून जर आपला बुद्धिभेद झाला तर जगांतल्या या सत् असत् च्या लढ्याचें खरें सामाजिक स्वरूप आपणांस केव्हांच उमगणार नाहीं. तसेंच ज्या मूठभर लोकांनीं भूतलावर वेळोवेळीं अवतीर्ण होणाऱ्या महान् चित्‌शक्तीचें हार्दिक स्वागत केलें नि आपापल्या परीनें त्या शक्तीचें जीवन कार्य सफल होण्यासाठीं हातभार लावला त्यांच्या सहकार्याकडे पाहूनहि आपणांस या द्वंद्वाचा खरा निष्कर्ष काढतां येणार नाहीं. तर इतिहासांतील ठळक उदाहरणें घेऊन त्यांची पार्श्वभूमी शास्त्रज्ञाच्या सूक्ष्म दृष्टीनें तपासून अपवाद आणि नियम हे निवडून काढले पाहिजेत. आणि हे करण्याकरितां आपल्याला मनुष्यमात्राच्या प्रमुख प्रवृत्तीचा विचार केला पाहिजे.

१. जगण्याची प्रवृत्ती

२. सुखाची प्रवृत्ती

३. जीवन आणि सुख यांना प्रतिरोधक असलेल्या संकटाचा निरास करण्याची प्रवृत्ती

४. आपणापेक्षां प्रबल असलेल्या सर्व शक्तींचें भय

५. सातत्याची भावना

या व अशाच कांहीं किरकोळ प्रवृत्तीच्या गुंतागुंतीनें मनुष्य स्वभावाची पार्श्वभूमी तयार झाली. जशी जशी ज्ञानाची वाढ होऊं लागेल तसतसा मनुष्य जास्त अंतर्मुख होऊं लागतो. बहिर्मुखी ज्ञान आपल्या परिणत अवस्थेंत अंतर्मुखी बनल्या शिवाय राहूंच शकत नाहीं असा

आमचा निश्चित सिद्धांत आहे. या ज्ञानाच्या प्रभावानेंच मनुष्या-मनुष्याचें संबंध, स्वार्थ, संरक्षण, नि भीति या भावनांच्या पुढें जाऊन परस्पर सहकार्य नि मोठ्या स्वार्थाकरितां लहान स्वार्थाचा त्याग नुसत्या सातत्यापेक्षां वर्तमानकालांत हानी स्वीकारून भविष्यकाल अधिक उज्वल करण्याची महत्त्वाकांक्षा यांचा प्रादुर्भाव मनुष्यांत होऊं लागला. हें सर्व निर्माण करण्यास जसें ज्ञान कारणीभूत झालें तसेंच तें ज्ञान आचरणांत आणण्यासाठीं ज्या कर्मयोग्यानें भगीरथ प्रयत्न केले त्यांच्या पुण्याईचा प्रभावहि याच्या बुडाशीं आहे. पण हें सर्व कांहीं होऊनहि सर्वसाधारण मनुष्याच्या वाईट प्रवृत्तीचा नाश तर राहोच पण त्यांत यत्किंचितहि कमतरता झाली नाहीं. समाजाच्या सामुदायिक कार्याचा कल जेव्हां सत्प्रवृत्तीकडे असतो तेव्हां ती एखाद्या पुरुषश्रेष्ठाच्या शक्तीची ओढ असते. जेव्हां जेव्हां समाज अध:पतनाकडे जात असल्याचें आढळून येईल तेव्हां समाजांतील सर्वसाधारण माणसाच्या असत् प्रवृत्तीचा जोर आहे असेंच समजावें. कोणत्याहि समाजांत जेव्हां तेजस्वी वीर पुरुष निर्माण होतो तेव्हां समाज प्रथम त्याच्या अस्तित्वाची उपेक्षा करण्याचा प्रयत्न करतो. पुढें त्या पुरुषाच्या प्रयत्नानें त्याचें अस्तित्व जेव्हां अत्याग्रही होतें, समाजांतील कांहीं लोक त्याच्या प्रभावानें परिणामित होऊन त्याच्या कार्याला मूर्तस्वरुप येण्याचा संभव उत्पन्न होतो तेव्हां त्या विशिष्ट समाजांतील बहुजन-समाज कधीं एक एक अथवा कधीं संघटित वाटेल त्या उपलब्ध साधनांनीं त्या शक्तीला विरोध करून खालीं पाडण्याचा प्रयत्न कर-तात. या लढयांतील बहुजनसमाजाची हुकुमी हत्यारें म्हणजे ईर्षा, द्वेष, स्वार्थकलह, बहुसंख्य लोकमत, तर्कवाद, रूढीसंरक्षकसत्ता, आणि संस्था आणि सरतेशेवटीं समाजाच्या स्थिर स्थितींत ज्याचे

हितसंबंध गुंतलेले आहेत त्या लोकांची आपल्या हितसंरक्षणासाठीं या तत्त्वनिष्ठेच्या ढालीमागें प्राणपणानें झुंजणाऱ्या वीरांची सेना, हीं साधनें जगांतील सर्व राष्ट्रांना समान अशींच आहेत. ग्रीसच्या तरुणांना पार्थीव वैभवाच्या मृगजळापासून निवृत्त करून, अज्ञान, सम्मोह नि संकुचित स्वार्थीपणा यांचा त्याग करा, या नश्वर देहापेक्षां श्रेष्ठ असलेल्या आत्म्याचें नीतिधर्माच्या सहाय्यानें संरक्षण करा नि आपल्या समाजाला वाणिज्य संघाचें स्वरूप न देतां बलशाली, तेजस्वी आणि सत्प्रवृत्तीच्या पक्क्या पायांवर आधारलेल्या प्रागतिक समाजाचें स्वरूप द्या असा उपदेश करणाऱ्या निष्पाप देवतुल्य **सॉक्रेटीसला**, अथेन्सच्या तरुणांना बिघडविणारा पाखंडी असें समजून विषाचा पेला पाजविणाऱ्या अथेनियन लोकांना यांपैकीं एकाहि साधनांची कमतरता पडली नाहीं. अज्ञानी आणि मूर्ख लोकांच्या देशांत बहुसंख्येच्या हातीं सत्ता असणें किती धोक्याचें असते याची सूचना साऱ्या जगाला देणारा तो अमानुष प्रसंग होता. सत्याकडे जाणारा मार्ग अरूंद नि असत्याकडे जाणारा मार्ग गजबजलेला हें निर्विवाद तत्त्व माहीत असून सुद्धां जेव्हां बहुजनसमाजाच्या हातांत अमर्याद सत्ता दिली जाते तेव्हां त्या सत्तेचा उपयोग समाजाला मोहनिद्रेंतून जागृत करणाऱ्या ज्ञान तेजाला झांकण्याकरतां, समाजांतील बुरसटलेल्या स्वार्थी प्रवृत्तीचा नायनाट करणाऱ्या सदुपदेशाचा प्रसार थांबविण्याकरतां, अज्ञानाची घमेंड, रूढी नि परंपरा यांचा पोकळ डौल, पार्थिव ध्येयाच्या भोंवतीं घुंटमळणारे जीवन नि सर्वसामान्य माणसाच्या पाशवी लालसा यांचा नायनाट करण्याकरतां ज्या ज्या शक्तीचा जन्म होऊं लागेल तिला तिथल्या तेथेंच गाडून टाकून आपल्या अमर्याद मूर्खपणाचें राज्य निर्वेधपणें चालविण्या करतांच होत राहील हे नि:संशय !

या अमंगल कार्यात बहुजन समाजाला पुढारी लाभत नाहीं असें मात्र नाहीं. प्राचीन लोकशाहीच्या अंधकार युगांत सवंग प्रियता संपादन करून बहुजन समाजाच्या अडाणीपणाला आपलें भांडवल बनवून आपल्या स्वार्थाचा हैदोस घालणारे **डेमोगाग्ज.** ग्रीस आणि रोम मध्यें शेकडों निर्माण झाले. हे स्वार्थसाधु समाज-कंटक आंतून लांडगे पण बाहेरून शेळीचें कातडें पांघरून समाजांत वावरत असतात. समाजाच्या उद्धारासाठीं खडतर तपश्चर्या करून दिव्य स्वार्थत्यागानें कार्य करणाऱ्या महात्म्यांचे मारेकरी म्हणजे बहुजनसमाजाचें हेच प्रतिनिधी होत. साधारण समाजाच्या हीन प्रवृत्तींना नाहींसे करण्याकरतां प्रयत्न करणाऱ्या तत्वनिष्ठांची मालिका एकीकडे व त्या हीन प्रवृत्तींना उत्तेजन देऊन या द्वंद्वाच्या अग्नीवर आपल्या स्वार्थाची पोळी भाजून घेणाऱ्या या प्राकृत पुढाऱ्यांची परंपरा एकीकडे. **सॉक्रेटीसच्या** वेळचे आथेनीयन पदाधिकारी हे लोकपक्षाचे असले पुढारी होत. इसापनीतींतील एका गोष्टीचा दाखला येथें दिला म्हणजे हे विचार अधिक स्पष्ट होतील. पुरातन काळापासून लांडग्यांचें नि शेळ्यांचें वैर प्रसिद्धच आहे. या शेळ्यांचें सदैव लांडग्यापासून संरक्षण करण्याची कामगिरी बिचाऱ्या कुत्र्या-वर होती. या कुत्र्यांच्या एकनिष्ठ कामगिरीमुळें लांडगे दादांना आपल्या संहाराचा कार्यक्रम पार पाडतां येईना. तेव्हां त्यानीं भेद-नीतीचा अवलंब करून आपल्या रसाळवाणीनें शेळ्यांना असें पटवून दिले कीं तुमच्या आमच्यांत वैर आणून देण्याला खरे कारणीभूत हे कुत्रेच होत. यांच्या दुष्ट, हिंसात्मक व भांडकुदळ स्वभावामुळें आपणा दोघांच्या सख्यांत अडथळा उत्पन्न होतो तेव्हां तुम्ही कसेंहि करून या कुत्र्यांना हांकलून द्या म्हणजे तुम्ही आम्ही एक होऊन जाऊ. बिचाऱ्या मूर्ख शेळ्याच्या भुलावणीनें सहज

फसल्या व आपल्या बहुसंख्येच्या जोरावर एकच गिल्ला करून त्यांनीं कुत्र्यांना हांकलून दिलें. संरक्षकाचा जागता पहारा दूर होतां क्षणींच लांडग्यानें आपलें मायावी रूप टाकून रुद्रावतार धारण केला व त्या गरीब मेंढरांचा ताबडतोब चट्टामट्टा करण्यास आरंभ केला. रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून जिवावर उदार होऊन समाजाच्या उद्धारासाठीं धडपडणाऱ्या सत्पुरुषांचा धिक्कार व बहुजन समाजाच्या दुर्गुणाला उत्तेजन देऊन आपला स्वार्थ साधणाऱ्या धूर्त डेमोगॉगजचा बडेजाव हें असें नाटक नेहमींच चालू राहातें. लोकशाही नि लोकमताचा उदोउदो करणाऱ्या लोकांत अशा कावेबाज प्रचारकांचाच जास्त भरणा असतो. एवंच दुरून सकृत्दर्शनी इतिहासकाराला समान भासणाऱ्या या दोन प्रकारच्या पुरुषांत एवढें महदंतर असतें. अर्थात् येथें हे लक्षांत ठेवलें पाहिजे कीं जगाच्या नाटकांत ढोंगी महात्म्याची भूमिका उठविणारा खलनायक हा या लढ्याचें निमित्त मात्र कारण होय. अमुक एका महापुरुषाच्या काळांत सामाजिक आंदोलनाच्या प्रतिगामी बाजूला असणारा अमुक एक खलनायक नसता तर बहुजनसमाजाचा विरोध परिणामकारक झाला नसता असें मात्र नाहीं. बहुजनसमाजाची प्रतिरोधक शक्ति कोण्याना कोण्या तरी मूर्तस्वरूपांत प्रगट व्हावयाचीच. प्रक्षुब्ध झालेल्या समाज परिस्थितीचा नैसर्गिक परिणाम म्हणूनच हे खलनायक जन्माला आलेले असतात. सारांश परिस्थितीनिरपेक्ष जन्माला येणारे तत्त्वाचे पुढारी व परिस्थिती सापेक्षच नव्हे तर परिस्थितीनें जन्मास घातलेले लोकांचे पुढारी यांत कसल्याहि प्रकारचें साधर्म्य नाहीं. खवळलेल्या सागराच्या लाटा प्रक्षुब्ध होऊन घुसळत घुसळत जेव्हां वेगानें पुढें धांव घेतात तेव्हां त्यांतून बाहेर पडणाऱ्या फेंसाप्रमाणें लोकवीरांचे जीवित क्षणभंगुर, पोकळ व सर्वस्वी परिस्थितीचें

अंकित नि परिस्थितीनें निर्माण केलेली ही मेणाची बाहुली सूत्र-धाराच्या इषाऱ्याबरहुकूम इतिहासाच्या स्टेजवर (रंगभूमीवर) एका मागून एक उतरतात व आपला खेळ दाखवितात. मानवी संस्कृतीच्या प्रगतीचा इतिहास लिहिणाऱ्या इतिहासकाराला त्यांची दखलगिरी घेण्याचें कारण नाहीं. मात्र पडद्याचें मागें अंधारांत लपून बसलेल्या सूत्रधाराच्या खऱ्या स्वरूपाची नि हालचालीची माहिती करून घेणें आवश्यक आहे. जगांतील सारेच तत्त्ववीर परिस्थितीवर मात करणारे, स्वत: परिस्थिती घडवूं पहाणारे, स्वैर वाहाणाऱ्या प्रवाहाला वळण लावणारे, चंचल वाऱ्याला आपली दिशा बदलावयास लावणारे आणि जड नि:सत्व व चैतन्यहीन झालेल्या अंधकारमय आकाशांत आपल्या तेजानें प्रक्षोभ निर्माण करून प्रकाशाचीं हजारों आंदोलनें नाचवूं पहाणारे खरे कर्मयोगी असतात. लोकमतगंगेच्या अनिर्बंध प्रवाहावर प्रवाह पतिताप्रमाणें मुक्या हालचाली करीत वहात जाणाऱ्या दुबळ्या पामरांना वास्तविक इतिहासांत स्थान नाहीं. जास्तींत जास्त प्रवाहाची दिशा आणि वेग दाखविणारे miles stones म्हणून यांची किंमत. अथेन्स उन्मत्त राज्याधिकाऱ्यांची कोणी नोंद करून ठेविली आहे काय? अथेनियन लोकांच्या मूर्खपणाची निशाणी म्हणून सुद्धां त्यांच्या थडग्यांची स्मारकें शिल्लक राहिली नाहींत. साक्रेटीसचा बळी घेतल्याबरोबर चौपदरी गळा काढून रडत सुटणाऱ्या ग्रीक लोकांची उपरती याला सुद्धां स्मशान वैराग्यापेक्षां जास्त किंमत नाहीं. बहुजन समाजाच्या अज्ञानजन्य विरोधाची तीव्रता इतकी प्रखर आहे कीं तें हत्यार चालवून प्रत्यक्ष परमेश्वर जरी मानवरुपांत अवतीर्ण होऊन सत्याचा उपदेश करूं लागला व मी परमेश्वर आहे असें प्रत्यक्ष हजारों प्रमाणांनीं सिद्ध करूं लागला तरी आपल्या अज्ञानाच्या घमेंडींत

मायेनें अंध झालेला पापी लोकसमूह परमेश्वराच्या नांवाखालींच त्याचा उच्छेद करावयाला माघार घेणार नाहीं. आणि एकदां आपलें पापकर्म तडीला गेलें कीं मग डोळ्यावरची झांपड उडून पश्चात्तापानें रडत बसावयाचें, पण पुन्हां वेळ आली कीं पुनश्च तीच उपजत वृत्ती हें असें राहाटगाडगें सारखें चालूंच असतें. सामान्य जनसमूहाची ही नित्य भयानक व सर्व नाशक वृत्ति विचारांत घेतली म्हणजे मानवजातीच्या भवितव्यासंबंधीं दुःखपूर्ण उदासिनता वाटूं लागते व शेवटीं Oh Lord ! When will Thy world be fit to receive Thy saints असे मोठ्या आर्त स्वरानें म्हणावे लागते.

मध्ययुगीन फ्रान्सच्या अत्यंत बिकट नि लांच्छनास्पद पारतंत्र्यकालीं, परकीय विजेत्यासमोर पददलित फ्रान्सचे रथीमहारथी मेंढराप्रमाणें सैरावैरा पळत असतां व फ्रान्सची राज्यलक्ष्मी **ऑर्लिन्सच्या** तटबंदींत असहाय्यपणें दैवाची करुणा भाकीत असतां फ्रान्सची स्वातंत्र्यदेवता एका निष्पाप, कोमल, ग्रामकन्येच्या रूपानें अवतरली व तिनें आपल्या दैवी सामर्थ्य तेजानें स्वकीय नि परकीयांचें डोळे दिपविले. मृतकसमान झालेल्या फ्रेंच जनतेस नवचैतन्याची संजीवनी देऊन युयुत्सु व विजयाच्या धुंदीनें उन्मत्त झालेल्या परकीयांना एका क्षणांत निर्वीर्य केले. पारतंत्र्यांतून मुक्त झालेल्या फ्रान्सचा धर्मनियुक्त राजा म्हणून **डॉफिनला** राज्याभिषेक केला व तिच्या देशाच्या राज्यलक्ष्मीची विटंबना थांबविली. त्या महान् अद्भुत दैवी सामर्थ्ययुक्त बालिकेचें स्वर्गीय तेज फ्रान्सच्या कुलांगारांना साहवलें नाहीं व परकीयांच्या कुटिल कारस्थानाला नि स्वकीयांच्या आत्मघातकी विश्वास–घाताला बळी पडलेल्या या देवतेला शेवटीं पाखंडी म्हणून त्याच मायभूमीच्या अंकावर जिवंत जाळले. जानपदांनीं त्यांच्याच उद्धारासाठीं अवतरलेल्या दैवीशक्तीची

केलेली ही संभावना सदैव जानपदांच्या नीचतेची साक्ष देत राहील.

**डेमॉस्थॅनिसच्या** जीभेवर सरस्वतीचा वास होता, त्याच्या प्रत्येक शब्दांत सत्य, ओज नि कर्तव्य स्फूर्ति रसरसून भरलेली होती. पण ग्रीसच्या मोहवश लोकसमूहाला मात्र नळी फुंकिली सोनारें इकडुन तिकडें गेलें वारें एवढ्या पुरतेंच त्याचें मोल ! मॅसिडोनियाचें नवोदित राजघराणें उत्तरोत्तर प्रबल होत चाललें, फिलिपची दुर्दमनीय महत्त्वाकांक्षा मॅसिडोनियाच्या मर्यादा उल्लंघून संपूर्ण ग्रीसच्या स्वातंत्र्य भूमीवर थैमान घालूं लागली. ग्रीक नगर-राज्याच्या स्वातंत्र्य सूर्याचा अस्त समय जवळ आला व परवशतेची घनछाया क्षितिजावर पडूं लागली. मूर्तिमंत संहारक मृत्यु आपला कराल जबडा उघडून समोर उभा आहे. उठा, जागृत व्हा, आणि वेशी नजीक येऊन ठेपलेल्या या संकटाला तोंड देण्याकरितां संघटित व्हा, किंकर्तव्यमूढ होऊन शुष्क तात्विकवाद नि तर्कट यांच्या नांवाखालीं आपल्या भीरुतेची हीन प्रवृत्ति प्रस्थापित करूं नका. मरणापूर्वीची शांतता, ती शांतता नाहीं जिच्या रक्षणा करितां नीतीचा आदेश आहे तर ती शांतता नष्ट करून रक्तपात केल्यानेंच खरी आणी शाश्वत शांतता प्रस्थापित होऊं शकते असा दिव्य उपदेश करणारा **डेमॉस्थेनिस** गाढवा समोर गीता वाचीत राहिला. ‘ विनाश काले विपरीत बुद्धि: ’ या न्यायानें नगर राज्यांतली मोहांध जनता आपल्या पायाजवळचें पहात बसली नि त्यांचा तात्विक काथ्याकूट संपण्यापूर्वीच फिलिप्च्या विजयी सैन्यानें झाडून साऱ्या लोकराज्याची भूमि पायाखालीं तुडविली. मूर्खांच्या राज्यांत शहाण्याच्या शब्दाला काय किंमत असते याचें हें ऐतिहासिक प्रत्यंतर होय.

आतां आपणांस मुख्यत्वेंकरून हें पहावयाचें आहे कीं खरोखर बहुजन समाजाच्या या असल्या शतकानुशतक चालणाऱ्या विरोधाचें खरें मर्म व त्याची शास्त्रीय कारणमीमंसा कशी आहे. या विरोधाचें जगद्व्यापी व नित्य स्वरुप लक्षांत येण्यासाठीं निरनिराळ्या कालखंडांतील व निरनिराळ्या राष्ट्रांतील कांहीं उदाहरणें देणें आवश्यक आहे. लोकमत स्वातंत्र्याच्या नांवाखालीं रोमन जनतेनें लोकशाहीच्या कट्टया पुरस्कर्त्या **सीझरला** विश्वासघातानें ठार मारलें. यहुदी लोकांना साऱ्या जगाचें प्रभुत्व देऊं इच्छिणाऱ्या व सद्धर्माचा उपदेश करून त्यांना शुद्ध आणि उच्च असें आंतरराष्ट्रीयच नव्हे तर नित्य असें महत्त्वाचें स्थान प्राप्त करून देऊं इच्छिणाऱ्या **येशू-ख्रिस्ताला** यहुदी लोकांनीं सद्धर्माच्याच नांवाखालीं आपल्या हातानें फांसावर लटकविलें. ज्या धर्मानें मनुष्याला देवपदाला चढविलें, सगळ्या जगाची मालकी आपल्याकडे येईल अशी क्षात्रवृत्ति व सगळ्या जगाचें गुरूपद लाभेल अशी दैवी संस्कृति आर्यांना मिळवून दिली नि ज्या धर्मसंस्कृतीनें रानांवनांतून हिंस्त्रश्वापदा प्रमाणें नग्नावस्थेंत भटकणाऱ्या अनार्यांना व रक्तपिपासु क्रूर श्वापदांप्रमाणें साऱ्या जगांत आपल्या अघोरी व राक्षसी मायेचा प्रसार करीत हिंडणाऱ्या म्लेंच्छांना सुसंस्कृत करून उत्कृष्ट मानवतेच्या पदाला आणून बसविलें त्याच धर्म संस्कृतीच्या विरुद्ध बंड उभारून भारतांतील बहुजन समाजानें बुद्धासारख्या गावंढळ पंडिताच्या नेतृत्वाखालीं हीनतर अशा अज्ञानजन्य भ्रममूलक प्राकृत सांप्रदायाची जगद्व्यापी चळवळ आरंभिली आणी साऱ्या विश्वाला प्रकाश देणाऱ्या दैदिप्यमान सूर्याला त्याच्या क्षितिजाच्या घरींच अघोरी निशेनें आपल्या मायावी पण निर्घृण तिमिर—जालानें ग्रासून टाकावें व सारें जगत् अंधकारमय करावें त्याप्रमाणें शतकानुशतकां करितां या भारतांत दुर्बलता,

पंगुपणा, हताश नि पराभूत मनोवृत्ति, दासांची नीति, खोटा माया-वाद, व स्वातंत्र्याच्या नांवाखालीं अनिर्बंध स्वैराचार व सद्गुणाच्या नांवाखालीं पौरुषहीनत्व यांचें साम्राज्य पसरून दिलें. जगाच्या इतिहासांत सामान्यकांनीं पुरुषोत्तमाच्या संस्कृतीवर चढविलेला हा सर्वांत मोठा हल्ला. सामान्यकांची जी भयानक प्रवृत्तिपरंपरा जगते-तिहासाच्या बुडाशीं गोंधळ घालीत असलेली दिसते त्याचें अत्यंत व्यापक, परिणामकारक नि प्रातिनिधिक सामूहिक स्वरुप बौद्ध धर्माच्या चळवळींत पहावयास सांपडते. या नंतरचें दुसरें छोटें उदा-हरण राजकारणाच्या क्षेत्रांत मराठ्यांच्या वेळचे. संपूर्ण हिंदुस्थानाला पारतंत्र्याचें खग्रासग्रहण लागलें असतां दुर्बल असाह्य नि मोहवश झालेल्या हिंदुजनतेंत चैतन्यमंत्राचें बीजारोपण करून स्वातंत्र्य-युद्धासाटीं त्यांना उत्स्फूर्त करणारे मराठेराष्ट्र हातांत खड्ग घेऊन भारताच्या वीरवृत्तीला आव्हान देत असतां आपल्या धन्याशीं इमान राखणाऱ्या श्वानजीवी बहुसंख्य हिंदुजमातीनें एकमतानें त्यांना विरोध केला. मराठीराज्याच्या विस्ताराला सर्वांत जास्त विरोध झाला असेल तर तो हिंदूंचाच. या विरोधाच्या मागें हिंदूंच्या शेकडों दुर्गुणांची परंपरा असेल पण त्या सर्वांत प्रभावी कारण म्हणजे गुलामांच्या अंत:करणांतील न्यूनगंड आणि जगांत अवतीर्ण होणाऱ्या वाटेल त्या महान शक्तीला विरोध करण्याची सामान्यकांची पुरातन अज्ञानजन्य हीन प्रवृत्तीच, पौरुषहीनतेच्या काळ्याकुट्ट अंधारांत पारतंत्र्यपंकांत सडत पडलेली हिंदीजनता मोहांध होऊन मुक्या हालचाली करीत असतां जिवावर उदार होऊन आपल्या अलौकिक सामर्थ्य तेजानें क्रांतीच्या ठिणग्या पाडणारे क्रांतिवीर जेव्हां जन्माला आले तेव्हां त्यांचा उपमर्द, धिक्कार, विरोध आणि सर्वनाश करण्यांत सर्वांत जास्त हातभार लावला असेल तर बहुसंख्य हिंदी सामान्यकांनींच.

आपणांत जें जें नाहीं तें दुसऱ्यांत दिसल्या बरोबर दु:सह होऊन त्याला विरोध करण्यासाठीं सज्ज करणारी प्रवृत्ति ही गुलामांच्या न्यूनगंडांतूनच जन्माला आलेली असते. दिव्य दाहक तेजाला परम कल्याणकारी आणि उन्मार्गगामी अग्नि समजण्याच्या ऐवजीं सृष्टीचें नंदनवन जाळीत सुटणाऱ्या वणव्याचा आरोप त्यावर करून हे बहुसंख्य वेडेपीर त्यावर खंडोगणती माती आणि राख टाकून त्याला विझवून त्यावर आपल्या पापकर्माचे ढिगारें उभे करतील. दिव्य दृष्टीनें भूतकालचा इतिहास पहाणाऱ्या द्रष्ट्याला अंधजनतेच्या पापकृत्याचें असले हजारों ढिगारे पहावयास सांपडतील व त्या ढिगाऱ्याखालीं किती तरी महात्म्यांची दैवीसंपदा मातीमोल होऊन दडून बसली असेल. जगाचा हजारों वर्षांचा उज्वल इतिहास घडविण्याचें सामर्थ्य असलेली शक्ति त्या पाप गर्तेच्या खोल बंधनांत निष्क्रिय होऊन पडली असेल. तो अग्नि विझणारा नाहीं व ती शक्ति नष्ट होणारी नाहीं. विस्मृतीच्या खोल डोहांतूनहि ती शक्ति वर डोकें काढल्याशिवाय राहाणार नाहीं व लोकमताच्या दडपणाखालीं दबलेल्या सत्तत्त्वाचा अग्निस्फुल्लींग धुमसत राहून युगानुयुगानंतर कां होईना स्वत: पेटून सगळ्या जगाला प्रकाशित केल्याशिवाय राहाणार नाहीं. अनादि कालापासून विश्वांत सत् आणि असत् याचा झगडा, सृष्टींत प्रकाश आणि अंधार याचा झगडा व मानवी जगतांत पाप आणि पुण्य यांचें द्वंद्व नित्याचेंच चालू आहे. जगांतील प्रत्येक घडामोडींत हेंच द्वंद्व कोण्याना कोण्या स्वरूपांत पहावयास मिळते किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं विश्वाच्या आरंभापासून आदिरूप असलेल्या या दोन महान शक्ति सारख्या आपसांत झगडत असतां निरनिराळीं द्वंद्वात्मक रूपें घेऊन सृष्टींतील अनेकविध गुंतागुंतीच्या व्यवहारांत मूर्तरूपानें प्रगटत

असतात. त्या आदिशक्तींना निरनिराळ्या धर्मांतील तत्त्ववेत्त्यांनीं निरनिराळीं नांवें दिलीं आहेत पण त्यांच्या परस्पर कलहासंबंधीं मात्र जगांतील कोणत्याहि धर्माचें दुमत नाहीं. जशी वस्तूंची छाया, आवाजाचा प्रतिध्वनी आणि जीवनाला मृत्यु त्याप्रमाणें नियमितपणें विरोधक भूमिकेंत एकमेकाशीं संबद्ध असलेल्या या शक्ति परमेश्वर आणि सैतान या स्वरूपांपासून ते थेट विद्युत्कणांतील ऋण आणि धन येथपर्यंत असंख्य रूपानें नटून सृष्टि विकासाचें कार्य अविरतपणें चालवित आहे. त्यांच मानवी जगतांतहि व्यक्तिशः प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत कर्तव्याकर्तव्याचें जें भिन्न भिन्न कलह चालू असतात व त्यांत सुखदुःख, स्वार्थ परमार्थ, शैथिल्य चांचल्य, त्याग आणि भोग व आत्मगौरव विरुद्ध आत्मविलिनता अशी अनेक द्वंद्वें प्रक्षुब्ध वादळें उठवीत असतात, त्या प्रमाणेंच कोट्यवधि मानवांनीं बनलेल्या या समाजांत अशाच असंख्य द्वंद्वांची गुंफण व्यापक प्रमाणांवर चालू असते. सैतानाच्या पाशवी शक्तीनें विषारी सर्पाच्या शरीरांत संचार करून अंधाराच्या मार्गानें न कळत गुप्त रूपानें नि विश्वासघातानें स्वर्गांतील अत्युच्च नंदनवनापर्यंत प्रवेश करून देवाच्या लाडक्या पुत्राला पापाच्या फांसांत गुंतविलें व सृष्टींत कोणालाहि प्राप्त न झालेल्या अशा उच्च स्थानावरून त्या प्रेमळ आदिपुरुषमाया-जोडीला एका धक्कयासरशीं अधःपतनाच्या खोल गर्तेत ढकलून दिलें. मानवाची श्रेष्ठता अंतःकरणाला दुःसह होऊन देवाच्या दरबारांत अपमानानें काळ्या ठिक्कर पडलेल्या या सैतानाचे एकमेव जीवित ध्येय म्हणजे मानवतेला पापाची कीड लागून त्याची सारी उदात्तता, पावित्र्य नि श्रेष्ठता नष्ट व्हावी हेंच होय. याच हेतूनें प्रेरित होऊन परमेश्वरी कृपेच्या दैवी तेजानें प्रकाशमान झालेल्या त्या मानवी आत्म्यावर आपले निर्घृण व महाभयंकर असें तिमिर

जाल चोंहोंबाजूंनीं फेंकून त्याच्या तेजाला खग्रास ग्रहण लावीत राहाणें हेंच सैतानाचें कार्य. हा सैतान आजपर्यंतच्या इतिहासांत अनेक दैत्यांच्या रूपानें भूलोकांवर अवतीर्ण झाला असेल. जगांतील असंख्य दुर्जन, देशद्रोही, स्वार्थांध, फितूर, अत्याचारी, आणि पापी दुरात्मेही या सैतानरूपी सूत्रधाराचीच बाहुलीं होत. मात्र सैतानाचा संचार व्यक्तिमात्रांतच होतो असे नाहीं तर संस्था, संघ, पक्ष, अथवा लोकसमुदायांनाहि मोहांध करून सत्‌चित् शक्तीचा विरोध करण्याकरितां संघटित करून लोकमतगंगेच्या प्रवाहांत आपल्या विषाचा फैलाव करण्याचें कार्य सैतान करीत असतो. एकेका व्यक्तीच्या सहाय्यानें जगाच्या नाशाचें कार्य तडीला जाणें अशक्य म्हणूनच लोकसमूहाच्या संघटित प्रयत्नावरच त्याचा जास्त भर आहे. आपल्या एकछत्री साम्राज्यावर कोठेंहि हल्ला झाला कीं एकदम सरसावून ही सैतानाची लेंकरें एकनिष्ठपणें युद्धाला उभीं राहातात व आक्रमक शक्तीचा विध्वंस केल्याशिवाय एक पळभरहि उसंत घेत नाहींत. लोकसमूहरूपी मेंढरांच्या कळपाच्या या संघटित प्रयत्नांचें पृथक्करण करून त्यांचें सत्यस्वरुप आपणांस उघड करावयाचें आहे.

फार प्राचीन काळीं या भरतखंडांत बली नांवाचा अत्यंत सद्वर्तनी, धार्मिक आणि कर्तव्यतत्पर असा राजा होऊन गेला. ज्ञान, कर्मयोग आणि ईश्वरभक्तीनें तो खराखरा राजर्षि शोभत होता. ईश्वराच्या जड सृष्टींत जीव श्रेष्ठ, तसेंच साऱ्या जीवसृष्टींत मानवाला निसर्गानें श्रेष्ठत्व प्राप्त करून दिलें. याच वाढत्या श्रेणीने परिणत होऊन मनुष्याला देवांचेहि राज्ञपद मिळावें ही त्याची महत्त्वाकांक्षा. धर्मानें आंखून दिलेल्या मार्गानें खडतर तपश्चर्या करून तरवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण नि अनुल्लंघनीय असलेल्या आत्मसंयमन नि आत्मबलिदानाच्या मार्गावर एकेक पाऊल पुढें टाकीत आत्मविका-

साची एकेक पायरी तो चढूं लागला. या नश्वर मायारूपी पार्थिव जगाच्या बंधनापलीकडे असलेल्या शाश्वत चित्शक्तीच्या अनुरोधानें उन्नति करीत आपल्या ध्येयासमीप येणाऱ्या या महापुरुषाचें तेजस्वी कार्य जगाला सहन झाले नाहीं. निसर्गाच्या बंदिस्त चौकटींत वेडपट हालचाली करणाऱ्या मायामोहित मानवतेला मनुष्यमात्रानें मिळविलेला अपुर्णत्वावरचा विजय उभ्या डोळ्यानें पाहवणार नाहीं त्या उदात्त नि अत्युच्च असलेल्या ऐश्वर्य शिखरावर पोंहोचण्याचें त्यांच्यांत कधींच सामर्थ्य नसल्यानें आपला सजातीय पुरुषश्रेष्ठ त्या शिखरावर आरोहण करीत असलेला त्यांना दु:सह झाला. मानवजात घाबरली, देव-दानवांचे पित्त खवळलें, अपूर्णत्वानें विनाशसमयाची आर्तकिंकाळी फोडली आणि मानवतेच्या हीन कवचाचें संरक्षक असलेले ठेकेदार, आणि, रूढपरंपरेचे आचार्य यांनीं एकच हांका करून दीनवाणीनें देवाचें सहाय्य मागितलें. कृमिकीटकांप्रमाणें जीवन जगणाऱ्या या लघुमानवानें विस्तार आणि संख्या यांच्या बळावर त्या बलीराजाच्या औदार्याचा गैरफायदा घेऊन त्याच्या यज्ञमंडपांत बटुवामनाला अवतीर्ण केलें. वामनानें याचना केली बलीराजानें वर दिला. शुक्राचार्यानें आपल्या मुत्सद्देगिरीच्या जोरावर बलीराजाला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पण ज्याला या जगांत कर्तव्यफलाची लालसा मनांत न ठेवतां निष्काम कर्मयोगाचेंच आचरण करावयाचें होतें, देवांनाहि अगम्य असलेल्या सत्यज्ञानाचा प्रकाश ज्यानें संयम आणि त्यागाच्या बळावर आपल्या आटोक्यांत आणला होता व ज्याला मानवतेचा पूर्ण विकास करून नि:श्रेयसाच्या परिणत अवस्थेंतील उच्चतम असें अढळपद मानवतेला प्राप्त करून द्यावयाचें होतें. त्या उदार नि परोपकारार्थ देह झिजविणाऱ्या बलीराजाला मुत्सद्देगिरीचे कपटनाटक करून मानवतेची वंचना करणें इष्ट वाटलें नाहीं

वामनानें त्रिपादभूमि दान मागून घेतली, दोन पायानें स्वर्ग आणि मृत्युलोक व्यापून टाकला व तिसरा पाय बलीराजाच्या शिरावर ठेवून त्याला पाताळांत घातलें. बली हा विश्वाच्या बुडाशीं असलेल्या चित् शक्तीचें प्रतीक आणि खुरटलेला बटुवामन याचकवृत्ति धारण करून जगाच्या पाठीवर मोकाट पसरलेल्या लोकसमूहरूपी मेंढरांचे प्रतिनिधित्व करीत होता. त्याच्या त्रिपादाचा विस्तार या लोकसमूहाच्या संख्येचा विस्तार दर्शवितो. जगाच्या दृष्टीनें बली पराभूत झाला नि वामन विजयी झाला पण त्या वामनाच्या अंतःकरणाला विचारले म्हणजे याचे खरें उत्तर मिळेल. वामनाचा अवतार संपला व प्रक्षुब्ध झालेल्या सागराच्या लाटावर आलेला फेस ज्याप्रमाणें वादळ संपतांक्षणींच त्या विशाल जलोदरांत लुप्त होऊन जातो त्या प्रमाणेंच दैवाच्या विपरित गतीनें उत्स्फूर्त झालेल्या जलसमूहांत तो वामन केव्हांच नाहींसा झाला पण पाताळचें राज्य अनंत कालपर्यंत उपभोगणारा बली अजून सुद्धां आपल्या भगिरथ प्रयत्नाचे संदेश जगाला पोहोंचवीत आहे. वरकरणीमात्र जगाला वाटलें अपूर्णत्वानें पूर्णत्वाला जिंकलें, मर्यादेनें अमर्यादाला गिळलें व सांतानें अनंताला आपल्या बाहुपाशांत बिद्ध केलें, लघुत्वानें गुरुत्वार मात केली आणि मानवजातीचा जडस्थिर जीवनाचा धोका नाहींसा झाला. लक्षावधि मेंढरांनीं झुडपाच्या जाळींत गांठून मृगराजाला कोंडून गुदमरवून ठार मारावें तशांतला हा प्रकार ! ही पौराणिक कथा जगाच्या इतिहासकाराला नेहमींच मार्गदर्शक ठरेल. बलीराजा गेला, पण त्याचा धर्म राहिला. त्या धर्माचा अणुरेणु बलीराज्याच्या पुण्याईनें वर्धमान होतहोत भारताच्या क्षितिजावर तळपत राहून साऱ्या भारतखंडाला तेजस्नात करूं लागला. तो प्रकाश दुःसह होऊन झाडाझुडपांतील घरट्यांत बसलेली दिवाभीतें त्या दिवाकराचा अस्त

झाल्याबरोबर हलकल्लोळ माजवून उठलीं आणि अज्ञानंधकारांत डोलत उभीं असलेलीं शुष्क अरण्यें त्यांनीं जागविलीं. हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या निष्पर्ण वनांतील पक्षांनीं त्यांना पुढारी मिळवून दिला व बलीराजाच्या पुण्याईचा नाश करण्याकरितां **बुद्धाचा** अवतार झाला. त्याचें कार्य आपणांस माहीतच आहे. पूर्व युगांतल्या वामनाची सुधारून वाढविलेली व्यवहारी आवृत्ति म्हणजे कलियुगांतील बुद्ध. मानवतेचा विकास करून त्याला पूर्ण ब्रह्माशीं एकरूप करण्यांकरतां झटणाऱ्या प्रवृत्तीचें प्रतीक म्हणजे बली आणि विजिगीषु आर्यांचा वर्धिष्णु जयिष्णु बलोपासक सनातन वैदिक धर्म आणि मनुष्याच्या लघुत्वाला परागति आणि संकोच यांच्या श्रेणीनें शून्यांत नेऊन लुप्त करणारी निवृत्तिमय विचार परंपरा म्हणजे गौतमबुद्धाचा धर्म. लोक समाजाच्या मनोधारणेशीं अनुकुल असल्या मुळें त्याची झपाट्यानें वाढ झाली व सूर्याला ग्रासणाऱ्या राहूकेतू प्रमाणें आपली अमंगल दाट छाया त्यानें दीर्घ कालपर्यंत भारताच्या क्षितिजावर पसरून ठेविली. जगांत आजवर निर्माण झालेल्या सर्व महात्म्यांना याच बलीराजाचें वंशज म्हणावयास हरकत नाहीं. प्रवृत्तिमार्गानें मानवोद्धाराची जागती ज्योत राष्ट्राराष्ट्रांत आणि भिन्नभिन्न कालखंडांत तेववणारे हे विश्वसागरांतील दीपस्तंभच होत.

सामान्य जनसमूहाला न कळत त्यांच्या हातून घडणाऱ्या प्रतिगामी नि प्रतिक्रियात्मक चळवळी कशा कार्य करतात याचें एक चांगलें उदाहरण अथेन्सच्या **ॲरिस्टाइड्सचे** आहे. हा अथेन्समधील एक प्रमुख पुढारी, सेनानी नि मुत्सदी होता. याचा सर्वांत मोठा दोष हा कीं यानें आपल्या तत्त्वनिष्ठेच्या समोर लोकमताची कधीं पर्वा केली नाहीं. या दोषाचें प्रायश्चित्त त्याला लौकरच भोगावें लागलें. अथेन्सच्या अधिकारीवर्गानें त्याला हद्दपार करण्याचें ठरविलें

व त्या करतां तेथील घटना नियमानुसार अथेन्सच्या नागरिकांची मत-मोजणी केली. मतदानाच्या दिवशीं सुद्धां ॲरिस्टाईड्स्‌नें आपल्या कृत्याचें समर्थन करून प्रचाराच्या सहाय्यानें लोकगंगेचा प्रवाह आपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न केला नाहीं. आपल्या देशभक्तीचा नि सत्यप्रियतेचा अभिमान त्याला बाजार बुणग्यांच्या कपटमार्गानें जाऊं देईना. मतदानाच्या दिवशीं रस्त्यांतच एक, अशिक्षित . खेडूत ॲरिस्टाईड्स्‌ला भेटला व त्यानें त्याला न ओळखून एका कोऱ्या कागदाच्या चिटोऱ्यावर ॲरिस्टाईड्स्‌चे नांव लिहिण्याची विनंती केली. अरिस्टाईड्स्‌चा व त्याचा खालील प्रमाणें संवाद झाला.

ॲरिस्टाईड्स्:— कां रे बाबा, हे नांव तुला कशा करतां पाहिजे ?

खेडूत:— अहो तुम्हांला माहीत नाहीं ! आज ॲरिस्टाईड्सच्या हद्दपारीच्या ठरावाची मतमोजणी आहे व मी त्या संबंधी मत देण्याकरतां आलों आहे. ॲरिस्टा-ईड्स्‌ला हद्दपार करावें असें माझेंहि मत आहे.

ॲ०: — तूं ॲ० ला पाहिले आहेस काय ? तुला त्याच्या विषयीं काय माहीती आहे व त्याचा काय अपराध आहे हें ठाऊक आहे काय ?

खेडूत:— नाहीं महाराज, मी त्याला जन्मांत कधीं पाहिलें नाहीं. व मला त्याच्या कार्याची माहीती पण नाहीं पण मी त्याचे नांव इतक्यांदा ऐकिलें आहे कीं त्याचा सदैव उदो उदो ऐकून मला त्याचा कंटाळा आला आहे. कोणाहि माणसानें इतकें सामर्थ्यावान बनावें याची मला चीड आहे व हाच त्याचा अपराध !

ॲ०:—असें असेल तर कांहीं हरकत नाहीं. माझ्या अपराधाची शिक्षा म्हणून नव्हे तर माझ्या सत्कार्याचें पारितोषिक म्हणून जर हे फळ मला मिळणार असेल व यांतच अथेनियन जनतेचा संतोष असेल तर मी मोठ्या आनंदानें हद्दपारी भोगण्यास तयार आहे.

पुढें खरोखरीच त्या मतमोजणींत बहुमतानें ॲ. ला हद्दपार करण्याचें ठरलें. व बहुजन समाजाला विभूतिमत्वाबद्दल उपजतच असणारा तिट्कारा सक्रीयतेनें व्यक्त झाला. ग्रीस आणि रोमच्या लोकशाहींतच नव्हे तर अद्यावत् सुधारलेल्या लोकशाहींतहि असलीं मासलेवाईक उदाहरणें पुष्कळ सांपडतील. तत्त्वनिष्ठा व लोकमतानुवर्तित्व असा पेंच पडला असतां जे हटकून तत्त्वाची बाजू घेतात त्यांना लोकमताच्या विरोधांत आपला सर्वनाश करून घ्यावा लागतो हा नेहमींचाच अनुभव आहे. अर्थात् येथें एखादा **चतुरसाबाजी** अशी शंका उपस्थित करील कीं ज्या महाभागांची नरश्रेष्ठ म्हणून एवढी स्तुती केली जाते व ज्यांनीं सार्वजनिक कार्य करून लोकोद्धाराचा चंग बांधला आहे त्यांना क्षुद्र लोकांच्या मतप्रवाहाला आपल्याकडे वळवून घेतां येऊं नये ही त्यांच्या मोठेपणाला कमीपणा आणणारी गोष्ट नव्हे काय? ज्या तत्त्वज्ञानाला व्यवहाराची मुरड नाहीं व ज्या कर्तबगारीला मुत्सद्देगिरीची जोड नाहीं ती जगांत सफल तरी कशी होणार व त्याच्या अपयशाचें खापर लोकमतावर फोडून नसता गहजब करण्याचें कारण काय? हा युक्तिवाद सकृत्दर्शनी फार समर्पक वाटेल पण सूक्ष्मतर्काच्या कसोटीवर याचें पितळ फार लौकर बाहेर पडेल.

पाण्यांत राहून कमलपत्राप्रमाणें कोरडें राहण्याची कला प्राप्त करून घेतल्याशिवाय या मायावी जगांत आपली बुद्धि ठिकाणावर ठेवून काम करणें अशक्य आहे. चिखलांत जन्मलेलें कमळ आपल्या सौगंधानें भोंवतालच्या पाण्यांतच काय पण आसमंतांतील वायूला सुद्धां सुगंधी करून टाकतें पण त्याच्या मुळाशीं वास करणाऱ्या चिखलाला मात्र या वासाचा मागमूसहि लागत नाहीं. तद्वतच् सामान्य जनसमूहांतच सामान्य मानवाप्रमाणेंच ज्याचा जन्म झाला असे महापुरुष आपल्या दिव्य कार्यानें सगळ्या जगाला प्रकाशित करीत असतां व अहर्निश लोकोद्धाराच्या कार्यानें व्याप्त झाले असतां लोकांच्या व्यवहारी वाणीज्यबुद्धीचा संपर्कहि स्वत:ला लागूं देत नाहींत हेंच त्यांचें वैशिष्ट्य होय. लोकमन-गंगेच्या प्रवाहाला आपल्या कौशल्यानें धरण बांधून आटोक्यांत ठेवणें व मन मानेल तसें त्याला वळविणें हे त्यांना अवघड आहे अशांतला भाग नाहीं पण जो एकदां लोकानुरंजनाच्या मागें लागला तो त्यांत वाहून गेल्याशिवाय राहत नाहीं. मायेचें स्वरुप जाणण्याकरतां मायेच्या उदरांत शिरणारा सिद्धपुरुष गोरक्षनाथ मायेवर मात करण्याऐवजी स्त्रीराज्यांत शिरून स्वत:च मायेच्या मोहांत गुरफटला व सदैव गुरुचरणावर खिळलेली त्याची दृष्टि गुरुच्या भ्रामक शृंगार लीला पाहून बावरली, तर जो सिद्धीच्या महाद्वारासमोर उभें राहून केवळ पादस्पर्शाचीच महत्वाकांक्षा ठेवतो व त्या करतां खडतर तपश्चर्या करीत आहे अशा वीरांना मोहित केल्याशिवाय ती माया कशी राहील ? ब्राह्मण पत्नीच्या प्रश्नांना उत्तर देतां यावें म्हणून संसार शास्त्रांतील गहन विषयांचें ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां कायाकल्पाच्या सहाय्यानें मृतराजाच्या शरीरांत श्री आद्य **शंकराचार्यांनीं** प्रवेश करून घेतला नि पुन्हां मायेपासून

अलिप्त राहून आपल्या योगाची पूर्तता केली. पण असलें कार्य परमेश्वर स्वरूप ब्रह्मज्ञानी आचार्यांनाच साधणार. जगांतले पुरुषोत्तम कितीहि श्रेष्ठ झाले तरी ते केवळ साधक मग सिद्धांची बरोबरी कोठून करणार ? श्रीरामचंद्राच्या स्वरूपांत प्रत्यक्ष परमेश्वरानें अवतार घेऊन कठोर तत्त्वनिष्ठेपासून यत्किंचितहि विचलित न होतां लोकानुरंजन साध्य करून दाखविलें व जगासमोर राजर्षिचा दैवी आदर्श ठेवला हें खरें पण ही लीला परमेश्वराचीच ! मानवांतील केवढ्याहि मोठ्या वीराला हे ध्येय अल्पांशानेंहि साध्य होणें अशक्य. लोकमतांशी एकरूप होऊन अथवा क्षणाकरतां त्या समोर मान वांकवून त्याला जिंकण्याचा प्रयत्न करणें पाण्याच्या प्रवाहाशीं समदिश होऊन त्याला वळविण्याचा प्रयत्न करण्यासारखें हास्यास्पद होय. उलट त्याचा प्रतिरोध करतां क्षणींच त्याची शक्ति वाढून आपल्या आक्रमक स्वरूपांत तो प्रवाह धरणाशीं टक्कर देणार. दुसरी मुख्य अडचण ही कीं वीर श्रेष्ठांचें सारेंच सामर्थ्य आपल्या ध्येयसिद्धीसाठीं राखून ठेवलेलें असतें. ज्या लोकांच्या उद्धारासाठीं शस्त्र हातीं घेतलेलें त्यांच्यावरच तत्त्वरक्षणाकरतां तें चालविण्याची वेळ आली तर त्या खड्गाची धार सौम्य होणें साहजिक आहे. मोठमोठ्या लाकडी नाटा कोरून त्याचें पीठ करून टाकणाऱ्या भ्रमराला रात्रभर आपल्या बाहुपाशांत बद्ध करून गुदमरून टाकणाऱ्या कमलपत्रांचा प्रतिकार करतां येत नाहीं असें थोडेंच, पण त्याच्या अंतःकरणाची सौम्यता त्याला तसे करूं देत नाहीं हें मात्र खरें, तद्वतच् "बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें" अशा प्रतिज्ञेनें ज्यांनीं लोकोद्धाराचें कंकण हातीं बांधलें त्यांनीं आपल्या तत्त्वाला अगर धर्माला प्रत्यक्ष शत्रूची भूमिका घेऊन विरोध करणाऱ्या आपल्याच

वापरावी ? अविवेच्या भावानें उन्मत्त झालेल्या आणि आपल्या बुद्धीचें द्वार ज्ञानाला बंद करणाऱ्या मूढ शिष्याला गुरूनें ताडन केलें तरी त्याची तीव्रता किती असणार ? राजकीय निर्बंधाचा भंग करण्याच्या अपराधाचा बदला देहदंडानें घेऊन आपल्या मार्गातील कांटा दूर करणाऱ्या राजशासनाची बरोबरी त्याला कधींच येणार नाहीं. अधर्मी पण स्वकीय यांच्याबद्दल वाटणारें प्रेम आणि अंतःकरणांतील दयेची दुर्बलता ही मायामोहाचा परिणाम आहे असें सांगून "युद्धस्व जेतासि रणे स्वपत्नान्" हा आदेश प्रत्यक्ष भगवंतांनीं दिल्यावरोबर कुरुक्षेत्रांत ईश्वरी इच्छेला विरोध करण्याकरतां उभे राहिलेल्या अकरा आक्षौहिणी सैन्याचा वीरश्रेष्ठ अर्जुनानें संहार करून दाखविला हाच आदर्श समोर ठेवून खऱ्या क्रांतिवीरानें वागावयास पाहिजे पण अर्जुनासारखा वीर आणि सर्वसाक्षी, सर्वशक्तीमान असा श्रीकृष्ण परमात्मा पाठीराखा असा जगांत पुन्हा केव्हां प्राप्त होणार ! एऱ्हवीं प्रत्येक वीरश्रेष्ठानें हे कार्य हातीं घेण्यासारखे नाहीं. विरोधकांचा प्रतिकार करतां करतां सर्व शक्तीचा ऱ्हास झाला म्हणजे अंगीकृत ध्येयाचें कार्य कुणी व कसें पूर्ण करावयाचें व अखिल मानव जातीचा विरोधक म्हणून संहार केल्यावर तें कार्य तरी कुणाकरतां करावयाचें ? एकूण कार्य तर लोकमतानुवर्ती राहूनहि नाहीं व लोकमतविरोधा बरोबरच विरोधकांचेंहि विध्वंसन करूनहि नव्हे तर केवळ अन्यायाचा प्रतिकार, सत्त्वावर आधारलेल्या आत्मिक मार्गानें करून आत्मबलिदानानेंच इच्छित हेतू पूर्ण झाला, तर झाला, हें जाणून सहस्रावधि महात्म्यांनी आपल्या आयुष्याची आहुति या लढ्यांत दिली आहे. लोकरंजनाचें कार्य किती खडतर आहे याची कल्पना तुकाराम महाराजांच्या खालील अभंगावरून स्पष्ट येईल.—

ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतित पावना देवराया ॥
धर्म करी त्याला उधळा म्हणती । न केल्या म्हणती पोट-पोशा ।
आचार करितां म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदिनाती ।
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ।
धन नाहीं यासि ठायींचा करंटा । समर्थासि ताठा लाविताती ।
बहुबोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणतीं गर्वी ।
लोक जमा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संत–संग ।
तुका म्हणे आतां ऐकावें वचन । त्यजूनिया जन भक्ति करा ॥

सामान्य व्यवहारांतल्या निरुपद्रवी माणसाची जर तुकोबांनी वर सांगितल्याप्रमाणें कुचंबणा होते तर आपल्या सामर्थ्यानें समाजांत विशेष प्रकारचें आंदोलन निर्माण करून त्याच्या आयुष्याचा रूढ वहीवाटीचा मार्ग त्यांना सोडायला लावूं पहाणाऱ्या महाभागांचीं काय अवस्था होत असेल याची कल्पनाच केलेली बरी !

संस्कृतीच्या महायज्ञांत ज्यांनी आपली आहुति दिली त्यांचें आत्मार्पण वाया गेलें नाहीं तर त्यांच्या पुण्याईनेंच सांस्कृतिक प्रगतीच्या मार्गावर मानवतेचें एकेक पाऊल पुढें पडत चाललें आहे.

मानवतेला उच्चतेकडे नेणारी कोणतीहि चळवळ सामान्य जनसमूहाला आवरत नमण्याचें कारण स्वाभाविक दुर्बलतेखेरीज दुसरेंहि एक आहे व तें हें कीं निसर्गनिर्मित सातत्यभावनेनें भारला गेलेला समाज उन्मार्गगामी प्रगतिपेक्षां प्रसरणशील विस्ताराची जास्त इच्छा करतो. या प्रवृत्तिमुळेंच त्याग, तप, संयम, आणि पार्थिव जीवनाचा संकोच यांतून मार्ग काढीत अतिमानवतेकडे नेणारा संप्रदाय त्याच्या मनाला पटूं शकत नाहीं. उंच जागेवर पडलेलें पाणी चोंहोंबाजूंनीं निसरून खोलीकडे धांव घेते व जेवढे मोकळें सपाट मैदान सांपडेल

तेवढ्यावर पसरण्याचा प्रयत्न करतें त्या प्रमाणेंच मनुष्याची सामान्य प्रवृत्ति आहे. उच्चतेपेक्षां समानता, संस्कृतिपेक्षां प्राकृतता आणि एकत्वापेक्षां अनेकता याला जास्त प्रिय आहे. मानववंशाचा विस्तार व्हावा, बहुविध रंगानें नटलेले त्याचे आयुष्य सुखोपभोगाच्या संथ प्रवाहांत दीर्घकालपर्यंत वाहात जावें व निसर्गाच्या बहुविध रंगानें रंगून नाचत बागडत ही आयुष्याची रम्य रात्र घालवावी एवढींच त्याची महात्त्वाकांक्षा ! आपणाशीं समानशील असलेल्या लोकांची संख्या वाढवीत राहाणें, सृष्टींतील उपभोगाची साधनें सदैव आपल्या हातांत ठेवणें व युगायुगांतून अधिकाधिक लघुत्व व विस्तार यांनीं युक्त होऊन निसर्गावर विजय मिळविण्याचा लढा आपल्या श्रेष्ठतेनें नव्हे तर आपल्या संघटित बलाच्या जोरावर बाह्य साधनांनीं चालवित राहाणें हींच त्याची महत्त्वाकांक्षा ! जों जों काळ क्रमत चालला तों तों मनुष्य ऱ्हास पावून लघुतर होत चालला आहे हे सर्व इतिहासकारांना मान्य आहे. पण त्याबरोबरच या ऱ्हासाचा परिणाम म्हणूनच कळप करून राहाण्याची त्याची प्रवृत्ति अत्यंत विकसित झाली आणि स्वसंरक्षणार्थ ज्या समाजाचा त्यानें आश्रय घेतला त्या समाजसंघटनेचा विकास करूनच आपल्या संस्कृतीची मोहीम त्यानें चालू ठेविली. आज तरी मानवाच्या संस्कृतीची इमारत सर्वस्वीं समाज संघटनेच्या पायावरच आधारलेली आहे. त्याला दुसरा आधार नाहीं. मनुष्याचें वैयक्तिक जीवन त्याच्या सामाजिक जीवनाशीं एकरूप झालें आहे. त्याची वैयक्तिक शक्ति सामाजिक शक्तीचें केवळ एक प्रतिबिंब आहे. व याच्या इच्छा, आकांक्षा व ध्येयें समाजपरिस्थितीशीं इतके निगडीत नि त्याशीं सापेक्ष आहेत कीं त्या समाजवर्तुळाच्या बाहेर त्यांना अस्तित्वच नाहीं. एखाद्या अवाढव्य यंत्राच्या कोनाकोपऱ्यांतील क्षुद्र खिळ्याचें स्थान त्याला

प्राप्त झालें आहे. कसें जगावें ह्या एका प्रश्नाची वासलात लावण्यांत सबंध मानव जातीच्या प्रयत्नाची पुरेवाट होऊन जाते याला कारण या विशिष्ट प्रकारच्या संघटनाच होत. गेल्या हजारों वर्षांपासून या एकाच प्रश्नावर हजारों रणें माजलीं, अनेक युद्धें झालीं, क्रांत्या झाल्या, रक्ताचे पाट वाहिले व कसें जगावें या विषयांवर मतभेद झाल्यामुळें बापानें मुलाचा व भावानें भावाचा खून पाडला. नुसती जगण्याची व्यवस्था लावण्यांतच मनुष्यजातीनें आजपर्यंतचा दीर्घकाल खर्ची घातला. अजूनहि हा प्रश्न अनिर्णीतच राहिला. दरवर्षी जन्माला येऊन मनुष्याच्या लोकसंख्येंत भरमसाट भर टाकणाऱ्या प्रत्येक नवीन पिढीनें या प्रश्नाला फाजील महत्व आणून दिलें. दर पिढीला खुरटत जाणाऱ्या व जास्त जास्त दुर्बल होणाऱ्या मानवजातीला समाजसंघटनेचा प्रश्न जीवन मरणा इतक्या महत्त्वाचा वाटूं लागला. या सर्व परंपरेचा परिणाम असा झाला कीं व्यक्तीपेक्षां समाजाचे महत्त्व अपरंपार वाढलें. व व्यक्तिमात्राच्या शक्तीवरचा विश्वास स्वतःच्या न्यूनगंडामुळें कायमचा उडून गेला. या अविश्वासामुळें संशय व संशयामुळें भीति हे विकार उत्पन्न होऊन बहुसंख्य समाजाच्या शक्तींतच आपली सुरक्षितता आहे ही भावना वाढीस लागली. यामुळें व राजकीय क्षेत्रांत लोकशाही, धार्मिक क्षेत्रांत रूढीधर्म व निवृत्ति, सामाजिक क्षेत्रांत समानता व ज्ञानाच्या क्षेत्रांत उपयुक्ततावाद या गोष्टींचा प्रादुर्भाव झाला. प्रकाशाचा झोत केवळ डोळ्यांनाच असह्य होतो म्हणून नव्हे तर त्या प्रकाशांत आपली खुरटलेली वेडी वांकडी व नागडी उघडी शरीरें एकमेकांना दिसतील व परस्परांच्या कळाहीन व्यक्तित्वाकडे पाहून आपणांस लाज वाटेल या भीतीमुळें अंधारांत चांचपडत पडलेल्या या मानवजातीला अतिमानवाच्या निर्मितीची

कल्पनासुद्धां आपल्या जीवनाला मारक वाटते. वास्तविक जगाच्या पाठीवर हजारो वर्षे जगून सृष्टीचा मनमानेल तसा उपभोग पाव-साळ्याच्या आरंभी हजारोंच्या संख्येंत उकिरड्यावर उगवून अल्पावकाशांत नष्ट होणाऱ्या कुत्र्याच्या छत्र्याप्रमाणें ही मानव जात अशीच नष्ट होऊन गेली तर त्याचें जगाला काय होय ? केवळ संख्येचा विस्तार करून व निरानिराळ्या प्रकारच्या क्रीडा व कलह यांत निमग्न होऊन मानवजातीला आपला जीवन हेतु कधींहि साध्य करतां येणार नाहीं. विश्वाच्या अणुरेणूंत जी गतिमानता आहे ती त्यांना अनंत-कालच्या अवकाशांतून सतत पूर्णत्वाकडे नेत असल्यामुळें विकास, शक्तिमत्ता, व वर्धिष्णु नि जयिष्णु पद्धतीनें प्राप्त करून घेतलेली परिणती या परंपरेंतून मनुष्यमात्राला गेलेंच पाहिजे. आपल्या प्राथमिक अव-स्थेंत निसर्गाच्या नंदनवनांत हताशपणें संरक्षणासाठीं देवाची आराधना करीत बसलेल्या दुबळ्या अज्ञानि मानवाच्या अवस्थेपासून विकास पावून आपल्या तपाच्या जोरावर, बाह्य निसर्गावरच नव्हे तर आपल्या आंतरिक निसर्गावर, साऱ्या सृष्टीवर, दिक् आणि काल यांच्या बंधना-वर विजय मिळविणारा अतिमानव जर निर्माण करतां आला नाहीं तर या साऱ्या मानववंशाचा, संस्कृतीचा, समाजसंघटनेचा, व भौतिक शास्त्रांतील या प्रगतीचा आपणांस काय उपयोग ? आपल्या खऱ्या ध्येयाकडे आपल्याला नेऊं शकेल अशी समाजरचना, अशीच संस्कृति व असेंच ज्ञान मानवाला प्रदान करण्याकरितां आजपर्यंत जे जे मोठ-मोठे महापुरुष जगांत होऊन गेले ते सर्व भावी कालांत उदयाला येणाऱ्या त्या अतिमानवाचीच बाल्यावस्थेंतील भिन्नभिन्न रूपें होत परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं जो जो बहुजनसमाजाच्या लौकीकी संस्कृतीची वाढ होत चालली आणि आंतरराष्ट्रीय समाज-संघटनेची व सामान्य जनसमूहाच्या मनोप्रवृत्तीचें पुढारीपण करणारी सांस्कृतिक

संघटना जगांत उत्तरोत्तर वाढत चालली तों तों अतिमानवतेच्या सिध्यर्थ जगांत निर्माण होणाऱ्या प्रत्येक वीरपुरुषाला विरोध करण्याची प्राकृत समाजाची शक्ति ही वाढत चालली. जशी जशी ही विरोधाची शक्ति वाढत जाणार तशी तशी एकापेक्षां एक प्रखर वीरांची परंपरा निर्माण होत राहील हें खरें पण या भयंकर कलहामुळें जगाची खरीखुरी प्रगती सारखी लांबणीवर पडत चालली आहे.

बहुजनसमाजाच्या लौकिकी संस्कृतीचें स्वरूप कलहभोगाचें असते. व्यक्तिव्यक्तिच्या भोगलालसेंतून कलह निर्माण होणें साहजिक आहे. व्यक्तिमात्राच्या परस्पर कलहांतून आंतरसामाजिक कलह व सामाजिक कलहांतून राजकीय, वांशिक नि आर्थिक स्वरूपाचे अनेकविध कलह निर्माण होत राहतात. मानवाचें सारें शक्तिसर्वस्व या कलहाच्या पायींच वेंचिलें जातें. व या कलहावरच मानवी जीवित केंद्रित करण्याचा कार्यक्रम आंखणें यावरच लौकिकी संस्कृतीचें अधिष्ठान आहे. आंधळ्या भौतिक वादाच्या पार्श्वभूमीवर दुबळ्या नि विकृत अध्यात्म-वादाची स्फूर्ति घेऊन उभारल्या जाणाऱ्या या कलहात्मक संस्कृतिनें मानवाचें हित कसें साधलें जाणार? भौतिक सामर्थ्याचा प्रभू होण्या-ऐवजीं त्याचा दास होणारा मानव वरचेवर अधिक यांत्रिक, अधिक अवनत व लघुतर होत चालला आहे. जीवन कलहाचें तुटपुंजे लढे लढण्यांत आयुष्याची अर्धी शक्ति खर्च करून बाकी राहिलेले अर्धे सामर्थ्य समाजाच्या राजकीय कलहांत खर्च करीत राहाणें हाच आधुनिक मानवाचा व्यवसाय बनला आहे. वास्तविक भौतिक विकासानें मानवाचें सामर्थ्य वाढणें हें प्रगतीच्या दृष्टीनें अत्यंत हितावह असतांहि त्याचे असे दुष्परिणाम व्हावे हे एक मोठें कोडें आहे. भौतिक शास्त्राच्या सामर्थ्यानें एकाद्या विशिष्ठ मानव समाजाची संहारक नि उपभोगात्मक शक्ति वाढत असतां त्याचवेळीं त्या समाजांतील

व्यक्ति मात्र दुर्बल, पंगु आणि आंतरिक निसर्गाच्या हातांतील बाहुलीं बनत जातात किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं स्वभावत:च कालाच्या प्रभावानें आणि लौकिकी संस्कृतीच्या परागतिकरणानें दुर्बल बनलेल्या मनुष्यमात्राला हें भौतिक सामर्थ्य आटोक्यांत ठेवून पचविणें अशक्य झालें आहे. या संस्कृतींतील अजून एक मुख्य वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या विचार परंपरेंतील नानाविध तर्काभास व तत्त्वाभास होय. दंभ आणि विसंगति याच्या मोहक रंगांतच बहुजनसमाजाचें सारें तत्त्वज्ञान रंगून गेलेलें असतें. समानता, स्वातंत्र्य, सत्य, अहिंसा, आत्मविकास, संघटना व समाजहित या भ्रामक नि ढोंगी ध्येयाच्या नांवाखालीं त्यांच्या सर्व चळवळी चालू असतात. युगानुयुगांतन शेंकडों वेळेस या ध्येयांच्या प्राप्त्यर्थ बहुजन-समाजाचें सामुदायिक उत्थान झाल्याचा देखावा इतिहासकाराला दिसतो. ध्येयसिद्धीसाटीं संघटित प्रयत्नांची पराकाष्ठा झाली असें वाटूं लागतें. पण स्वप्नांत बराच वेळपर्यंत पळत राहिलेला मनुष्य जसा दीर्घ कालानंतरहि जेथला तेथेंच राहातो. स्थिरत्वावर गति-मानतेचा केवळ आभास निर्माण होतो. पण साहारा वाळवंटांत तहानेनें व्याकूळ झालेल्या जीवाला ज्याप्रमाणें अनेक योजनें पाण्या-मागें धांवत जाऊनसुध्दां पाणी मिळत नाहीं व प्रत्यहीं मृगजळानें निर्माण झालेल्या अशा वाळूच्या ढिगाऱ्यावर आदळून भंग पावतात त्याप्रमाणेंच या लोकसमाजाला आपले इच्छित ध्येय कितीहि जवळ दिसत असलें तरी तें सारखें दूर धांवत आहे. कारण जवळचा समुद्रकिनारा सोडून वाळवंटाच्या अंतर भागांत शिरणाऱ्या वेड्या पीराप्रमाणें समाजानें भलताच मार्ग पत्करला. व ज्या मार्गाचा आरंभच चूक, मार्ग आक्रमण्याची रीतहि चुकीची तो मार्ग कधींच संपणार नाहीं व तें ध्येय खरोखर कधींच दृष्टीच्या टप्प्यांत येणार

नाहीं. शतकानुशतकाच्या अबाढव्य उलाढाली नंतरहि बहुजन समाजाच्या उन्नतीचें राहाट गाडगें सातत्य, विस्तार आणि लघुमानवता या चक्राभोंवतीच फिरत राहिलें आहे. ज्याला बहुजनसमाजाच्या पुरस्कर्त्यांनीं समानता हें गोड नांव दिलें त्याचा खरा अर्थ हीनता आहे. कारण मानवतेनें आपल्या दीर्घ तपश्चर्येनें प्राप्त करून घेतलेलें अथवा जें निःसंशय प्राप्त करून घेतलेंच पाहिजे त्या पदाला सर्व मानवजात जाऊन पोंहोंचली पाहिजे आणि त्या श्रेष्ठत्वाच्या अमर्याद क्षेत्रांत अखिल मानवजातीला परस्परांशीं समानता लाभावी हा लौकिकी संस्कृतीचा कधींच उद्देश नव्हता. तर उलट आपणाहून जें मोठे त्यांनाहि लहान करा, ज्यांच्यांत तेज असेल त्यांचें हिरावून घ्या, जेथें प्रकाश असेल तेथें आपल्या अज्ञानरूपी तिमिरजालाची चोहोंबाजूनें गर्दी उसळून त्याला आच्छादित करा. व आपल्या बहुमताच्या धूम्र व्याप्तीनें एखाद्या तत्त्वमंदिरांत तेवत असलेली प्रकाश ज्योत मालवून टाका, जो जो अभ्युदय, निःश्रेयस, अथवा अति श्रेष्ठत्व याच्या उंच उंच पायऱ्या चढू लागला असेल त्याला आपल्या उच्चस्थानापासून खालीं ओढा व सर्वांना आपल्या सारखें करा, आपल्या अज्ञानंधकाराच्या काळ्याकुट्ट साम्राज्यांत आंधळेपणाने अखिल मानवजात समानशील होवो हाच त्या संस्कृतीचा आदेश आहे. प्रागतिकतेमुळें निर्माण होणारी असमानता काढून तिच्या ऐवजीं अधःपातानें निर्माण होणारी समानता प्रस्थापित करणें हाच लौकिकी संस्कृतींतील समानतेच्या तत्त्वज्ञानाचा खरा अर्थ आहे. यःकश्चित् मूठभर मातीपासून ज्याचें शरीर बनविलें त्याला अग्नीच्या दिव्यमय शरीरानें अलंकृत झालेल्या देवदूतापेक्षांहि श्रेष्ठपद दिल्याबद्दल संतापून परमेश्वराशीं युद्ध करण्यास सज्ज झालेल्या सैतानानें समानतेच्या याच महायंत्राची घोषणा केली

होती. त्याच मायावी विकृतींचें कार्य भूतलावर हे लोकसमाज पुढें चालवित आहेत. सामान्य व्यवहारांतसुद्धां श्रेष्ठपदाला पोंहोंचणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा हेवादेवा करण्यास त्याच्या भोंवतालची मंडळी सदैव सज्ज असतात व वैयक्तिक चढाओढीच्या शर्यतीसुद्धां आपण दुसऱ्याच्यापुढें जाण्यापेक्षां दुसऱ्याला आपल्यामागें ढकलण्याची जास्त इच्छा असते. हीच प्रवृत्ति विकसित आणि संघटित स्वरुपांत बहुजनसमाजाच्या महत् विरोधी कार्याला चालना देत असते. जी गोष्ट व्यक्तीची तीच गोष्ट समाजाची. व्यक्तीची उन्नति व्यक्तीला पाहावत नाही. खाजगी जीवनाच्या मर्यादा ओलांडून जेव्हां एखाद्या व्यक्तीचें महत्त्व संपूर्ण समाजाला जाणवतें व त्या व्यक्तीच्या पाठीमागें एखादें वीरत्वपूर्ण तत्त्व असल्याचा समाजाला संशय येतो तेव्हां बहुजनसमाज आपल्या साऱ्या शक्तीनिशीं तात्काळ त्याच्या विरोधाला सज्ज होतो. यदाकदाचित् तेवढ्या विशिष्ट समाजाच्या विरोधाला न जुमानता व आपल्या शौर्यतेजानें त्यांना दिपवून आपले अनुयायी बनवून त्या समाजासकट ती व्यक्ति महत्पदाच्या मार्गावर चढूं लागते तेव्हां जगांतील इतर समाज आपल्या निसर्गसिद्ध प्रवृत्तीनुसार चहूं बाजूंनीं त्या समाजावर हल्ला करतात. अर्थात् या दोन्ही समाजांतील बहुजनसमाजांत यत्किंचितहि द्वेष भावना नसते व या कलहाच्या बुडाशीं व्यक्तिगत वैराचा पायाहि नसतो. वरवर असलीं कारणें जरी दिसलीं तरी तीं निमित्त मात्र होत, उपादान कारण नाहीं. याच नियमानुसार ग्रीक राज्यें नष्ट झालीं रोमन साम्राज्यावर रानटी **गॉथ** टोळ्यांनीं हल्ला करून रोमची संस्कृति बेचिराग केली व इकडे भरतखंडांत सर्व जगांतल्या असुसंस्कृत, अज्ञानी पण पाशवी मानववंशानें शतकानुशतक पर्यंत आक्रमण केलें व भारतीय संस्कृतीचें निर्मूलन नाहीं तरी भ्रष्टी-

करण करीपर्यंत विश्रांती घेतली नाहीं. आजच्या आधुनिक जगांतसुद्धां उत्कृष्ट संस्कृति, उच्च तत्त्वज्ञान, आदर्शसमाजरचना आणि उदात्त ध्येय, यांनी युक्त असलेली जर्मन महासंस्कृति नष्ट करून जर्मनीनें निर्माण करू घातलेल्या अतिमानवाला जन्मापूर्वीच नष्ट करण्याकरतां साऱ्या युरोपखंडाचीच नव्हे तर जगाची शक्ति त्यावर तुटून पडली. आधुनिक जपानसंबंधीं कृत्रिम उपायानें साऱ्या जगतांत या लौकिकी संस्कृतीच्या बाजारबुणग्यांनी निर्माण केलेली अत्यंतिक विरोधाची भावना ही याच निसर्ग प्रवृत्तीची द्योतक होय. जगांत चाललेल्या या घडामोडीला केवळ समानतेचें गोड नांव दिल्यानें त्याची उदात्तता सिद्ध होत नाही. तर्काभास नि तत्त्वाभास यावर अधिष्ठित झालेली विचार परंपरा जगांतील अनेक विचारवंताच्या बुद्धिलाहि संभ्रम पाडून मोठमोठ्या विद्वानांनाहि आपल्या ओघांत वाहून नेते. या कुटिल भावनांची स्पष्ट जाणीव कधींच न होईल अशा बेमालून रीतीनें या सर्व चळवळी आरंभ होतात व आपला संस्कृति विध्वंसनाचा लढा चालू ठेवतात. सारांश कनिष्ठांना श्रेष्ठजनांच्या पदाला नेऊन त्या श्रेष्ठ श्रेणींतील समानता संपादन करण्याऐवजी श्रेष्ठांनाच खालीं ओढून ' सब घोडे बारा टके ' करण्याकडे बहुजनसमाजाची प्रवृत्ति असते. युद्धकुशल सेनानीच्या नेतृत्वापेक्षां बाजारबुणग्यांच्या बेशिस्त हुल्लडीची आवड ही बहुजन समाजांत उपजत असते. अविद्येच्या मायामोहानें अंध झालेल्या शिष्याच्या बुद्धीनें ज्ञानप्रवेशाची जबरदस्ती करणाऱ्या गुरूचा किती तीव्रतेनें प्रतिकार केला हे पुराणांतील तद्विषयक कथेवरून स्पष्ट होऊं शकते. दिव्यत्वाला आपल्या जडबहुत्वानें आच्छादून हीनत्वाचा विस्तार करण्याचें कार्य समाजांत सतत चालू असतें. प्रखर तेजाने किंचित्काल दृष्टि दिपली व त्यासमोर मान

वांकविली तरी त्याच्या बुडाशीं आदरापेक्षां भीतीचीच भावना जास्त. व या भीतीच्याच पोटीं मत्सर, द्वेष, तिरस्कार, यांचा प्रादुर्भाव होऊन वाटेल त्या कपटी उपायानें या भीतिविषयाला नाहींसा करण्याकडे मनाचा कल होतो. बहुजनसमाजाचें सामान्यत्व हेंच त्याचें वैशिष्ट्यपूर्ण अंतरिक जीवनसूत्र असल्यामुळें त्या सामान्यत्वाला विरोध करणारी शक्ति निर्माण होतांच आपल्या जीवनावर आघात झाल्यासारखें बहुजनसमाजाला वाटतें म्हणूनच आम्ही बहुजनसमाजाच्या या प्रवृत्तीला पाण्याची समपातळी कायम ठेवणाच्या गुणाची उपमा दिली होती. " आपणां सारिखे करिती तात्काळ न लगे काळ वेळ तया लागीं " चें विधान लोकसमाजाच्या सर्व चळवळीला पूर्णपणें लागू पडते. पराक्रम आणि कर्तबगारीनें श्रेष्ठत्व संपादन करून आपला आत्मविकास करून घेणारांचा वर्ग मोठ्या संख्येंने समाजांत निर्माण होऊं शकावा अशी व्यवस्था ज्या समाजसंस्कृतीत असेल त्याबद्दल सामान्यिकांना नेहमीच तिटकारा वाटतो. मनुष्यमात्राच्या गुणकर्मानुसार त्याचें वर्णात्मक चार वर्ग पाडून प्रत्येक मनुष्याला पायरी पायरीनें आपला आत्मविकास करून घेत ज्ञान कर्माचें उच्चपद गाठतां येईल अशी समाजरचना ज्या संस्कृतीचें प्रधान अंग होते त्या संस्कृतीपेक्षां सबगोलंकार समानतेवर अधिष्ठित असलेली बौद्धांची अडाणी बेशिस्त जानपद संस्कृति भारतीयेतर हजारों मिश्रजातीच्या वर्णसंकरानें पदभ्रष्ट होऊन हीनत्वाला प्राप्त होणाऱ्या भारतीय बहुजनसमाजाला मनापासून पटली. ज्या संस्कृतींत ज्ञान, सद्गुण, पराक्रम इत्यादि गुणांना अतिशय महत्त्व असते व त्या गुणानुसार माणसांचा दर्जा वाढत जातो त्या संस्कृतीपेक्षां आपल्या अज्ञानानें आणि लघुत्वानें सर्व व्यक्ति समान बनल्या आहेत असल्या समाजरचनेचा आदर्श जानपद प्रवृत्तीला अधिक

आकर्षक व अनुकरणीय वाटतो. आधिभौतिक आयुष्याच्या पार्श्व-भूमीवर सर्व मानवांची समानता स्थापन करण्यापुरतीच ती गोष्ट मर्यादित असती तर त्यायोगें विशेष हानि झाली नसती. पण जेव्हां जेव्हां एखादी अलौकिक शक्ति उच्चत्वाने समाजांत व्यक्त होऊन कर्तबगार पुरुषांच्या रूपानें महत्पदाकडे चढूं लागते तेव्हां याच समानतेच्या आभासात्मक तत्त्वामुळें समाजाची प्रतिरोधक शक्ति जागृत होऊन त्या शक्तीचा नाश करण्याला सज्ज होते. Where all are fools it is crime to be wise ही म्हण केवळ ध्वन्यर्थानेंच नव्हे तर वाच्यर्थाने खरी ठरण्याची पाळी येते. **डारविनच्या** उत्क्रांति तत्त्वाचें स्पष्टीकरण करून सामाजिक इतिहासाची त्या तत्त्वावर मांडणी करणाऱ्या स्पेन्सरनें उत्क्रांति तत्त्वाची व्याख्या फार मार्मिकपणें केली आहे.

Evolution is an integration of matter and concomitant dissipation of motion; during which the matter passes from an indefinite, incoherent homogeneity to a definite, coherent heterogeneity, and during which the retained motion undergoes a parallel transformation. या व्याख्येंत सांगितल्याप्रमाणेंच आपल्याकडील सांख्यकारानेंहि विश्वाची उभारणी प्रकृती तत्त्वापासून कशी झाली हें दाखवितांना हेंच प्रतिपादन केलें आहे कीं आंधळ्या, निर्विकार नि एकत्वरूप समानशील असलेल्या प्रकृतींत विकार आणि विषमता हीं निर्माण झाल्या बरोबरच प्रकृतीची उत्क्रांति आरंभ झाली. या दृष्टीनें उत्क्रांतिपूर्व भेदातीत अवस्था ही अज्ञान युगाची निदर्शक आहे.

**हेगेलच्या** डायलेक्टिक मेथडचा आधार घेऊन बोलावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं मानवी समाजाला उत्क्रांतीकडे

ओढणाऱ्या शक्तीची प्रतिक्रियात्मक शक्ति म्हणजे बहुजन समाजाची उत्क्रांतिपूर्वकालची ओढ लागलेली प्रतिगामी मनःप्रवृत्ति होय. ही प्रवृत्ति तर्कशास्त्रांतल्या Antithesis [ प्रत्याघात ] ची भूमिका उठवीत असते. उत्क्रांतिपूर्वकालीन भेदातीत अवस्थेप्रमाणेंच उत्क्रांतीच्या परिणत अवस्थेंतहि आपल्या इकडील सांख्यमताप्रमाणें एक भेदातीत पुन्हा पुन्हां येत असते. या भेदातीत अवस्थेला जेव्हां आपण प्रकृतीची साम्यावस्था म्हणतो तेव्हां या संपूर्ण विश्वाची विलीनता त्यांत अभिप्रेत असते. आपल्या ज्ञानकर्माच्या बळावर पुरुष प्रकृतीचा भेद मिटवून सज्ञानावस्थेंत जी आत्मौपम्य साम्यावस्था निर्माण करण्याची जिवाला ओढ लागली आहे, ती अनंत कालानंतर प्राप्त होणारी ध्येयात्मक साम्यावस्था मानवाच्या आधिभौतिक जीवनाचें ध्येय बनूं शकत नाहीं आणि त्याचा विचार तूर्त कर्तव्य नाहीं. अशा स्थितींत आखिल मानवजातीची समानतारूपी साम्यावस्था ही केव्हांहि उत्क्रांति तत्वाशीं विसंगत आणि प्रतिगामी आहे हें केवळ तर्कानेंच नव्हें तर इतिहासांतल्या हजारों दाखल्यांनीं सहज सिद्ध-करण्यासारखें आहे. जगांतील निरनिराळ्या लोकसमाजानें जेव्हां जेव्हां अशी समानता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला तेव्हां तेव्हां श्रेष्ठत्वापासून हीनतेकडे, संस्कृतीकडून रानटीपणाकडे आणि सामर्थ्या-कडून दुर्बलतेकडे मानवाची पिछेहाट झाली आहे. समाजाचा उच्च आदर्श म्हणून समानतेचे ध्येय पुढें ठेवतांना उदात्त तत्त्वांचा आश्रय घेऊन केवळ तर्काभास उत्पन्न करण्यांत येतो. समाजाच्या परागतिला कारणीभूत होणाऱ्या व सांस्कृतिक अधःपतन करणाऱ्या लोकप्रिय समानतेपेक्षां लोक-समाजाला अप्रिय असलेली व निरनिराळ्या अंगो-पांगांनीं हटकून समाज-विकास घडवून आणणारी कठोर विषमता, इतिहासांत मानवाच्या उद्धाराकरितां जास्त सहाय्यक ठरली आहे.

हीनाशीं सहजासहजी मिळणाऱ्या समानतेपेक्षां दीर्घ प्रयत्नानें उच्च लोकांच्या सहवासांत प्राप्त होणारें विषम आणि खालच्या दर्जाचें स्थान हेंच प्रगतिप्रिय माणसाला जास्त श्रेयस्कर वाटलें पाहिजे. अध्यात्मवादी आत्म्याची जी उदात्त समानता आदर्श म्हणून दृष्टिसमोर ठेवतात ती समानता धन्य होय ! व्यवहारी जगांत त्या समानतेचा कांहीं संबंध नाहीं. तसेच जीवनोपयोगी साधनांच्या वाटणीच्या दृष्टीनें मानवामानवांत जी समानता प्रस्थापित व्हावयास पाहिजे तीहि एका मर्यादित अर्थानें क्षम्य ठरेल. पण जेव्हां या आधिभौतिक सामाजिक समानतेला बंदिस्त चौकटीचें स्वरूप देऊन महत्तम अशा व्यक्तिमात्राच्या उच्चत्वामुळें निर्माण होणारी विषमता दाबून टाकण्याच्या दृष्टीनें या समानतेच्या तत्त्वाचा उपयोग करण्यांत येतो तेव्हां या समानतेचें खरें ओंगळस्वरूप स्पष्ट होतें. भयाण विस्तीर्ण अरण्यांत अथवा मानवनिर्मित कृत्रिम कृषि भूमींच्या कोंदट वातावरणांत समानतेनें उगविणाऱ्या एकजात समानशील वनस्पतींत एकापेक्षां एक वरचढ व उच्च दर्जाची वनस्पति निर्माण करण्याकरितां कितीतरी विषम स्वरूपाचे शास्त्रीय प्रयोग करावे लागतात, त्याचप्रमाणें अनेक कृत्रिम उपायांनीं निरनिराळ्या जनावरांच्या नरमाद्यांना विशिष्ट प्रकारें वाढवून उच्चतर जाती निर्माण करण्याचें प्रयोग यशस्वी झाले आहेत. सृष्टींतील यच्चयावत् प्राण्यांच्या बाबतींत बीजाचा सायंटिफिक development ( शास्त्रीय परिपोष ) करून त्यांच्या बीजसंवर्धनाचा कार्यक्रम यशस्वी झाला आहे. तसेंच निरनिराळ्या भौतिक परिस्थितींत जन्मणाऱ्या व जीवन कलहांतून ताऊन सुलाखून निघालेल्या अनेक मानवजाती श्रेष्ठत्वाच्या चढाओढींत यशस्वी होऊन उच्च तर मानव निर्माण करण्याचें कार्य साधूं शकले. वंशश्रेष्ठत्व अथवा जातिश्रेष्ठत्व या कल्पना निसर्ग-

नियमांना सोडून आहेत असें मानणाऱ्या विद्वानांच्या अशास्त्रीय मतांची कींव करावी लागेल. पण समानतेच्या जगद्व्यापी वावटळींत सांपडलेले विपरीत बुद्धीचे विद्वान् बहुजनसमाजाच्या तर्काभासयुक्त विचारपरंपरेला बळी पडले असल्यास त्यांत नवल नाहीं. जीवन-कलह आणि Survival of the fittest ( यशस्वींताचे जीवन ) या त्रिकालाबाधित निसर्गनियमांना आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर मानवहितपोषक असें वळण देऊन उद्धाराचा मार्ग काढणें हें निराळें आणि त्या नियमांचें अस्तित्व अमान्य करून अथवा त्यांना दुर्लक्षून समाजाची उभारणी व समानतेकरतां केलेल्या युद्धावर जीवनकलहाची दाट कृष्ण छाया पडलेली आढळून येते व कलह मिटविण्याकरितां केलेल्या प्रयत्नांत सर्वस्वीं कलहाचीच बीजें आढळून येतात. समानतेकरितां केलेली प्रत्येक सामुदायिक चळवळ समानतेच्या मृगजळामागें लागून शेवटीं विषमता आणि कलह यांच्या ढिगाऱ्यावर आदळते, नाहीं तरी अंधारांतून प्रकाशाची निर्मिति होणें ज्याप्रमाणें अशक्य तद्वतच स्वार्थी कलहाची बीजें ज्या जानपद संस्कृतीत उपजतच असतात त्यांतून शांततापूर्ण समानतेचें सात्विक ध्येय प्राप्त होणे त्रिवार अशक्य आहे. प्राकृतजनांनी आपल्या नैसर्गिक स्वभावानुसार निर्माण केलेल्या जानपद संस्कृतींत स्वभावत:च अवनती आणि विनाश ही बीजरूपानें सांठवलेली आहेत. ऐतिहासिक कालांतून मधून मधून अनेक महापुरुषांच्या प्रयत्नानें गीर्वाण संस्कृतीनें आपल्या दिव्य तेजाचा त्यांत आविष्कार केला नसता तर चैतन्यहीन कलेवरच्या विघटीकरणाप्रमाणें ही जानपद—संघटणा केव्हांच विदीर्ण व लुप्त होऊन मनुष्य समाज रानटीपणाकडे वळला असता. जगांतील सर्व महापुरुषांच्या दृष्टी-समोर न कळत कां होईना, कोणत्याना कोणत्या स्वरुपांत गीर्वाण-

**संस्कृति** या भूतलावर अवतीर्ण करण्याचें ध्येय होते. तीच अति-मानवांची खरी संस्कृति होय. उत्क्रांति व विकास हीं गीर्वाण संस्कृतीची मुख्य कार्ये तर जडस्थिरत्व आणि विघटन हीं जानपद संस्कृतीचीं मुख्य अंगे. व्यक्ति हें गीर्वाण संस्कृतीचें केंद्र आणि संघ हे त्याला पोषक वातावरण निर्माण करण्याचें साधन तर जानपद संस्कृतीचें मुख्य केंद्र म्हणजे अनेक दुर्बल व्यक्तिसमूहाचा बनलेला संघ व व्यक्ति या त्या संघरूपी यंत्राचें निर्जीव घटकावयव, या संघाचें राजकीय स्वरूप म्हणजे राज्य. व्यक्तिमात्राच्या विकासा-कडे पूर्ण दुर्लक्ष करून व्यक्ति स्वातंत्र्याचा आभास निर्माण करीत मनुष्यमात्राच्या व्यक्तित्वाच्या पिळवणुकीवर आधारलेली समाजरचना ही आधुनिक युगांतील आदर्श मानली गेलेली राजसंस्था होय.

महाभारतकालीन **अश्वत्थाम्यानें** पित्याच्या कृपाप्रसादानें प्राप्त झालेलें ब्रह्मास्त्र स्वत:ची प्रतिकार शक्ति नष्ट झाल्यावर अगतिक, असहाय्य होऊन **अर्जुनावर** सोडलें, तेव्हां त्याला **मयाजितम्**च्या भावनेनें स्वर्ग ठेंगणा झाला. पण जेव्हां तें अस्त्र परत घेण्याची पाळी आली तेव्हां मात्र त्याला आपल्या दुर्बलतेची खरी जाणीव झाली. व शेवटीं अनाथ बालकांची हत्या करण्याचें पाप शिरावर घेऊन गलितमात्र व कुष्ठी होऊन सर्व जगभर वणवण करीत भटकावें लागले. त्याप्रमाणेंच या मायावी भौतिक सामर्थ्याची संपदा प्राप्त करून घेतल्यावर ती अमोघ शक्ति आटोक्यांत ठेवण्याजोगें सामर्थ्य अंगी नसल्यामुळें कधीं कधीं स्वत:वरच उलटून आत्मघात होण्याची पाळी आली; याला, सर्वस्वी जबाबदार, व्यक्तित्वाचा ऱ्हास करणारी जानपद संस्कृतीच होय. मानवजातीच्या अंतीम जीवन हेतूची साधना करण्याचा काल तर दूरच राहिला पण या जगांत सबलतेने जगतां येण्याइतकी सोय सुद्धां मानवाला अजून

करून घेता आली नाहीं. मानवाच्या संख्येंत होणारी भरमसाट वाढ, पृथ्वीचा उत्तरोत्तर वाढत जाणारा निकसपणा यांत सर्वांत जास्त भर जानपदानें निर्माण केलेल्या कलहात्मक आधिभौतिक संस्कृतीनें जी व्यक्ति–विघटनात्मक परिस्थिती निर्माण केली, तिनेंच टाकिली आहे. या विचित्र परिस्थितीमुळें व्यक्तिविकासाचें कार्य सारखें लांबणीवर पडत आहे. कच्च्या पायावर बांधलेल्या इमारतीला बाहेरून टेके देऊन व भिंतीची जाडी वाढवून पक्केपणा आणण्याचा प्रयत्न करण्यासारखें हास्यास्पद प्रकार आमच्या हातून घडत आहेत. आपल्या पर्वतावरील प्रवचनांत येशूख्रिस्तानें सांगितल्याप्रमाणें वाळूवरील इमारत आणि खडकावरील इमारत या दृष्टांताप्रमाणेंच जानपद संस्कृति नि गीर्वाणसंस्कृति यांतले अंतर होय. जानपद संस्कृतीची खरीं शस्त्रागारें म्हणजे पारतंत्र्यांत खिचपत असलेले अवाढव्य देश होत. व त्याच्या खालोखाल स्वतंत्र राष्ट्रांतील वाणिज्य वृत्तीचीं राष्ट्रें हीं सुद्धां याच संस्कृतीचें आधारस्तंभ होत. मानवाचें हीनत्व, त्याची दुर्बलता, त्याचा पंगुपणा व त्याचा विस्तार हीं वाणिज्य वृत्तीच्या राष्ट्रांना स्वार्थसाधनासाठीं उपयुक्त नि अनुकूल अशी परिस्थिती निर्माण करून देतात. जानपदसंस्कृतीची तर्काभासयुक्त जी विचारपरंपरा वर दर्शविली आहे, तिचा, सदैव अट्टाहासानें पुरस्कार करीत राहाणें हें वाणिज्य राष्ट्राच्या राजनीतीचें प्रमुख अंग होय. गुलामांचे देश आणि वाणिज्यराष्ट्रकांचे साम्राज्य, हीं फार पुरातन काळापासून चालत असलेली जोडी, आजच्या सुधारणेच्या काळांतहि अस्तित्वांत आहे. जुलमाखालीं चिरडल्या जाणाऱ्या व जीवनाच्या सर्व सुखसोयींना मुकलेल्या दासजातींना आपल्या पशुतुल्य परिस्थितीचा विसर पाडून, काल्पनिक ध्येयाच्या स्वप्नांत गुंग होण्याकरितां असली विचार–परंपरा फार उपयोगी

पडते. आणि त्याच जुलमावर अधिष्ठित असलेल्या वाणिज्यराष्ट्रांना, आहे या परिस्थितीचें शांततापूर्वक संरक्षण करण्यासाठीं व अशाच भोगलालसेनें पुढें सरसावणाऱ्या इतर प्रतिस्पर्धी राष्ट्रांना मागें थोपवून धरण्यासाठीं, हीच विचार-परंपरा, पंचमस्तंभा ( Fifth Column ) प्रमाणें उपयोगी पडते. आपापसांतील कोणत्याहि युद्धांत स्वत:च्या समर्थना करतां याच तर्काभासात्मक तत्त्वांचा पाठिंबा घेतां येतो. गुलामांची राजनीति आणि जेत्यांची राजनीति यांत महदंतर आहे. दोघांनाहि समान भासणारी अशीं नीतितत्त्वें मुळांत अगदींच वेगळीं असतात ही गोष्ट येथें सांगण्याचें मुख्य प्रयोजन हें कीं सत्ताधारी आणि जित असे दोन्ही लोकसमाज जेव्हां मोठ्या जोरानें समानतेच्या तत्त्वाचा पुरस्कार करतात तेव्हां इतिहासकाराची दिशाभूल होऊं नये. शब्द एकच पण त्याचे अर्थ मात्र भिन्न भिन्न व त्या अनेक भिन्न अर्थांपैकीं खरा अर्थ कोठेंच नाहीं अशा विचित्र परिस्थितींत या उच्च शब्दांची सारखी ओढाताण होत असते. यांत समानते-इतकीच भयंकर साधनें म्हणजे स्वातंत्र्य, लोकशाही नि शांतता हीं होत. लोकशाहीच्या युगांत व्यक्तिस्वातंत्र्याचा अर्थ प्रत्यक्ष व्यवहारांत तरी हाच घेतला जातो कीं प्रत्येक व्यक्तीला आपल्या आयुष्यांत हजारों चुका, वाटेल तसा आत्मघात व अंतीं सर्व नाश करून घेण्याची पूर्ण मोकळीक असली पाहिजे. व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे समाज–विघटन–दुर्गुण नि निष्क्रियता, अवनती व विलास याचे स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्याचें व्यवहारिक स्वरूप. मत-स्वातंत्र्य, भाषण स्वातंत्र्य व संघटन स्वातंत्र्य हे त्याचे प्रकार. आपलें अध:पतन करणाऱ्यावरच विसंबून न राहाता समाजाचा बुद्धि-भेद करीत राहाणें हाच व्यक्तिस्वातंत्र्याचा दृश्य उपयोग. **गड-कऱ्यानें** कविच्या केलेल्या व्याख्येप्रमाणें लोकशाहीच्या बंदिस्त

चौकटींत प्रत्येक व्यक्तीला आपल्या जन्माचा मूर्खपणा फिरवून दाखवितां आला पाहिजे हा पर्यायानें आग्रह आहे. वासनेच्या मोकाट स्वातंत्र्यानें जशी व्यक्तीची आंतरिक हानि होते तशीच बहुजनसमाजाच्या हातांत व्यक्तिस्वातंत्र्याचें कोलीत दिल्यानें जानपद–संस्कृतींतच कलहाचा अग्नि भडकून, त्याची आंच भाविकालांत अवतीर्ण होणाऱ्या गीर्वाणसंस्कृतीला लागून, अतिमानवाच्या जन्मापूर्वींच त्याचा बीजांकुर होरपळून निघतो. लोकशाही म्हणजे अंतिम मानवी जीवनध्येयाप्रीत्यर्थ आरंभिलेल्या, अनादि नि अनंतकालपर्यंत चालणाऱ्या मानवीलढ्यांत, मानवसैन्याचें नेतृत्व, बाजारबुणग्यांच्या हातांत देण्यासारखें होय. या बाजारबुणग्यांनाहि खंदे सैनिक बनविण्याचें आपलें ध्येय आहे हें खरें, पण, सेनापतीचें पद दिल्यानें, सैन्याच्या छावणींत, झाडू मारणारा मजूर, आपोआप योद्धा बनत नसतो. कडक शिस्त, दीर्घ परिश्रम, नितांतशौर्य आणि कसोटी यांच्या सहाय्यानें सामान्य शिपायापासून क्षात्रीकरणाच्या सर्व अवस्थांतून प्रगट होत होत कोणताहि सामान्य मनुष्य योद्धा होऊं शकतो.

जानपद–संस्कृति, विस्तार नि सातत्य यांना अत्यंत पोषक राज्यघटना म्हणजे बहुजनसमाजाच्या हातांत सर्वाधिकार असलेली लोकशाही राज्यघटना होय. लोकांचें राज्य म्हणजे अज्ञानाचें व हीनतेचें राज्य व जबाबदार राज्यपद्धतीचा खरा अर्थ सामान्यिकांच्या चंचल व ग्राम्य लहरीनुसार चालणारी बेजबाबदार व प्रतिगामी राज्यपद्धति ! जानपदांच्या निष्क्रिय, दुबल व अवनतिकारक आंधळ्या प्रवृत्तींना राजसत्तेची जोड मिळून राज्यतंत्राला ‘अंधेर नगरी चौपट राज्य’ असें स्वरूप एकदां प्राप्त झालें कीं शतकानुशतकांपर्यंत त्या देशांत महापुरुष निर्माण होऊन डोकें वर

काढतील ही आशाच नको. पराक्रमादि तेजस्वी सद्गुणांचें मोल जाऊन समाजाच्या दुर्गुणांवर टीकेचा प्रहार करणारा प्रवक्ता लोकांचा हितशत्रू बनतो व समाजाच्या मूर्खपणाची तळी उचलून धरणारा दांभिक स्वार्थसाधु, त्यांचा प्रातिनिधिक पुढारी बनून मिरवूं लागतो. नेभळटांच्या राज्यांत वीरत्वाला बृहन्नडेचें रुप येतें. अज्ञानाच्या अंधकारांत सत्यज्ञानाची तेजोहानि होऊन त्यावर विकृतीचें तिमिर-पटल आच्छादिलें जातें. यामुळें लोकशाही राज्यतंत्राला जानपद संस्कृतीच्या बालेकिल्ल्याचें स्वरूप येऊन मानवी प्रगतीची शक्यता लौकरच नाहींशी होते. बहुजनसमाजाच्या लहरीवर ज्यांचे अधिकार-पद अवलंबून आहे अशा सत्ताधाऱ्यांना बहुजनांच्या मर्मस्थळाचा ठाव घेऊन त्यांच्या मनाची पकड घेतली पाहिजे व लोकानुरंजनाचें उदात्त व कल्याणकारी तत्त्व बाजूस सारून त्याच्या विकृतींतून निर्माण झालेले **शकुनिमामा व कलुषा** यांचें मायावी तंत्र वापरावें लागतें. बहुजन समाजाची चंचलता, अज्ञान, स्वार्थीपणा व आलस्य-युक्त भोगविलासी जीवन यापासून त्यांना मुक्त करण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं त्यालाच आपलें भांडवल बनविणारे सत्ताधारी, मिजासखोर, बदफैली राजाच्या राजमहालांत व राज्यांत, विनाशाची आग पसरवून, त्या ज्वालेवर आपल्या स्वार्थाची पोळी भाजून घेणाऱ्या **कबजी**प्रमाणें सवंग लोकप्रियतेच्या जोरावर, ऐश्वर्याची साधनें बळकावून, आपली चंगळ करून घेतात. चारित्र्य, शील, कर्तव्यनिष्ठा, पराक्रमादिगुण, उत्कृष्ट वाङ्मय, कला, अथवा विद्या, राष्ट्रोद्धारक विधायक कार्यक्रम, रूढपरंपरा व गतानुगतिक अंधश्रद्धा यांचा नाश करून, धर्माला उज्वल स्वरूप देणारी सुधारणा, तत्त्व-ज्ञान, अथवा सामर्थ्योपासक राजकीय तत्त्वप्रणाली यांपैकीं एकहि गोष्ट जानपदांच्या हीन अभिरुचीला व मूढमतीला पटणारी नसल्या-

मुळें. त्यांच्या सत्तेच्या काळांत, या गुणांच्या निर्मितीला धोका उत्पन्न होऊन, खऱ्या उत्कर्षाची आशा खुंटते. नकल्या आणि गांवढेकर या कथेंतील उदाहरणाप्रमाणें सामान्य जनसमूहाला सत्याचें स्वरूप नेहमींच ओबडधोबड, भीतिदायक अथवा तिरस्करणीय वाटतें व असत्याची मोहक चकाकी त्यांना नेहमींच भुरळ पाडीत असते म्हणून प्रत्यक्ष सद्गुणाऐवजीं गुणांचें विकृत स्वरूपच त्यांना लोभनीय व आदर्श वाटतें, यांत नवल नाहीं. ज्या जानपदानें आपल्या चंचलतेनें, कृतघ्नतेनें व आंधळेपणानें **श्रीरामचंद्र**प्रभूच्या हातून श्रीपरमपवित्र **सीतादेवीचा** त्याग करविला व ज्यांनी सामुदायिकरित्या रडून आकांत करून व याचना करून **बलिराजाला** पाताळांत बुडविलें व ज्यांनीं बुद्धाच्या मायावी पाखंडाचा जयजयकार करून आर्यधर्म-संस्कृतीचा स्वतःत्याग केला व ज्या लोकशाहीनें **ज्यूलिअस-सीझरच्या** रक्तानें आपले हात कलंकित करून घेतले, सॉक्रेटिसला विष दिलें, येशूख्रिस्ताला फांसावर लटकविलें व असंख्य धर्मसुधारकांना पाखंडी म्हणून जिवंत जाळलें व फ्रान्सच्या राज्यक्रांतींत स्वातंत्र्याच्या नांवाखालीं हजारों निरापराधी स्त्रीपुरुष, गुणीजन, व वीरश्रेष्ठ पुढारी यांच्या रक्ताचें पाट वाहवून, आपली अघोरी रक्तपिपासा शांत करून घेतली; सारांश जिनें जगाचा काळाकुट्ट राजकीय इतिहास घडवून, मानवी चारित्र्याला काजळ फांसलें; त्या जानपदांच्या—लोकशाहीच्या हातीं समाज-जीवनाचें सुकाणू सुरक्षित राहाणें शक्य नाहीं. लोकशाहीनें भडकविलेल्या कलहाग्नींत मानवी प्रगतीचा अंकुर अकालीं होरपळून निघेल हें निःसंशय ! 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' अशी अवस्था होऊन सत्तेच्या मदानें धुंद झालेली व स्वतःला सुसंस्कृत, श्रेष्ठ, नि स्वयंपूर्ण समजणारी अंध-जनता, अखिल मानवजातीच्या सांस्कृतिक कीर्तीचा कलंक व

भावी पिढ्याचें लांच्छन होऊन बसतें. दैत्यांच्या भीतीनें भगवान **श्रीकृष्णाला** बाल्यावस्थेंतच मथुरेचा त्याग करून गोकुळींचा अज्ञातवास पत्करावा लागला तद्वतच् लोकशाहीच्या अंधकार युगांत शेंकडों महात्म्यांना आपल्या सत्याची जोपासना हद्दपारीच्या अज्ञातवासांतच करावी लागते. ‘ शास्त्राद्रुढिर्बलीयसी ’ असलें बौद्धिक दिवाळखोरीचें तत्त्व व ‘ यद्यपि शुद्धं लोक विरुद्धं नाचरणीयम् नोकरणीयम् असलें दांभिक मुत्सद्देगिरीचें घाणेरडें तत्त्व लोकशाहीच्या हीन काळांतच उदयाला आलें असलें पाहिजे.

व्यक्तिस्वातंत्र्य हा लोकशाहीचा दुसरा पाया आहे. आणि भूर्मागर्भांतून वाहाणाऱ्या गुप्त अंतर प्रवाहानें पायांतील दगडांना सांधणारा चुना झिरपून झिरपून नाहींसा झाल्यावर डौलानें शत्रूच्या भयंकर हल्ल्यांना हिणविणाऱ्या किल्ल्याची तटबंदी कालांतरानें असंरक्षणक्षम बनून, पहिल्या धडक्यासरशीं कोसळून पडते, तशीच प्राचीन काळच्या अनेक लोकराज्यांची अवस्था झाली. बालावस्थेंतच बेवारशीपणें टाकून दिलेल्या बालकाप्रमाणें व्यक्तिमात्रांची अवस्था होऊन समाजांतर्गत जीवनकलहापुढें टिकाव धरण्याची शक्ति लोकशाहीच्या काळांत जवळ जवळ नाहींशी होऊं लागते. आणि व्यक्ति स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठीं स्थापन झालेली घटना फक्त, कलहाचें सातत्य राखून, त्या कलहांत यशस्वी झालेल्या श्रेष्ठीजनाचें यशसंरक्षण करणारी तटबंदी बनते. व लौकरच असा एक वर्ग देशांत निर्माण होतो. कीं, ज्यांना त्या घटनेच्या सहाय्यानें देशांतील इतर असहाय्य जनतेला सतत पिळून काढण्याचा हक्क प्राप्त होऊन आपल्या हितसंबंधांची झपाट्यानें वाढ करतां येते. जनतेची एका विशिष्ट वर्गाच्या पिळवणुकीवर अधिष्ठित झालेली समाजरचना ही

त्या लोकशाहीची पोलादी चौकट बनून जानपदांना आपल्या निष्फळ मतदान-स्वातंत्र्यावरच आपल्या स्वातंत्र्याची तहानभूक भागवून घ्यावी लागते. आरंभी जनतेच्या प्राणाच्या नि वित्ताच्या संरक्षणाची हमी देणारी राज्यघटना, त्या वित्ताचा अपहार करणाऱ्या आणि त्या वित्ताच्या जोरावर इतरांचें प्राण विकत घेणाऱ्या श्रेष्ठीजनांच्या ( Capitalist ) संरक्षणाचीच हमी देऊं लागते. व वर्गांतून एकदा आपल्या शासक वर्गाची निवड करण्याच्या हक्काला लौकरच दासानें आपलें दास्य कायम ठेवून फक्त आपल्या धन्याची निवड करण्याच्या हक्काचें स्वरूप येतें. जोंपर्यंत दासांची राबणूक व पिळवणूक संपणार नाहीं तोंपर्यंत त्यांना राबविणारा शासक व पिळणारा श्रेष्ठी हे कोण आहेत या गोष्टीला विशेष महत्व राहात नाहीं. जीवनकलह आणि चढाओढ हे कधींहि न संपणारे असें सूत्र आहे. व समाजांत कधींहि न थांबणाऱ्या उलाढाली करीत राहाणारी चक्रें आहेत. व एकमेकाशीं संबद्ध असून स्वतःच्या गतीनें इतरांना गती देणाऱ्या यंत्रांतील चाकाप्रमाणें तीं सदैव फिरत राहाणारच. यामुळें शेवटीं श्रेष्ठी-वर्गांत कांही मूठभरच लोक राहून बाकीच्या सर्व प्रजेची इतरेजनांत गणना होऊं लागते. **रूसोनें** प्रतिपादलेल्या Social Contract ( सामाजिक करार ) सारख्या अशास्त्रीय सिद्धांतावर आधारलेल्या काल्पनिक लोकशाहीचें ध्येय डोळ्यासमोर ठेवून फ्रान्सची अभूतपूर्व राज्यक्रांति घडवून आणणाऱ्या तत्त्वनिष्ठांना ती तसली लोकशाही कधींच स्थापन करतां आली नाही व तिसऱ्या **नेपोलियन** नंतर स्थापन होऊन अप्रतिहतपणें शंभर वर्षे कायम असलेल्या लोकशाहीनें जगांत दुर्बलतेचें, अवनतीचें अस्थिरतेचें सर्वांत मोठें उदाहरण दाखवून दिलें. अवाढव्य भौतिक सामर्थ्य हाताशीं असतांहि सदैव हतबल व भीतिग्रस्त अवस्थेंत

राहाणाऱ्या या राजानें आपल्या राष्ट्राचा विकास करण्याची कसलीहि कामगिरी केली नाहीं. व सरतेशेवटीं त्यांच्या जानपद संस्कृतीनें पाशवी भौतिकसामर्थ्याला हाताशीं धरून केवळ एक वाणिज्य-संस्कृति मात्र समाजांत पसरवून दाखविली. प्राचीन काळच्या लोक-राज्यांचें उदाहरण सोडून दिलें तरी मध्ययुगीन युरोपांतील **जेनेवाची** लोकशाही कलंकवत् होती व विनाशापूर्वींची अंतिम अधःपतनाची अवस्था तिनें गांठली होती हें इतिहासकारांना माहीतच आहे. लोक-राज्यांतहि कांहीं आदर्शवत् राज्यें होऊन गेलीं असतील पण त्यांच्या चांगुलपणाचें कारण लोकशाहीचें तत्त्व नसून नगरराज्याचें त्यांचें संकुचित स्वरूप व कडक शिस्तीवर आधारलेली त्यांची क्षात्रप्रधान संस्कृति होय. समाजांतल्या बहुसंख्य व्यक्तींचें जीवन, आर्थिक गुलामगिरीनें व्याप्त करून, मनुष्यत्वाची हानि करणारी व मुक्या जनावराप्रमाणें त्यांना मालमत्तेचें स्वरूप आणून देणारी आर्थिक स्वातंत्र्याची (लेसे-फेअर) कल्पना लोकशाहींतच उदय पावली. जगांतील विस्तीर्ण साम्राज्य व कच्च्या मालाच्या बाजारपेठा बळकावून बसलेल्या वाणिज्य-प्रधान राष्ट्रांनीं या लोकशाहीतत्त्वज्ञानाच्या सहाय्यानेंच खुल्या व्यापाराचें मायावी तत्त्व प्रसृत करुन आपल्या प्राप्तहित-संरक्षणाची अभेद्य योजना करून ठेविली. मध्ययुगांतील माथेफिरू धार्मिक यादवीला अथवा अत्याचारी सम्राटांच्या साम्राज्य तृष्णेमुळें, सतत निर्माण होणाऱ्या युद्धांनांहि लाजविणारे घनघोर युद्धाचे प्रसंग, आधुनिक लोकशाहीच्या काळांत अनेकवार आले व पुढेंहि येत राहातील. सारांश समाजाचें शासन एका व्यक्तीच्या अथवा घराण्याच्या स्वार्थी लहरीवर अवलंबून ठेवण्याऐवजीं ते एकाद्या विशिष्ट वर्गाच्या हातांत सोंपविण्याची एक आधुनिक क्लृप्ति एवढाच लोकशाहीचा उल्लेख करावा अशी परिस्थिति प्राप्त झाली. व्यक्ति-

प्रधान अगर कुलप्रधान राज्यघटनेंत सत्ताधारी व्यक्तीच्या स्वार्थाला नि भोगलालसेला निसर्गाच्या सीमा असल्यामुळें, बहुजनसमाजाच्या पिळवणुकीला आपोआपच मर्यादा पडत असे. शिवाय जुलमाविरुद्ध बंड करण्याचा समर्थनीय हक्क प्रजेच्या हातांत असल्यामुळें प्रजेचा बुद्धिभेद होण्याचेंहि कांहीं कारण राहात नसे. पण लोकशाही-घटनेच्या अंमलाखालीं एका धन्याऐवजीं अनेक धनी असलेल्या दासांप्रमाणें प्रजेची अवस्था होऊन, त्यांच्या राबवणुकीचा व पिळव-णुकीचा अमर्याद कार्यक्रम अप्रतिहतपणें चालू होतो व या जुल्मा-विरुद्ध ब्र काढण्याचीहि प्रजेची छाती होत नाहीं कारण शांतता आणि लोकशाहीच्या उदात्त घोषणांनीं बुद्धिभेद होऊन त्यांचें सामर्थ्य पांगलेलें असते. स्वातंत्र्याच्या वातावरणांत, पशुपक्षांच्या सृष्टींत "जीवोजीवस्य जीवनम्" या दंडनीतिप्रमाणें सामर्थ्यवंतांच्या भक्ष्यस्थानीं पडणाऱ्या कोंवळ्या जीवांना आत्मसंरक्षणार्थ प्रतिकार करण्याची तरी मोकळीक असते अथवा प्रतिकार न करतां आल्यास मरणकालच्या धडपडीनें शेवटची आर्तकिंकाळी फोडून निसर्गाच्या शांत भयाण अरण्याला जागवितां येते. पण त्या हांकेनेहि जर लोकशाहीच्या गुंगींत घोरत पडलेल्या मानवसमाजाची मोहनिद्रा भंगली नाहीं तर मात्र मानवो-द्धाराची सुप्रभात कधींच उगवणार नाहीं. अराजकतेच्या युगांत मानवी कलहाला राजरोस रक्तपाताचें स्वरूप येते. पण त्यांत निदान मनुष्याच्या पराक्रमाचा उत्कर्ष होऊन त्याची शक्ति कसोटीला लागते. पण घटनेच्या बंदिस्त चौकांत नांदत असलेली लोकशाही मात्र आपल्या गांजलेल्या प्रजाजनांच्या तोंडांत तर्कदुष्ट सत्त्वांचा बोळा कोंबून जीवनकलहात्मक चढाओढीचें संरक्षण करणाऱ्या कायद्याचे पाश त्यांच्या गळ्याभोंवतीं आवळून अत्यंत शांततेनें

त्यांचा प्राण घेते. लोकशाहीच्या व्यक्तिस्वातंत्र्याचा दुसरा घोर परिणाम हा कीं मनुष्याला समूहरूपानें कार्य करण्याकरितां, ज्या संघटनेची व शिस्तीची अत्यंत आवश्यकता असते, त्याबद्दल जानपदांत तीव्र नावड उत्पन्न होते. तसेंच लोकमताला फाजील महत्त्व देण्याचा आभास निर्माण करून प्रजेंत मतस्वातंत्र्याचें थैमान घालण्याचें खूळ याच तत्त्वानें माजविलें आहे. मिशाबरोबर मतें फुटूं लागलेल्या तरुणापासून परिपक्व होऊन निरुपयोगी व सडलेली बुध्दि पिकलेल्या केसांच्या आवरणाखालीं ज्याच्या डोक्यांत शेवटची निद्रा घेत आहे अशा वृद्ध कर्षीपर्यंत, सर्वांच्या मतमतांतराच्या गलबल्याला वांव मिळाल्यामुळें, असत्याच्या गोंगाटांत सत्याचा एकेरी आवाज केव्हांच लुप्त होऊन जातो. एका माणसाच्या शहाणपणापेक्षां दहामाणसांचा मूर्खपणा समाजाला जास्त उपकारक आहे हा लोकशाहीचा प्रमुख सिद्धांत आहे व हजारों वर्षांपासून समाजांतील सूज्ञ लोकांनीं जतन करून ठेवलेल्या अनुभवांतून व महान विद्वानांच्या तत्त्व प्रतिपादनांतून प्रतीत होणाऱ्या सत्यज्ञानानुसार वागण्याची सक्ती करण्यापेक्षां, अठरा वर्षांची मर्यादा ओलांडून पंचविशींत प्रवेश केलेल्या तरुणाला आपल्या मोकाट मूर्खपणानुसार वागण्याची पूर्ण मुभा देऊन, असल्या व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क, अंतिम सुख आणि कर्तव्य यांचा मोबदला देऊनहि संरक्षण करण्याजोगा आहे, ही भावना समाजांत प्रसृत करण्याचें सारें श्रेय लोकशाहीला आहे. दारूच्या दुर्व्यसनापासून परावृत्त करण्यासाठीं दारूबंदीची सक्ती करण्याऱ्या समाजांतील कांहीं मूठभर शहाण्यांच्या हक्कापेक्षां आपल्या इच्छेस येईल तितकी दारू पिऊन गटारांत वाहात जाण्याचा प्रजेंतील प्रत्येक व्यक्तीला असलेला मूलभूत हक्क हा अधिक श्रेष्ठ नि संरक्षणीय आहे असल्या प्रकारची दुष्प-

रिणामी मतप्रणाली आधुनिक जगांत निर्माण झाली. नीतिमत्तेची सक्ती केल्यानें, सक्तीचें लष्करी शिक्षण दिल्यानें व मनुष्यमात्राला ज्या योगें सत्याचा मार्ग दिसेल आणि त्यांत कर्तव्य तत्परता व कार्यप्रवणता उत्पन्न होईल अशा प्रकारचीच विद्या शिकण्याचें बंधन घातल्यानें व्यक्तिस्वातंत्र्याला बाध येतो म्हणून हा जुलमाचा रामराम नको असें म्हणणें म्हणजे रोग्यावर औषध पिण्याची सक्ती करण्याऐवजीं त्याला वेडेपणानें मरण्याचा हक्क देणें हें समाजहिताला जास्त पोषक आहे असें म्हणण्यासारखें आहे. व्यर्थ बिचारा **येशूख्रिस्त** सत्याचा मार्ग अरुंद आहे आणि असत्याचा रुंद आहे असे ओरडून ओरडून मेला. पण त्या अरुंद रस्त्याची सक्तीनें वाट दाखवून देण्याऐवजीं बहुजनसमाजाला स्वैरपणें लीला-विहार करतां येईल असा मोहक राजरस्ता खुला करून देण्याचें महत्कार्य लोकशाहीनें केले आहे. लोकांच्या फक्त देहरक्षणाची जबाबदारी घेणाऱ्या प्रजातंत्रानें मनुष्याला देहांतशासन देण्याचा हक्कमात्र आपल्याकडेच राखून ठेवला आहे. स्वतःच्या स्थैर्याकरितां लोकमताचें प्रभावी साधन आवश्यक आहे हें एकदां ठरलें म्हणजे लोकमताला आटोक्यांत ठेवण्याचें, मनमानेल तसें वळविण्याचें व आपल्या स्वार्थी हेतूच्या सिद्ध्यर्थ त्याचा उपयोग करून घेण्याचे सर्व डावपेच लोकशाहीच्या युगांत सत्ताधाऱ्यांनीं हस्तगत केलेच पाहिजेत. यामुळेंच सार्वत्रिक निवडणुकी व मतदानाचें शास्त्र, शकुनीमामाप्रणीत कुटिल नीतिपेक्षांहि जास्त प्रगल्भ झाले आहे. या शास्त्राचा चमत्कार असा कीं लाकडाच्या पेटींत आपल्या मताचें चिटोरें डोळें झांकून टाकणाऱ्या मतदाराला डोळे उघडे ठेवून सत्ता-धारी-वर्गाच्या अनियंत्रित भोगलालसेच्या अग्निकुंडांत आपल्या व्यक्ति-त्वाची आहुती द्यावी लागते. पण लोकशाहीच्या मायेचा प्रभाव

असा आहे कीं त्याला मात्र असें वाटते कीं या देशाचा राज्य चालविण्याचा माझा मूलभूत हक्क आहे व त्या हक्काची वहिवाट-परंपरा मी चालवीत आहे. गुलामांना डाग देऊन शिक्का मारण्याची जुनी पद्धत इतिहासाच्या पुनरावृत्तीनें या मतचिठ्ठीच्या रूपानें पुन्हां अवतरली आहे. आपल्या देशाची शासनपद्धती ठरविण्याच्या हक्का-पेक्षां आपली पिळवणूक कोणाच्या हातून व्हावी हें ठरविण्याचा हक्क प्रजेस मतदानाच्या रूपानें प्राप्त झाला आहे असें म्हटल्यास अति-शयोक्ति होणार नाहीं. वरवर पाहातां सत्कर्म आणि दुष्कर्म या दोहोंचेंहि स्वातंत्र्य जसे निर्मात्यानें मनुष्यमात्राला दिलें आहे तसेंच प्रजातंत्रानें प्रजेला दिलेलें असतें. पण या स्वातंत्र्याच सदुपयोग प्रत्यक्ष मनुष्यानेंहि फार कमी वेळेस केला. तद्वतच जानपदाच्या बाबतींतहि प्रजांतत्राला ही खात्रीं असते कीं हा लोक समूहरूपी सागर कधीं उसळलाच तर किनाऱ्याच्या बंधनापलीकडे लुकलुक-णाऱ्या ध्येयचंद्राला कवटाळण्याकरतां नव्हे तर उन्नतीच्या मार्गांत आडवेपडून मधूनमधून आपले डोकें वर काढणाऱ्या चैतन्यहीन खडकावर आदळण्याकरतांच उसळेल. काय करावें याची मोकळीक देऊन काय करूं नये याची सक्ती केल्यानें समाजाच्या हातून उत्पादक कार्य घडेलच असें नाहीं. स्वभावत:च स्थिरप्रवृत्त असलेला समाज नकाराच्या बंधनांत राहून अज्ञानपणें मुक्या हालचाली करण्यापेक्षां जास्त तें काय करणार ? मरणानंतर प्राप्त होणाऱ्या यमलोकांतील तीव्र यातनांची भीति दाखवून, धर्मराज्यांतील राज-दंडाची भीति दाखवून, समाज बहिष्काराचें बंधन घालून व जन्मापासून संस्कार आणि विद्या यांचा प्रभाव पाडूनहि ज्याची मन:प्रवृत्ति सहजासहजीं नीतिमत्तेकडे वळत नाहीं, क्षणीकसुखा-मागें लागून ‘ मन:पूतम् समाचरेत ’ असें वर्तन करण्यानें पदोपदीं

दु:ख भोगावें लागतें, शरीर सुखांकरतां नियमनरहित भोगलालसेला बळी पडल्यानें शरीराचा प्रत्यक्ष नाश होऊन सुखोपभोगाची शक्ति-सुद्धां नाहींशीं होते हें धडधडींत दिसत असून जरा, रोग, अप-मृत्यु, दारिद्र्य, अपमान, व सर्वनाश हीं पदोपदीं डोळ्यांना दिसत असून व याच्या उलट आत्मविकास, दीर्घपरिश्रम, आत्मसंयम, ज्ञान आणि कर्तव्य या मार्गानें सामर्थ्य संपन्न होऊन गेले तर स्वर्गाची मनोहर सुखेंच काय पण यांहिपेक्षां परम अशी गती मनुष्याला प्राप्त होते असें धर्मानें त्रिवार सांगितलें असतांहि मनुष्याची प्रवृत्ति उन्नतीच्या मार्गाकडे न वळतां दुष्कृत्याकडेच वळते ही आजवरच्या इतिहासाची शिकवण आहे. मायेनें अंध झालेल्या या जगांत युगा-नुयुगांत एखादाच **हर्क्युलस** असा निघतो कीं कर्तव्याचा कांटेरी मार्ग व सुखाचा मोहक मार्ग यांत निवड करण्याचें स्वातंत्र्य लाभलें असतांहि त्यानें स्वयंप्रेरणेनं कर्तव्याचा खडतरमार्ग पत्करला. मग भौतिक वादाच्या दूषित वातावरणांत जन्मलेल्या लघुमानवांची कार्या-कार्य करण्याचें स्वातंत्र्य मिळाल्यावर स्थिरजीवनभोग अथवा अव-नतिकारक दुष्कृत्य यांकडेच वृत्ति वळल्यास त्यांत नवल नाहीं. या सर्व परिस्थितीचा परिणाम म्हणून टेंकडीच्या उंचावर जन्म पावून सतत उतरणीकडे वहात जाणाऱ्या नदीच्या अध:पतनाप्रमाणें समा-जाची हळूहळू अवनति होत जाऊन व्यक्तीच्या आंतरिक जीवनाचा संकोच आणि ऱ्हास होतो. थोड्याच दिवसांत परिस्थितीचा दास बनणारा बहुजनसमाज पंगु, निष्क्रिय, अज्ञानी आणि प्रवाहपतित होऊन जातो. लोकमताच्या सामर्थ्याचा देखावा निर्माण करणारी राजकीय परिस्थिति लोकांची शक्ति वाढविण्याऐवजीं त्यांच्या साम-र्थ्याची खच्ची करीत जाते. कुणाचीहि दुर्बलता इतर प्रतिस्पर्ध्यांच्या आक्रमक वृत्तीला आमंत्रकच असते. याच कारणानें लोकशाहीच्या

युगांतहि आपसांतील लढायांना ऊत आला. आक्रमकांची आक्रमणशक्ति वाढली व दुर्बलांच्या संरक्षणसमतेची पिछेहाट होत गेली. आधिभौतिक शास्त्राच्या प्रगतीला भौतिक सामर्थ्याचें साधन बनवितां आल्यामुळें प्रत्येक राष्ट्राच्या भौतिक-सामर्थ्यांत चढाओढीचें युग आरंभलें. पण भौतिक-सामर्थ्य वाढलें तें सत्ताधाऱ्याचें! सामान्य प्रजाजनांना त्या भौतिक साधनांचा खासगी जीवनोपभोगा पुरताच मर्यादित उपयोग झाला. शिवाय पंचहत्यारी समजलेल्या सैनिकांचा पराक्रम जर भाडोत्री मालकाच्या पदरीं गहाण असला तर कळसूत्री बाहुल्याप्रमाणें धन्याच्या इच्छेखातर नाचूनच त्याला आपल्या शौर्याचा अविष्कार करावा लागतो. त्याच्या शौर्यगुणाचा त्याला स्वत:ला कांहीच उपयोग होत नाहीं. तद्वतच जानपदसंस्कृतींत रममाण झालेल्या या अनेक राष्ट्रांच्या भौतिक सामर्थ्याची अवस्था झाली आहे. दीर्घ तपश्चर्येनंतर प्राप्त झालेल्या सामर्थ्याचा उपयोग त्रिभुवन जिंकण्याकरितां करून घेण्याचें **भस्मासुरानें** ठरविलें पण जो स्वत:ला जिंकू शकला नाहीं तो जगाला काय जिंकणार? **मोहनीच्या** य:कश्चित् साध्या कपटाला भुलून त्याचें मन माया मोहित झालें व एवढ्या मोठ्या सामर्थ्याचा धनी असलेल्या भस्मासुराला मोहिनीच्या आहारीं गेलेल्या त्याच्या स्वत:च्या मनानेंच जिंकलें व भस्मसात केलें. त्याचप्रमाणें पंचमहाभूताचें सामर्थ्य हातीं घेऊन बसलेल्या या लोकराष्ट्रांचें स्वत्व नाहींसे झालेलें असल्यामुळें परिस्थितीनें निर्माण झालेल्या दुष्प्रवृत्तिचा विजय होऊन जानपदसंस्कृतीच्या बुडाशीं असलेलीं आसुरीमाया आपापसांतील कलहांतच प्रतिस्पर्धी राष्ट्रांच्या भौतिकसामर्थ्याची टक्कर लावून त्या विनाशांतून समाजाला अवनतीकडे नेत राहते. हातात अंकुश घेऊन हत्तीच्या गंडस्थळावर बसलेला माहूत सक्तदर्शनीं हत्तीचा

नियंत्रक बनतो पण स्वत्वाचें प्रतीक असलेला तो अंकुश हातांतून नाहींसा झाला ह्मणजे मन मानेल तसें हत्तीला वळविण्याचें बाजूला राहून तो कोपमतंगज स्वैरपणें त्या लघुमानवाला रानोमाळ भटकवून डोंगराच्या कड्यावरून अध:पाताच्या खोल दरींत फेंकून देतो. आधुनिक युगांतील राष्ट्रा राष्ट्रांच्या लढाया म्हणजे भौतिक सामर्थ्यानें मानवजातीवर उगविलेला सूड आहे. भयानक स्मशानांत मध्यरात्रीं आसुरी तंत्रसामर्थ्यानें जागविलेली पिशाच्च देवता वरं ब्रूहि अशी घोषणा करून अर्पण केलेल्या भक्ष्यानें तृप्त न होतां एखाद्या वेळेस असंरक्षित असणाऱ्या तांत्रिकालाच उचलून तोंडांत टाकते त्याप्रमाणें आपल्या स्वत:च्या अंत:करण प्रवृत्तीचें स्वत्वरूपी सुकाणूं हातांतून सुटल्यामुळें असहाय्य झालेली ही मानवजात भौतिक सामर्थ्याच्या वावटळींत सांपडून उतरणीवरून घसरत घसरत आपल्या विनाश सागराकडे वहात जात आहे. व्यक्तींचा विकास आणि समाजाची संघटना आणि समाजाच्या संघटनेंतून व्यक्तिविकासाला अनुकूल परिस्थिती निर्माण करणें हीं कार्यें लोकशाहीला तत्परतेनें पार न पाडतां आल्यानें व लोकशाही समाजरचनेंत असलेल्या मूलभूत अंतर्गत दुर्बलतेमुळें हें कार्य पार पाडणें लोकशाहीला कधींच शक्य नसल्यामुळें लोकशाही हें मानव सैनिकाच्या हातांतलें गंजलेले मोडकें हत्यार बनले आहे व तें निरुपयोगी म्हणून फेंकून देण्याकडे हळूहळू सर्वांचा कल होत आहे.

येथें ही गोष्ट स्पष्ट करणें आवश्यक आहे कीं ज्याला आपण संघटन म्हणतो तें नि:संशय व निरपवादपणें सामर्थ्यसंपन्न व प्रागतिक व्यक्तिसमूहांचे संघटनच असलें पाहिजे. नाहींतर अंतर्गत कलहानें दूषित झालेल्या स्वार्थी, दुर्बल, व हीन प्रवृत्त मानवाचें

संघटन करणें हें आवळ्याची मोट बांधण्यासारखें आहे. इतक्यावरहि समानशील व्यसनी असल्यामुळें किंवा सामुदायिक भीतीच्या विकारानें त्रस्त होऊन एकत्र जमल्यामुळें लोकांचें संघटन एखाद्या भ्रामक तत्त्वभिनिवेशानें त्यांच्यांत अवसान उत्पन्न करून घडवून आणलेंच तरी त्या संघटनांतून कांहीं हित निष्पन्न होणें शक्य नाहीं. प्राणपणानें संघटन करणारी व एकमेकांस चिकटून उभी राहाणारी शेंकडों हरणें आत्मसंरक्षणाच्या तयारीनें उभीं असतांना वाटेल त्या कोंवळ्या हरणाला त्यांतून उचलून आपले भक्ष्य बनविणें मृगराजाला कांहींच कठीण नाहीं. सदैव कळप करून राहाणाऱ्या मेंढरांना त्यांच्या संघशक्तीचा कितीसा उपयोग होत असेल, उलट एक पडले, दोन पडले, तीन पडले या उक्तीप्रमाणें त्यांची अवस्था होऊन कड्यावरून घसरून पडून मरणाऱ्या मेंढराप्रमाणें डोळे झांकून सर्व कळपचा कळप घसरून पडतो व आपला आत्मघात करून घेतो. दुर्बलांच्या संघटनेंतून शक्तीची निर्मिती होणें हें शेंकडों—उण्या संख्येच्या बेरजेंतून अधिक संख्या काढण्याइतकेंच अशक्य आहे. अपूर्णांकाला अपूर्णांकानें गुणल्यानें त्यांतून पूर्णांक उत्पन्न होणें शक्य नाहीं. घटकावयवांच्या सर्व सामान्य समगुणांची वृद्धि ही संघटनेची फलश्रुति असते. म्हणून जे घटकावयवांत नाहीं तें संघटनेपासूनहि निर्माण होणार नाहीं. जे परस्परविरोधी गुण असतील त्यांतहि अल्प गुणांचा नाश नि व्यापक गुणांची वाढ या नियमानुसार जोपर्यंत समाजांत अज्ञान, स्वार्थ आणि दुर्बलता या हीन प्रवृत्तींचे प्राबल्य जास्त तोपर्यंत अशा व्यक्तींच्या संघटनेंत अपवाद म्हणून कांहीं व्यक्तींच्या अंगीं असलेल्या सद्गुणांचा लोप होऊन निरपवादपणें समाजाची संघटित शक्ति आपल्या हीन मार्गानेंच वाढूं लागते. लाकडाच्या भाऱ्याची उपमा देऊन दुर्बलांच्या संघटनेंतूनहि

सामर्थ्याची उत्पत्ती होते हें सप्रमाण दाखविण्याचा प्रयत्न एखादा तर्कशास्त्रज्ञ करील पण एकतर उपमा दृष्टांतांनीं तर्कप्रणाली सिद्ध होत नसते तर तर्कानें सिद्ध झालेली गोष्ट उदाहरणानें फक्त समजावून सांगता येते. त्यामुळें लांकडाच्या भाऱ्यांत जो क्रम लागूं पडला तोच व्यक्तिसमूहाला लागूं पडावा ही विचारसरणी तर्कदुष्ट आहे. शिवाय प्रत्येक लाकडांत लवचिकपणा अगर ठिसूळपणा या गुणापेक्षां कडक पणाचा गुण जास्त असल्यामुळें संघटनेनें त्यांच्या ठिसूळपणाचा लोप होऊन कडकपणाची वृद्धि होते. पण माणसासारख्या दुर्बल प्राण्यांत व्यक्तित्वाची वाढ आपोआप होण्याची शक्यता नसल्यामुळें विशिष्ठ अवस्थेंतून प्रगत नि परिणत झाल्याशिवाय व्यक्तित्वाचा विकास होत नाहीं व त्या अवस्था व ती क्रियाप्रणाली यांच्या संरक्षण पोषणा-करितां संघटित समाज—संस्थेची आवश्यकता असते. हें ध्येय दृष्टिआड करून तयार झालेली कोणतीहि समाज—संघटना फलदायक होऊं शकणार नाहीं उलट त्यांत समाज विघटनाची बीजें आरंभापासून डोकावत असल्यामुळें केंद्रापसारक शक्तीचा जोर होऊन समाजाचें अधःपतन होऊं लागते.

शांतता ही दुर्बलतेची बहीण. राजकीय क्षेत्रांत शांततेचा अर्थ स्थिरत्व—आहे तें कायम ठेवण्याची वृत्ती. जें आहे तें असमा-धानकारक असल्यावर तेंच कायम ठेवण्याकरितां शांततेचा उपयोग करून घेतला म्हणजे बहुसंख्य समाजाची दुर्बलता आणि हीनता वाढत जाते. वास्तविक चळवळ आणि शांतता या दोन्ही गोष्टी इतक्या परस्पर विरोधी आहेत कीं शांततामय चळवळीनें ध्येयसिद्धीचा उपदेश समाजाला करणें म्हणजे भाग्यशाली दारिद्र्याचा आनंदानें स्वीकार करा, आत्मघातकी अपमृत्युला कवटाळून दीर्घायुषी व्हा,

व आपल्या शत्रूवर प्रेम करून त्याचा प्रतिकार करा, जें अंतर्गत हीनतेमुळें विफल होणार तें निष्काम इच्छेनें करा, ज्याला शिक्षा करण्याचें सामर्थ्य नाहीं त्याला क्षमा करून त्याच्या अंत:करणांत पश्चात्तापाची भावना उत्पन्न करा, व ज्याचें पौरुष कधींच नाहींसें झालें आहे त्याला ब्रह्मचर्य पालनाचा असिधारा व्रतासमान उपदेश करण्यासारखें विसंगत, वेडगळपणाचें, अमंगल, व उपदेशकाची हीन मनोवृत्ति व्यक्त करणारे आहे व जानपद संस्कृतींतील तर्काभासात्मक व तत्वाभासात्मक विचारपरंपरेचे मुल्य वैशिष्ठ्य जर कोणतें असेल तर तें हेंच. जितराष्ट्रांच्या दृष्टीनें या तत्त्वज्ञानाचा अर्थ हीनता आणि मनोविकृति, गुलामांचे बौद्धिक दास्य आणि जेत्यांच्या दृष्टीनें याचा अर्थ दंभ, कुटिलता, पिळवणूक व भयंकर आर्थिक शोषण. गुलामांची गुलामगिरी अमर करण्याची मोहिनी या तत्त्वज्ञानांत आहे. आपल्याला प्राप्त झालेल्या मिळकतीवरील स्वामित्व इतरांना हिरावून घेता येऊ नये म्हणून मिळकतीच्या संरक्षणाचा कायदा समाजानें केला ह्या प्रमाणें जगाचें अर्धें राज्य कच्च्या मालाच्या बाजार पेठा व अवाढव्य संपत्ती ज्यांना प्राप्त झाली आहे त्यांना स्थैर्याची व शांततेची सर्वांत जास्त आवश्यकता. याच शांततेच्या नांवाखालीं त्यांच्या वर्चस्वाला धक्का लावूं पहाणाऱ्या वाटेल त्या अगतिक, बुभुक्षित राष्ट्रांना अथवा जीतदेशांतील क्रांतिवीरांना चिरडून टाकतांना साऱ्या जगाचा पाठिंबा या पट्टेदारांना मिळवितां येतो. ज्याचें जगांत कांही हरवलेंच नाहीं व ज्याला जें जें पाहिजे तें तें मिळालें त्याला आपल्या वैभवाचा निर्वेधपणें उपभोग घेण्याकरतां शांततेपेक्षां अधिक काय पाहिजे ? पण ज्याला कांहीं मिळाले नाहीं व सर्वस्व हिरावल्या गेलें आहे अशा बुभुक्षितां करतां शांततादेवीनें आशिर्वादाकरतां उचललेला हात भस्मासुराच्या हातांसारखा वाटल्यास नवल नाहीं.

ज्या शांततेची गीर्वाण संस्कृतीच्या पुरस्कर्त्यानें स्तुति केली व ज्या शांतीधर्माच्या प्रस्थापनेसाठीं स्वत्वधर्माचे महायोगी अविरतपणें झटले ती अखिल मानवजातीच्या सौख्यकालीं व जागतिक कलहाच्या अंतसमयीं पूर्ण ध्येयाच्या महाद्वारापाशीं प्राप्त होणारी दैवीशांती ही निराळी ! या व्यवहारी जगानें दांभिकपणें उदात्त तत्वांचे नांव देऊन आपल्या हीन भावनांना मायावी रंग चढविण्याचा प्रयत्न करीत असतां दुष्टांचा दुष्टपणा आणि दुर्बलांचें दौर्बल्य, सत्ताधाऱ्यांची जुलमी सत्ता आणि गुलामांचें दास्य, वाणिज्य श्रेष्ठींची रक्तशोषण करणारी शक्ति आणि आर्थिक दैन्यावस्थेंत खिचपत पडलेली उदरंभरणाकरितां विकलीं गेलेलीं मुकीं माणसें, या सर्वांचें सातत्य कायम राखण्या करितां व कलहाग्नीला विझवून आपल्या जडशीत-लत्वानें मानवजातीला गारठून मारण्याकरितां जानपद संस्कृतीच्या सहाय्यानें ज्या शांततेला जन्म दिला ती शांतता निराळी ! समाजाची प्रतिकार शक्ति नाहींशी करून त्याच्या दुर्बलतेला सत्वगुणाचें स्वरुप दिल्यानें समाजाला सहजासहजीं मेंढरांच्या कळपाचें स्वरुप येऊन लोकशाहीच्या दलालांना समाज आटोक्यांत ठेवणें सोपें जातें. कलह आणि रक्तपात याच्या भीतीनें शांततेचा पुरस्कार करणारा मानव हळूं हळूं स्वत:च्या मृत्यूला भिऊन आपल्या पौरु-षाला कायमचा मुकतो. याचा नैसर्गिक परिणाम म्हणून उन्नतीची सारी धडपड त्यागभावना, आणि वीरवृत्ती यांच्या अभावी मंदावते. एवढयावरच ही परागती थांबली असती तरी मार्ग बदलणें सोपें झालें असतें पण दुर्दैवानें बहुजनसमाज शांततेच्या मोहक गुंगींत स्वत:तर मोहनिद्रा घेतोच पण जो कोणी आपल्या वीरवृत्तीनें क्रांतीची आंदोलनें निर्माण करून समाजाच्या मोहनिद्रेंत व्यत्यय आणतो तो शांतताभंग करणारा पापी दुरात्मा ठरून बहुजनसमाजाला शत्रूप्रमाणें

वाटतो व त्याच्या परिपत्याकरितां सारा बहुजनसमाज त्याच्या विरुद्ध चवताळून उठतो व बहुजनसमाजाचें सुप्त असलेलें आत्मिक सामर्थ्य जागविण्याचा व त्यांना सज्ञान कर्तव्यतत्पर करण्याचा अघोरी प्रयत्न करणाऱ्या महापुरुषाला आपला हाडवैरी समजून बहुजनसमाजाच्या मुर्खपणावरच ज्याच्या वैभवाची इमारत उभारली आहे असे सत्ताधारी त्याचा नायनाट करण्याकरितां जानपदांच्या लोकभ्रमाला उत्तेजन देऊन क्रांतीची आंदोलनें जिथल्या तिथेंच गाडून टाकतात. समाजाच्या निष्क्रिय जीवनाचें सातत्य राखण्याकरितां या शांततेचा सर्वांत जास्त उपयोग होतो. पावसाळ्याच्या अंधाऱ्या रात्रीं अथांग सागरांत प्रवास करणाऱ्या नौकेंतील असहाय्य जीवांना एका क्षणाकरितां काळ्याकुट्ट ढगांच्या जाड आवरणांचा भेद करून आपल्या चमकेनें दिव्य तेजाचें रुपदर्शन घडवून मार्ग—दर्शन करणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें जे समर्थ पुरुष समाजांत नवविचार नि सत्कार्य यांच्या सहाय्यानें मानवोद्धाराचा मार्ग तेजाळण्याचा प्रयत्न करतात त्यांच्या स्फूर्तीचा अवरोध करण्याकरितां समाजांतील हीन, कुजट भावनारुपी कृष्णमेघांची गर्दी उसळून काळोख्या रात्रींची भयाण शांतता रक्षण करण्यासाठीं बहुजनसमाजाच्या प्रतीगामी चळवळीची आणि सवंग हुल्लडीची वृष्टी घडवून आणणें ही शांतिदूताची कुटिल नीति होय. जगाच्या आजवरच्या प्रगतीचा आढावा घेतला असतां कोणत्याहि सूज्ञ इतिहासकारास हें सहज आढळून येईल कीं मानवजातीची जीवन-लढाई शैथिल्य, दुर्बलता व निष्क्रियतेच्या स्मशान शांतीरूप मैदानावर लढली गेली नसून आंतरिक आणि बाह्य निसर्गाशीं जीवन-मरणाचा घनघोर संग्राम करीत असतां संहार, रक्तपात, मृत्यूचें तांडव नृत्य याशिवाय मानवांमानवांतील खून, जाळपोळ, लूटमार व दुष्काळ दुर्दैना नि दारिद्य यांच्या आगींतून मार्ग काढीत काढीत सहस्रावधि

मानवांचें पदोपदीं बलिदान देऊन हा प्रगतीचा एकेक टप्पा गांठला गेला आहे. वर्षाऋतूच्या आरंभीं सजल मेघांनीं जड झालेल्या नि:शब्द वातावरणांत अवरुद्ध वायुच्या सहवासांत सद्गदित आणि कुंठित झालेली पृथ्वी वातावरणाच्या निष्फळ शांततेनें गुदमरून जाते. अंत:-करणांतील उत्कट भावनांचा स्फोट होऊन मनांतील कोपविकारांच्या ज्वाला उष्ण अश्रुबिंदूंच्या रुपानें बाहेर पडाव्या त्याप्रमाणें मेघांच्या गडगडाटाने व विद्युल्लतेच्या तेजस्फुल्लिंगानें अवरुद्धतेच्या जड कवचाचा भेद करून आकाशांतील जलधारा धरणीवर वर्षू लागतात तेव्हां शांत-तेचा भंग होतो. पण ती शांतताभंगाची शुभ वेळा किती आनंद-कारक आणि सुखदायी असते ह्याची कल्पना कृमिकीटकवत् जीवन जगणाऱ्या निस्त्राण झालेल्या गुलामांना येणें शक्य नाहीं. वीरवृत्तीनें जीवन-संग्रामांतील प्रत्येक आघाताचें स्वागत करणाऱ्या व दिव्य अग्नींत आपल्या ध्येयसिद्ध्यर्थ उडी घेण्यास प्रत्यहीं तयार असलेल्या क्रांतिवीरानेंच त्या सुखांतील सात्त्विक आनंद अनुभवावा. धरणी-मातेच्या अंत:करणांतून उफाळणारे कढ बाहेर पडण्यास वाव देऊन अमृत जलधारांच्या सिंचनानें तिच्या अंत:करणाला शांति देणारे व भूगर्भाला बीजवती व फलवती करणारी वृष्टी मेघांचा गडगडाट आणि विजांचा कडकडाट झाल्याशिवाय अवनीतलावर कधींच अवतीर्ण होत नसते. जानपदानें आपल्या मोहक स्तुतीस्तोत्रांनीं सदैव जिचें स्तवन केलें व लोक तंत्रांतील बाजारबुणग्यांनीं युगानुयुगांतून जिची तोंडभर महती गायिली ती शांतता म्हणजे चैतन्यरहित जडाचें मूढ अस्तित्व आणि त्या शांततेचा भंग करणें म्हणजे सृष्टीच्या जड आवरणाचा भेद करून तिच्यांतलें चैतन्य जागृत करणें होय. स्थिरत्व आणि गतिमानता या दोहोंतील भेद म्हणजेच जानपदानें अट्टाहासानें प्रस्थापिलेली शांतता व वीरपुरुषाने त्या शांततेचा भंग

करून अतिमानवाच्या निर्मितीसाठीं घडवून आणलेलें आंदोलन यांतला भेद होय. आपल्या शांत, स्थगित व कदाचित् ऐश्वर्यवान् व सुखविलासी जीवनाचें मोल देऊनहि जिचें स्वागत केलें पाहिजे अशा क्रांतिला शांतता रक्षणाच्या नांवाखालीं दडपून टाकण्याचा प्रयत्न करणें हें मानवाच्या अंतिम प्रगतीच्या दृष्टीनें अहितावह होय. मनुष्यजातीचा विस्तार आणि त्याचें लघुत्व या दोहोंची वाढ सम प्रमाणांत होत असल्यामुळें जों जों मनुष्यजातींचा विस्तार वाढत चालला तों तों त्याचें व्यक्तिमत्व ऱ्हास पावून वरचेवर लघुतर होत चाललें. अर्थात विस्तार हें लघुत्वाचें कारण नाहीं, तर परिणाम आहे. जगांतील मागसलेल्या हीन, असंस्कृत व दुर्बल जातींत संतति उत्पादनाचें प्रमाण आंवाक्या बाहेर असल्यामुळें त्यांच्या विस्तारानें विस्तीर्ण भूप्रदेश व्यापला जाऊं शकतो व कृमिकिटकादि जीवजंतुप्रमाणें किंवा टोळधाडीप्रमाणें भूद्रव्याचा अप्रतिहतपणें अपहार करून ते लवकरच भूभार होऊन बसतात. विस्ताराशीं त्यांचें सामर्थ्य व्यस्त प्रमाणांत असल्यामुळें आंतरराष्ट्रीय जीवनकलहांत सरशी करून निसर्गाच्या विशिष्ठ मर्यादा सोडून अधिक व्याप्ती त्यांना शक्य होत नाहीं. संस्कृतिहीनता व अज्ञान यामुळें भूमिद्रव्याची वाढ, विनिमयद्वारें अर्थोत्पादन व जगांतल्या इतर प्रदेशांत आपल्या आर्थिक हितसंबंधाचा विस्तार हेंहि शक्य होत नाहीं. याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे त्यांच्या जीवनाचा दर्जा सतत खालावत जातो व त्याच त्या प्रमाणांत त्यांचें व्यक्तित्व हिणकस होत जातें व सरते शेवटीं अखिल मानव जातीला लांच्छनास्पद व कलंकवत असें त्यांचें अस्तित्व होऊं लागतें. शरीराचा एकादा अवयव विषाची बाधा होऊन सडूं लागला म्हणजे तो कापून टाकल्याशिवाय शरीराचें संरक्षण होणें शक्य नाहीं नसतां त्या सडलेल्या

अवयवाचें विष संपूर्ण शरीरांत संचार करून मनुष्याला मृत्यु पंथाला लावतें. त्या प्रमाणेंच जगाच्या पाठीवर शेणकिड्याप्रमाणें आपलें घृणायुक्त जीवन जगणाऱ्या गुलाम राष्ट्रांचें अस्तित्व हें अखिल मानव-जातीकरितां धोका निर्माण करणारें आहे. एकतर त्याची गुलामगिरी नाहींशी व्हावी अथवा त्यांचे अस्तित्व नाहींसे व्हावें यांतच जगाचें हित आहे. ज्या गुलामांची गुलामगिरी त्यांच्या जीवनाशीं एकरूप झाली व स्वतंत्र होण्याची इच्छाहि नाहींशी झाली त्यांना जगांत जगण्याचा खरोखरच कांहीं अधिकार नाहीं. जीवश्रेष्ठांचा या जगांत जगण्याचा हक्क मनुष्यानें आपल्या तीव्र शस्त्रादिकांनीं सहस्त्रावधि पशुपक्षांचा संहार करून व भयाण अरण्याची भयाणता आपल्या बुद्धिकौशल्यानें नाहींशी करून जगांत प्रस्थापित केला नसतां तर मातीच्या कणांगणती लाखांनीं उत्पन्न होणाऱ्या जीवजंतूंनीं, पृथ्वीचा पृष्ठभाग आपल्या मोकाट विस्तारानें व्यापणाऱ्या झाडाझुडपांनीं व दऱ्याखोऱ्यांतून व जंगलांजंगलांतून भटकणाऱ्या पशुपक्षांदिकांनीं, हिंस्त्र पशूंनीं, विषारी प्राण्यांनीं व जलचर, स्थलचर, जीवयोनींनीं जगाच्या पाठीवर एकहि मनुष्य शिल्लक ठेवला नसता. जगांतील श्रेष्ठ राष्ट्रांच्या अंगाभोंवतीं वीरवृत्तीचें संरक्षककवच आपल्या अभेद्य आवरणानें वाटेल त्या पाशवी व भौतिक आक्रमणाला हिणविण्या-करितां सदैव सज्ज राहिलें नसतें व त्यांच्या सांस्कृतिक श्रेष्ठतेनें त्यांना सदैव जागरूक ठेवलें नसतें तर गुलामगिरीच्या विषारी वातावरणांत जन्मून जगभर पसरणाऱ्या अतिशूद्र दासजनांनीं त्यानां केव्हांच आपल्या विषाची बाधा करून आत्मसात् करून टाकलें असतें. जगाचा अधिकांश भाग जगांतल्या निरुपयोगी जानपदानें व्यापला असल्यामुळें जगांतल्या एकाद्या देशांत आकस्मिक योगानें व गिर्वाणसंस्कृतीच्या आशिर्वादानें जानपद-संस्कृतीचा नायनाट

होऊन तिच्या जागीं उन्मार्गगामी व तेजस्वी शाक्त-संस्कृति उदय पावते. सामर्थ्याची उपासना करणारे त्या देशांतील लोक उच्च आकांशा व उच्च ध्येयें यांनीं प्रेरित होऊन उदात्त तत्त्वावर अधिष्ठित झालेली समाजरचना निर्माण करून व्यक्तिविकास व जातीविकास करण्यास आरंभ करतात. तेंव्हां त्यांच्या भौतिक विकासाला देशाच्या नैसर्गिक मर्यादा-क्षेत्र अपुरें पडूं लागतें. अशा वेळीं निसर्ग मर्यादेचें कवच फोडून आपल्या विकसित शक्तीला जगाच्या अमर्याद क्षेत्रांत वाव देणें अथवा निसर्गाच्या बंदिस्त चौकटींत गुदमरून आत्मघात करून घेणें याशिवाय दुसरा मार्ग शिल्लक राहत नाहीं. जागतिक शांतता रक्षणाच्या मायावी बुद्धिभेदक तत्त्वाला फसून या नवोदित राष्ट्रांतील लोकांनीं आपल्या स्फूर्तीवर व वीरवृत्तीवर बंधन घालून घेतलें तर त्यांचा सर्व नाश झालाच म्हणून समजा. पण हत्तीचें गंडस्थळ फोडून मदमौक्तिकानें आपली भूक शमविणाऱ्या वनराज केसरीप्रमाणें जंगलांतील शृगाल सैन्याच्या कोल्हेकुईला न जुमानतां मानवजातीला कलंकवत व लांच्छनास्पद रीतीनें जीवन जगून आपल्या हीन संस्कृतीचा प्रसार करीत भूमीला भार होणाऱ्या दासजनांनीं गजबजलेल्या भूमीवर आपलें अधिष्ठान रोवण्याकरितां आक्रमण केलें तर या त्यांच्या न्याय्य आणि प्रगतिकारक हक्काला विरोध करण्याकरितां साऱ्या जगांतील जानपद राष्ट्रें वाणिज्य-राष्ट्रांच्या नेतृत्वाखालीं एकत्र होऊन सशस्त्र प्रतिकाराला सिद्ध होतात व आंतरराष्ट्रीय शांततेच्या संरक्षणाकरतां स्वत:च शांततेचा भंग करून महायुद्धाच्या ज्वाला भडकवून देतात. वास्तविक या शांतीच्या दलालांना दासराष्ट्रांसंबंधीं यत्किंचित्‌हि सहानुभूति नसतांना केवळ आपल्या वाणिज्य हितसंबंधांना धोका पोहोंचेल याच भीतीने त्यांच्या या शांतीच्या गर्जना असतात. व जानपदांची कोल्हेकुई ही त्यांच्या

नेहमींच्या प्रवृत्तींनुसार जगांतील साऱ्या तेजस्वितेचा नायनाट करण्या करितां असते. या युद्धाचा शेवट कांहींहि होवो पण परिणाम मात्र हाच होतो कीं उच्च जातीच्या जीवनाला आवश्यक असणारे वातावरण लौकरच दूषित होऊन जातें व मानवतेच्या श्रेष्ठत्वाचा काल अधिकाधिक दूर लोटला जातो. प्रत्येक उदयोन्मुख सामर्थ्यशाली राष्ट्राच्या उत्कर्षापकर्षाचा इतिहास याच घडामोडींनीं बनलेला आहे.

शतकानुशतक पददलित आणि अवनत अवस्थेंत राहून ज्यांच्या पौरुषाचें तेज मावळलें आहे, ज्यांचें सत्व नाहींसें झालें आहे, व समाज-विघटनाची क्रिया पूर्णत्वाला पोहोंचून राष्ट्रीय जीवनाचें सूत्र पांगलें आहे, त्यांच्यांत काल्पनिक उदात्त तत्त्वांचीं रडगाणीं गाण्याकरतांच दुर्मुखलेल्या वृत्तीनें जीवनांतील दुःखावरच ज्यांची सर्व आत्मिक शक्ति केंद्रित होऊन नैराश्यवादानें ज्यांचें आयुष्य भारलें जाऊन निष्क्रिय, निर्जीव व स्फूर्तिहीन बनलें आहे अशा दोन अबलांच्या ऐक्याप्रमाणें सहकारी तत्त्वावर संघटना होऊं शकते. या विलापिकेंतील सर्वांत मोठे सूर हताश, पराभूत आणि स्त्रैण मनोवृत्तींतून निघालेले अहिंसेचें सूर होत. या अशास्त्रीय, अधार्मिक आणि भ्रामक तत्त्वानें फार प्राचीन काळीं हिंदुस्थानच्या जनतेला पछाडून जवळजवळ एक हजार वर्षांच्या सतत पराभवाचा, अपमानाचा, व दुर्दैन्याचा अंधकारमय इतिहास घडविला व पारतंत्र्याच्या शृंखला इतक्या पक्कया व घट्ट आवळल्या कीं शेंकडों वेळेस अनेक वीरश्रेष्ठांनीं आपल्या दैवी सामर्थ्यानें त्याच्यावर प्रहार करून तोडले असतांहि पुन्हां पुन्हां या शापित भारतीय जनतेनें आपल्या हातानें त्या जोडून घेतल्या व मानसिक हतबलतेनें मनोविकृत झालेल्या समाजाचें पारतंत्र्य कृत्रिम उपायानें प्राप्त केलेल्या राजकीय स्वातंत्र्यानें

नष्ट होत नसतें हें वारंवार सिद्ध करून दिलें. अहिंसेचें तत्त्व वस्तुत: अत्यंत अशास्त्रीय आहे कारण तें निसर्गविरुद्ध आहे. समाजांतील असंस्कृत, परतंत्र, व दुबल वर्गानें भौतिक सामर्थ्य प्राप्त करून घेण्याच्या अशक्यतेमुळें आपल्या विकल मानसिक अवस्थेंतून या तत्त्वाला जन्म दिला व समोरासमोर शत्रूशीं लढून त्याला जिंकतां येत नसतां आपल्या मायावी कपटविद्येनें मदिरेच्या मोहक अमलांत त्याला गुंग करून त्याचे खिसे कापणाऱ्या चोराप्रमाणें अथवा प्रगट-पणें जगांत न जगतां आल्यामुळें अति सूक्ष्म रूप धारण करून गुप्त रुपानें जगांत रोगांचा फैलाव करणाऱ्या विषारी जंतूप्रमाणें गुलामांनीं जेत्यांवर विजय मिळविण्याकरितां त्यांच्यात या हीन तत्त्वांचा प्रसार करून त्यांच्या हातांतील भौतिक सामर्थ्याचें शस्त्र हिरावून घेतलें. आपल्या सामर्थ्यानें साऱ्या जगाला जिंकण्याची शक्यता असतांहि जगा आणि जगूं द्या या उदार धोरणानें जगावर दया दाखवून सर्वांना आपल्यासारखें सामर्थ्यवान् बनविण्याची उच्च महत्त्वाकांक्षा ज्यांच्या मनांत असेल त्यांनीं अहिंसा तत्त्वानें प्रेरित होऊन शरणाग-ताला जीवदान दिलें व जिवंत राहून आपल्या जीवनध्येयाचा मार्ग शोधण्याची संधि दिली तर ती अहिंसा नि:संशय श्रेष्ठ होय. पण दारिद्र्याचें अकिंचनत्व नपुंसकाचें ब्रम्हचर्य, भित्र्या आणि दुबलांची अहिंसा, पराभूताची क्षमा, ज्याच्या कोपानें नाशाची भीति नाहीं अशा सामर्थ्यहीनांची दया व दैवानें हतबल झालेल्यांचें वैराग्य हें कधींहि प्रशंसेला पात्र नाहींत व सद्गुणांचा आदर्श होण्याची त्यांची योग्यता नाहीं.

वास्तविक जगाच्या इतिहासांत जानपदसंस्कृतीची जी ठळक वैशिष्ट्यें दिसून येतात व जागतिक लढ्यांत ज्या तत्त्वांनीं विशेषेंकरून जानपदसंस्कृतीच्या विनाशक कार्याला तात्त्विक भूमिका प्राप्त करून

दिली त्यांत अहिंसेला गौणस्थान आहे. पण हिन्दुस्थानांत गीर्वाणसंस्कृति अगर शाक्तसंस्कृतीच्या उदयाला जानपदसंस्कृतीनें कसून जो विरोध केला त्या विरोधांत इतर तत्त्वाभासात्मक भूमिके-बरोबर प्रामुख्यानें अहिंसेचीहि भूमिका होती. म्हणूनच त्याची छाननी करणें आवश्यक आहे. हिंदुस्थानच्या बाहेर अमेरिकेंतील **निग्रो** व कोरियांतील **कोरियन्स** यांनींहि आपापल्या इतिहासांत या तत्त्वाच्या राजकीय भूमिकेला उठाव दिला. पण त्याच्या मागें तत्त्वज्ञानाची विशेष परंपरा असल्याचा देखावा त्यांनीं कधींच केला नसल्यानें तीं उदाहरणें इतिहासाच्या अभ्यासकाला उपेक्षणीय वाटण्यासारखी आहेत. पण हिंदुस्थानांत मात्र या तत्त्वानें गेल्या दीड हजार वर्षांपासून जानपदाच्या मनाची चांगलीच पकड घेतली आहे. मानवजातीच्या प्राथमिक अवस्थेंत भोंवतालच्या प्रतिकूल परिस्थितींतून आपल्या बुद्धि-कौशल्यानें मार्ग काढणाऱ्या मनुष्याच्या मनाची ठेवण ही मुख्यत्वेंकरून भौतिकच होती हें कोणत्याहि शास्त्रज्ञाला मान्य करावें लागेल. तमांतून रजाकडे व रजांतून सत्वाकडे उन्नत व परिणत होणारा सृष्टीचा क्रम सोडून खालीं डोके वर पाय अशी इतिहासाची उभारणी करण्यानें जगाचें खरें स्वरूप कळणें कधींच शक्य नाहीं. भौतिक वादाच्या पूर्ण विकासाची परिणती आधात्म्य वादांत होणें हीच जगाच्या प्रगतीची खरी दिशा होय. जीवनाची परिणती मृत्यूंत आहे म्हणूनच स्मशानांतल्या चितेवर आपल्या आयुष्याची उभारणी करणारा खचितच् वेडा पीर ठरेल. त्या बरोबर हेंहि खरें कीं आयुष्यभर चुकूनहि मृत्यु अगर त्यानंतर प्राप्त होणारी अवस्था याचा ज्यानें कधीं विचार केला नाहीं त्याला आयुष्याचा मार्ग यशस्वीतेनें व निश्चित ध्येयानें चोखाळतां येईल हेंहि शक्य नाहीं. जगा, सामर्थ्यसंपन्न होऊन जगा, जीवनाला

विरोधी असणाऱ्या शक्तींचा नायनाट करून जगा व जगतां जगतां जीवनानंतरच्या ध्येयाची सिद्धी करणारी साधनें प्राप्त करून घ्या व जीवनाची प्रभात व माध्यान्ह हे टळल्यावर प्राप्त होणाऱ्या सांज वेळेस आपली सर्व जीवनशक्ति एकवटून आयुष्यभराची पुण्याई पणाला लावून आपल्या रात्रीचा मार्ग सुलभ व सुखकारक करण्याच्या तयारीनें सज्ज उभें राहा हा अतिप्राचीन काळापासून विजिगिषु आर्यांच्या धर्मानें दिलेला, ब्रम्हवेत्त्या मंत्रद्रष्ट्या ऋषींना स्फुरलेला, व पवित्र उपनिषदांनीं गायिलेला व सत्यपूर्ण आदेश आहे. भौतिक-जीवन जगणाऱ्या मानवाला आपल्या आयुष्यरेषेच्या आरंभ बिंदु-पाशींच त्याचें अंतिम ध्येय माहीत असावें एवढाच त्यांचा हेतु.

या जगांत जगण्याकरतां मानवाला काय काय करावें लागलें याची आपण कल्पना केली म्हणजे ‘ जीवोजीवस्य जीवनम् ’, जीवनकलह व जीवनकलहांत यशस्वी झालेल्या श्रेष्ठांचें जीवन या तत्त्वांची प्रचिती आपणांस पटेल. एक क्षणभर जगण्याकरतासुद्धां मनुष्यमात्राला सृष्टींतील हजारों जीव जंतूंचा क्षय करून त्यांच्या विनाशावर आपल्या अस्तित्वाची उभारणी करावी लागते. कोट्यवधि जीवांची उत्पत्ती आणि लय प्रत्येक क्षणाला सारखा चालू असतो. दृष्टीला अगोचर पण आधिभौतिक शास्त्रज्ञांच्या सूक्ष्म दृष्टीला प्रतीत झालेल्या जीवसृष्टींत चाललेलें भयानक संहारकांड निरपवादपणें युगानुयुग चालू राहील. जडसृष्टीहून जीवसृष्टीला निराळें न मानणारें तत्त्ववेत्ते या हत्याकांडाचें खरे स्वरूप अधिक जाणूं शकतात. तर्कप्रणीत तत्त्वज्ञानाच्या कक्षेंतून निघून शास्त्रज्ञांच्या प्रयोगजन्य ज्ञानाच्या आटोक्यांत आलेल्या सिद्धांतानुसार वनस्पती आणि प्राणी यांच्या जीवनव्यापारांतील भेद जवळ जवळ नाहींसा झाला आहे. अहोरात्र सतत चाललेल्या या वनस्पती जीवनाच्या संहारावरच

मनुष्य जातीचे प्राण वाचले आहेत. याहीपेक्षां अलीकडे येउन प्रत्यक्ष व्यवहारांत पाहूं लागलों तर पशुपक्षांच्या संहारावर अधिकांश मानवजातीचें जीवित अवलंबून आहे. आरोग्यशास्त्रदृष्टया मांसाहार चांगला कां वाईट हा प्रश्न ऐच्छिक म्हणून बाजूला टाकला तरी मांसाहारांत तात्विक दोष काय हा प्रश्न शिल्लक राहतोच. मनुष्यजातीच्या अवाढव्य विस्तारानें या प्रश्नाचें महत्व जीवन-मरणा इतकेंच झालेलें आहे. मनुष्यजातीच्या बेसुमार वाढीला दुष्काळ, रोगराई, व अपमृत्यु इत्यादि प्रहारानें थांबविण्याचा निसर्गाचा प्रयत्न अव्याहतपणें चालू असतां आम्ही मात्र अहिंसेचें मोडकें तुणतुणें वाजवीत बसणें हें सृष्टीक्रमाशीं विसंगत तर आहेच पण आत्मघातकीपणें प्रत्यक्ष मृत्यूला कवटाळण्यासारखें होय. दुष्टांच्या दुष्टपणाला आपल्या अहिंसात्मक व सत्याधिष्ठित आत्मिक सामर्थ्यानें जिंकतां येते हा सिद्धांत खरा असला तरी त्याची अंमल-बजावणी करतांना अत्यंत मूर्खपणानें आणि अज्ञानानें आम्ही दोन गोष्टी गृहीतकृत्य म्हणून धरल्या आहेत हें आम्ही विसरतों. न्यून-गंडानें क्षीण बनलेल्या दुर्बल व संस्कृतिहीन अशा मानवांत आध्या-त्मिक सामर्थ्य असतें हे पहिलें भ्रामक गृहीतकृत्य व दुष्टतेशीं एकरुप झालेल्या दुष्टांचा दुष्टपणा त्यांच्यापासून अलग करतां येतो ही दुसरी तर्कदुष्ट समजूत. ज्यांच्या अंत:करणांतील सदसद्विवेक बुद्धि मेली नसून सुप्तावस्थेंत आहे, मलिन झाली आहे अथवा आत्म-प्रतीतीच्या अभावानें विसराळी पडली आहे, तिला सत्पुरुषांच्या सत्प्रवृत्तींच्या प्रभावानें जाणवितां येते पण ज्यांची सदसद्विवेक बुद्धि नष्ट झाली आहे अशा पाशवी सामर्थ्यानें अंध झालेल्या नराधमाची सत्प्रवृत्ती जागविण्याकरितां स्वत: हीन असलेल्या व अध:पतनाच्या पराकोटीला पोहोंचलेल्या पापी, पण सत्त्वाचा दंभ माजविणाऱ्या

दुर्बलानें आपल्या अंत:करणांतील आभासात्मक सत्प्रवृत्तींच्या प्रभावानें कितीहि प्रयत्न केला तरी त्यापासून काय निष्पन्न होणार ? स्वाभाविक हीनतेनें सैतानी कुटिलतेला आळविल्यानें अत्याचाराची वाढ होण्यापेक्षां दुसरें काय होणार ? दारूनें झिंगून गटारांत लोळणाऱ्या मूर्खानें कैफाच्या धुंदींत तोंडावाटें न कळत बाहेर पडणाऱ्या बडबडींतून अकस्मिकपणें प्रगट होणाऱ्या कविकल्पनांनीं रस्त्यावरची अडगळ दूर सारण्यासाठीं जमलेल्या नगर रक्षकांच्या अंत:करणांतील रसिकता जागृत करण्याचा व त्यांना मोहविण्याचा प्रयत्न करणें हें जितकें हास्यास्पद, तितकेंच एखाद्या लघुमानवानें आपल्या नपुंसकत्वाला ब्रम्हचर्य, भ्याडपणाला अहिंसा व दुर्बलतेला सात्विकता समजून अज्ञानामुळें तमोगुणीं मनोविकृतींत भासमान होणाऱ्या अध्यात्मिक शक्तीच्या जोरावर त्याला लाथाडणाऱ्या भौतिक सामर्थ्याला जिंकण्याचा प्रयत्न करणें हें तिरस्करणीय होय. उच्चतर सामर्थ्यानें लघुतर सामर्थ्याचा प्रतिकार करणें यासारखें यशाचें खात्रीलायक साधन नाहीं. पण लघुतर सामर्थ्यहि त्याच्या आवांक्याबाहेर आहे, त्याला केवळ कल्पनेने उच्चतर सामर्थ्याची प्राप्ती कशी होणार ? स्वप्नांत प्राप्त झालेल्या संपत्तीनें प्रत्यक्ष जगांत सुखोपभोग घेतां येत नाहीं त्या प्रमाणेंच शतकानुशतकाच्या पारतंत्र्यानें अध:-पतित व हतवीर्य झालेल्या दासांना स्वप्नाळूपणानें स्वप्नांत प्रतीत होणाऱ्या आत्मिक सामर्थ्यानें व्यवहारांतला कटु जीवनसंग्राम लढता येणे शक्य नाहीं. निवृत्तीच्या मार्गानें मानवजातीला शून्यांत नेऊन पोहोंचविणाऱ्या अडाणी **गौतमबुद्धानें** अमंगल मुहुर्तावर आपल्या-पराभूत मनोवृत्तींतून निर्माण केलेले हें अहिंसा तत्व भारताच्या असंस्कृत जानपदाच्या अतृप्त आकांक्षांचें पिशाच्च बनून भारतीयांच्या मानगुटीवर बसलें आहे. बौद्धांचा धर्म आणि त्यांची समाजरचना

ही गेली पण या पिशाच्चाचा अवतार अजून संपला नाहीं व या विसाव्या शतकांतहि नवें रूप धारण करून भारतीयांच्या उरल्या-सुरल्या पौरुषाची खची करण्याचें काम त्यानें चालू ठेवलें. पण जगांतील वाणिज्य संस्कृतीचे दलाल स्वत: मांत्रिक बनून आपल्या स्वार्थी हेतूंच्या संरक्षणासाठीं याला नाचवीत आहेत. स्वत: अतिरिक्त मांसाशनानें अजीर्ण होऊन प्राण सोडणाऱ्या बुद्धानें या अहिंसा तत्त्वाचें कितपत पालन केलें याची साक्ष इतिहास देत आहे. अखिल भारतातच नव्हे तर जगाच्या कोनाकोपऱ्यांत बुद्धधर्माचा प्रसार करणाऱ्या **सम्राट अशोकाचा** बुद्धधर्माचा महान् पुरस्कर्ता व अहिंसेचा पुजारी म्हणून सदैव गौरव केला जातो, तो वाणिज्य-संस्कृतिचा प्रवर्तक नि संरक्षक असल्यामुळें कलिंगासारख्या एका छोट्या राजाशीं टक्कर घेतल्याबरोबर आपल्या भौतिक सामर्थ्याच्या जोरांवर भारतांतील अनेकविध राष्ट्रीकांना जिंकून आपलें एकछत्री साम्राज्य प्रस्थापित करणें किती दुष्कर आहे ह्याची त्याला खात्री पटली व त्यानें लोकांची प्रतिकारक्षमता नाहींशी करण्याकरितां त्यांना अहिंसेचा महामंत्र शिकवून आपल्या हातांतील शस्त्र न जाऊं देता इतरांच्या हातांतील शस्त्र काढून घेतलें आणि राजकीय साधनांनीं जें साध्य झालें नसतें तें बहुजन समाजाला अफूची गुंगी आणून धर्मसंरक्षण व धर्मप्रसाराच्या नांवाखालीं साध्य करून घेतलें व हा देवप्रिय राजा रक्ताचा एकहि थेंब न सांडतां प्रतिकारहीन भारताचा चक्रवर्ति राजा बनला. या पाव शतकाच्या रक्तपानहीन राजवटीचा सूड भवितव्यतेनें अशोकाच्या मरणानंतर मनसोक्त उगवून घेतला आणि भौतिक सामर्थ्याच्या प्रखरतेनें तळपणारी अशोकाची तलवार अहिंसा तत्त्वाची पाठ-राखण करण्याचें थांबवून अशोकाबरोबरच काळाच्या ओघांत वाहून जातांक्षणींच एकछत्री अहिंसात्मक साम्राज्याचें

स्वप्न वाऱ्यावर विरून गेलें. सबंध देशांत अराजकता माजली. यादवी, कलह, बंड आणि रक्तपात यांनीं सबंध भरतवर्षांत धुमाकूळ घातला. व पाटलीपुत्रांतल्या अहिंसात्मक राजपीठाची सत्ता मगध-देशापुरतीच मर्यादित झाली. थोड्याच काळांत प्रतिबुद्धाचें दैवी सिंहासन मगधांतील यादवीनें रक्तलांछित झालें. यापुढेंहि **कनिष्ट** आणि **हर्षा**सारख्या सम्राटानें अहिंसेचा पुरस्कार केला पण तो सुद्धां धार्मिक अंधश्रद्धा, तत्त्वांचे पालन न करितां त्याजविषयीं पूज्य-भाव व्यक्त करण्याची प्रवृत्ति व मिळविलेलें साम्राज्य निर्वेधपणें स्थिर राखण्यासाठीं योजिलेला राजनीतीचा कुटील डाव या दृष्टीनेंच त्या अहिंसा तत्त्वाचें महत्त्व इतिहासकाराला नाहीं. अहिंसेच्या आधु-निक प्रयोग-कालींसुद्धां अहिंसेचा आरंभ केवळ एक राजकीय धोरण म्हणून व निःशस्त्राचें प्रतिकाराचें एकमेव साधन म्हणूनच झाला. पण साधनाशीं एकरूप होऊन लौकरच साधनाला साध्य समजण्याचा जानपदसंस्कृतीतील विशिष्ठ गुणामुळें व साम्राज्य-सत्ताधारी वाणिज्य संस्कृतिप्रधान वर्गाच्या अप्रत्यक्ष पण कुटिल उत्तेजनानें या तत्त्वाला पुष्टि मिळून साधनाचे साध्य व धोरणाचा धर्म बनला. आणि जे अहिंसेच्या मार्गानें मिळविलेलें नसेल असलें स्वातंत्र्य आम्हांला नको असें म्हणण्यापर्यंत भारतांतील वतनदार दासजनांची मजल गेली. या सर्व आक्षेपांपेक्षा महत्त्वाचा आक्षेप हा आहे कीं अहिंसावृत्ति ही मनुष्याच्या आध्यात्मिक उन्नतीची निदर्शक आहे, अशा स्थितींत आध्यात्मिक सामर्थ्याचा उपयोग जगांतील पार्थिव वैभवाच्या प्राप्तीसाठीं करणें हीं आध्यात्मवादाला कमीपणा आणणारी गोष्ट आहे. एवढेंच नव्हे तर आध्यात्माचा असा दुरुपयोग करणाऱ्याचें आध्यात्मिक सामर्थ्य एक क्षणभरहि टिकणें शक्य नाहीं. खरोखरच ज्या महात्म्याची आध्यात्मिक उन्नति

होऊन त्याच्या आत्मिक शक्तीचें सामर्थ्य त्यांत आलें असेल असा मनुष्य नश्वर भौतिक ऐश्वर्याच्या प्राप्तीकरतां प्रयत्न करील हें अगदींच असंभवनीय आहे. प्रत्यक्ष **कुबेराची** संपत्ती **इंद्राचें** ऐश्वर्य प्राप्त झालेल्या पुरुषश्रेष्ठाने अन्नपूर्णेचा सुग्रास नैवेद्य सोडून उकिरड्यावर पडलेल्या शिळ्या भाकरीच्या तुकड्यांची अपेक्षा करावी यांतलाच हा प्रकार होईल. मानवी जीवनाचें अंतिम साध्य असें आध्यात्मिक सामर्थ्य हातीं आल्यावर त्याचीं केवळ साधनें असलेली सत्ता, ऐश्वर्य, राजकीय स्वातंत्र्य व समाजाची आर्थिक उन्नति इत्यादि क्षुद्र गोष्टीकरितां कोण झगडत बसणार? प्रत्यक्ष काशीची गंगा घरीं चालत आल्यावर घर कुलांतली शिदोरी घेऊन गंगास्नानासाठीं हजारों मैलाचा प्रवास करण्यास निघणारा यात्रेकरू त्रिभुवनांत कोठें सांपडेल काय? पण जेथें सर्वच व्यवहार स्वप्नांतल्या भासावर आत्म-वंचनेनें चालले आहेत तेथें हे युक्तिवाद लागू पडणार नाहींत. **भर्तृहरीने** म्हटल्याप्रमाणें झोंपी गेलेल्याला जागें करतां येतें, जागें असूनहि झोपेचें ढोंग करणाऱ्यापुढें मात्र निरुपाय आहे. आंतर-राष्ट्रीय क्षेत्रांत जानपदांच्या या दुर्गुणी प्रवृत्तींचा पुरस्कार आपल्या स्वार्थाकरितां वाणिज्य राष्ट्रांनीं केला. त्याचप्रमाणें परतंत्र राष्ट्रांतील वैश्य-वर्गानें या तत्त्व प्रसाराला सर्वांत जास्त हातभार लावला. प्राण्याच्या शरीराला चिकटून अव्याहतपणें रक्तशोषण करणाऱ्या जळवांप्रमाणें समाजपुरुषाचें आर्थिक शोषण करणाऱ्या वैश्य वर्गाला आपल्या हितसंबंधाचें रक्षण, आपल्या सामर्थ्यहीन जीवनाची सुरक्षितता व आपलें आर्थिक वर्चस्व कायम ठेवण्याकरितां आवश्यक असलेले समाजाचें बौद्धिक नेतृत्व या गोष्टी प्राप्त करून घेण्याकरितां अहिंसा तत्त्वाचा उदोउदो करून प्रतिकारहीन व निरुपद्रवी समाजांत आपल्या विनिमय शक्तीचें प्राबल्य वाढविण्यास वाव

मिळाला. राजकीय पारतंत्र्याचा काल एका विशिष्ट मर्यादेपर्यंत वैश्य-वर्गाच्या या कारस्थानास अनुकुल परिस्थिती प्राप्त करून देऊं शकला. जानपदसंस्कृतींत खिचपत पडलेल्या परतंत्र राष्ट्रांतील राज-कारणाचीं सूत्रें वैश्य वर्गाच्या हातीं गेलीं म्हणजे वाणिज्य संस्कृति-प्रधान साम्राज्याशीं त्या देशाचें संबंध चिरस्थायी होऊन वाघाच्या शेंपटीला अडकलेल्या लांडगेबुवाप्रमाणें इतिहासांतील सर्व आंतर-राष्ट्रीय उलाढालींत त्याला फरफटत ओढत जावें लागते व पुढें कधीं काळीं प्राप्त होणाऱ्या राजकीय स्वातंत्र्याच्या काळांतहि वाणिज्य-संस्कृतीचेंच वर्चस्व या देशांत व्हावें अशा क्रमाची बीजें पेरलीं जातात. रक्तपाताशिवाय राजकारण होत नसतें हा इतिहासाचा नियम विसरून अर्ज, विनंत्या, हुल्लडबाजी, आततायीपणा व बौद्धिक चतुराईनें रंगलेली पत्रकबाजी आणि प्रचाराच्या नांवाखालीं तयार केलेलें बहुसंख्येशिवाय दुसरे कसलेहि बळ नसलेले निर्जीव लोकमत इत्यादि उपायांनीं देशांतील राजकारण लढविण्याची परंपरा हीन अहिंसावृत्तीच्या प्रसारानेंच आरंभ झाली.

जानपदसंस्कृतींतील तत्त्वज्ञानाचा शेवटचा व अद्ययावत् बाले-किल्ला म्हणजे विपर्यस्त राष्ट्रवाद व दिशाभूल करणारें स्वयंनिर्णयाचें तत्त्व. जगांतील प्रत्येक लहानमोठ्या राष्ट्राला आपल्या विशिष्ट भौगोलिक मर्यादेच्या आंत आपल्या इच्छेनुरुप राज्यतंत्र उभारून स्वतंत्र राहण्याचा व जगण्याचा मूलभूत हक्क आहे ही कल्पना याच्या बुडाशीं आहे. युरोपांतील मध्ययुगीन साम्राज्यांचा विनाश होत असतां, राष्ट्रवादाची ही कल्पना हळूं हळूं उगम पावूं लागली. मध्ययुगाचीं शेवटचीं स्मारकें म्हणजे ऑस्ट्रियाचें 'होली रोमन एम्पायर' व तुर्कांचे 'ऑटोमन एम्पायर'. गेल्या महायुद्धाच्या-पूर्वींच युरोपियन राष्ट्रांनें ऑटोमन साम्राज्याचें लचके तोडून राष्ट्रीय

स्वयंनिर्णयाच्या तत्त्वासाठीं लहान लहान बाल्कन राष्ट्रें स्थापन करविलीं व ज्यांना गतेतिहासांत कधींहि स्वतंत्र व वेगळें अस्तित्व नव्हतें अशा लोकांची आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या सोयीकरितां निरनिराळीं राज्यें घडवून त्यांच्या अंगीं राष्ट्रीयत्वाचा अभिनिवेश निर्माण केला. हीच परंपरा पुढें चालून गेल्या जर्मन महायुद्धानंतर ऑस्ट्रियन साम्राज्याचें विघटीकरण होऊन कृत्रिम भौगोलिक मर्यादेंत अजून कांहीं खिचडी राष्ट्रें स्वतंत्र्य राज्यतंत्राखालीं स्थापविण्यांत आलीं. असल्याच प्रकारचें कार्य संयुक्त अमेरिकेच्या नेतृत्वाखालीं स्पॅनिश साम्राज्याच्या विध्वंसनानंतर दक्षिण अमेरिकेंत चालवून वेगवेगळ्या भौगोलिक प्रांतांशीं समरूप अशीं अनेक राष्ट्रें संयुक्त अमेरिकेच्या आर्थिक हितसंबंधाच्या सुरक्षिततेसाठीं व राजकीय वर्चस्वाच्या सुलभतेसाठीं निर्माण केली गेलीं. एकीकडे साम्राज्य विघटनाची ही कार्यप्रणाली केवळ राष्ट्रीय स्वयंनिर्णयाच्या उदात्त तत्त्वाकरतां चालू असतां दुसरीकडे वाणिज्यसंस्कृतिप्रधान साम्राज्यें हजारों वर्षांपासून स्वतंत्र वेगवेगळें अस्तित्व, सांस्कृतिक वैशिष्ठ्य, विशेष प्रकारची इतिहास परंपरा व वांशिक नि धार्मिक भिन्नता यांनीं युक्त असलेल्या भिन्न भिन्न राष्ट्रांना त्यांच्या दुर्बलतेचा फायदा घेऊन कधीं कधीं राजरोस आक्रमण करून तर कधीं व्यापाराच्या निमित्तानें आर्थिक हितसंबंध प्रस्थापित करून, कधीं आंतरराष्ट्रीय तहाच्या वाटाघाटींत कलमेच्या फटकाऱ्यानें तर कधीं परस्पर मैत्रीच्या व संरक्षणाच्या आश्वासनाचा तह करून आपल्या साम्राज्यांत प्रविष्ट करून घेण्याचा सपाटा चालवित होतीं. रशिया सारख्या वरपंगी साम्राज्यविरोधी असलेल्या समाजसत्तावादी राष्ट्रानेंहि या कामांत स्वतःला मागें पडूं दिलें नाहीं. आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या सोयीं करितां कृत्रिम उपायानें राष्ट्राची निर्मिती अशी केली जाते याचें

उत्तम उदाहरण तुर्कीसाम्राज्याच्या विघटनेनंतर इस्लामी जगांत जो चीरफाडीचा प्रकार झाला व तुर्कस्थान ते इराणच्या दरम्यान अनेक लहान लहान राष्ट्रें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार स्थापण्यांत आलीं त्यावरून समजण्यासारखें आहे. हा सर्व इतिहास सांगण्याचा मुख्य हेतु हा कीं मानव-विकासांतील ऐतिहासिक क्रमानुसार राष्ट्रवादाची कल्पना अस्तित्वांत आली नसून वाणिज्यसंस्कृतिप्रधान साम्राज्याच्या परस्पर कलहांत एकमेकांपासून सुरक्षित राहण्या-करितां व प्रतिस्पर्धी पराभूत साम्राज्याचें विघटन करतांना त्या राज्याच्या पुनरुत्थानाची शक्यता नष्ट करण्याच्या दृष्टीनें भांडकुदळ असंरक्षणक्षम व दोन साम्राज्यांतील संरक्षक फळीप्रमाणें काम देणारी लघुराष्ट्रमालीका निर्माण करण्याचा आंतरराष्ट्रीय राजनीतीचा कुटील डाव याच्या मागें आहे हें उघड होय. रशियन राज्यक्रान्तीनंतर रशिया व जर्मनीच्या दरम्यान जीं दोनतीन लहान राष्ट्रें निर्माण करून त्यांना 'स्वतंत्रराज्यतंत्र स्थापवून दिलें त्या उदाहरणांवरून वरील धोरणाची प्रचीति येईल. सांस्कृतिक भिन्नता, वांशिक भिन्नता, भिन्न इतिहास परंपरा, समाज रचना, व भाषाभेद: आणि क्वचित् प्रसंगी धार्मिक भेद, यांपैकीं एकहि अगर सर्व मिळून राष्ट्रियत्वाची निश्चित कसोटी होऊं शकत नाहीं, याचें मुख्य कारण युरोप, अमेरिका, अगर आशियांतील या लघुराष्ट्रांची निर्मिति कोण-त्याहि तत्त्वावर अधिष्ठित नाहीं हें होय. राष्ट्रीयत्वाची कल्पना मुळांतच चुकीची व अशास्त्रीय आहे असें मात्र नाहीं पण वर सांगितलेली कसोटी सर्वांशीं नाहीं तर निदान बव्हंशीं तरी ज्या राष्ट्राला लागूं शकत नाहीं तें राष्ट्र निव्वळ कृत्रिम आहे असें सम-जावें. पण राज्यतंत्र आणि भौगोलिक सीमा यांना नुसतें महत्त्व देऊन विपर्यस्त राष्ट्रवादाची विचारसरणी जगांतील गुलाम राष्ट्रांत

निर्माण करण्यास जानपदसंस्कृतीचा मूर्खपणा व वाणिज्यसंस्कृतीचा कुटीलपणा हीं कारणीभूत झालीं आहेत. सर्व दृष्टीनें समान असून एकत्रित रहाण्याची इच्छा असणाऱ्या राष्ट्रांत फितूरीनें तट पाडून स्वयंनिर्णयाच्या नांवाखालीं त्या राष्ट्राचीं शकलें पाडणें व असमान, भिन्न, व विरोधी अशा अनेक जमातींची एका विशिष्ट भौगोलिक सीमेच्या आंत मूस ओतून राष्ट्रीयत्वाचा छाप तयार करण्याचे कृत्रिम उपाय करून खऱ्या राष्ट्रीयत्वाला त्यांना पारखें करणें ही सत्ताधाऱ्यांची मायावी कला होय. प्राचीन काळच्या इतिहासांतहि राष्ट्रवादाची कांहीं ठळक उदाहरणें सांपडतात. पण एक तर राष्ट्रीयत्वाची कल्पना त्या काळीं आजच्या इतकी ठळक नव्हती व दुसरें हें कीं भिन्न वांशिक, सांस्कृतिक, भौगोलिक अथवा निव्वळ भाषाभेदानें परस्परांपासून विभागले गेलेल्या अनेक जमातींच्या एकीकरणाचें कार्य, धर्म अथवा साम्राज्य विस्तार यांच्या सहाय्यानें फार सुलभतेनें घडत असल्यामुळें लहान गट मोठ्या गटांत मिसळून जाण्याची क्रिया व्यापक प्रमाणांवर साऱ्या जगांत चालू राहत असे. निरनिराळ्या भूभागांतून, निसर्गाच्या चित्रविचित्र रानांवनांतून निरनिराळ्या प्रकारचीं गुणरुप रसगंधादि वैशिष्ठ्यें आपणांबरोबर घेऊन वहात येणाऱ्या शेंकडों सरिता महासागरांत दशदिशांनीं येऊन मिळाल्या म्हणजे आपले सर्व भेदाभेद विसरून सागराच्या गुणधर्माशीं एकरूप होतात त्या प्रमाणेंच प्राचीनकाळीं या भारताच्या संस्कृतिसागरांत जगांतील निरनिराळ्या देशांतील मानववंशरूपी प्रवाह प्रचंड वेगानें मोठमोठ्यानें गर्जना करीत व आपल्या मुखाजवळील सागराच्या पाण्याला आपल्या धक्क्यासरशीं अनेक योजने मागें लोटीत येऊन पडले. पण असली सहस्त्रावधि आंदोलनें व टकरा क्षणिक खळबळी नंतर शांतवून पचवून पुन्हां आपल्या स्तब्ध वातावरणांत तो महासागर

शांत आणि निश्चल राहिला. इराणी, ग्रीक व चिनी या राष्ट्रांनींहि साम्राज्यविस्तार आणि संस्कृति प्रसार यांच्या सहाय्यानें अनेक लहान लहान राष्ट्रांना आत्मसात् करून घेतलें. या सारखींच शेंकडो उदाहरणें मध्ययुगापर्यंतच्या इतिहासांत दाखवून देतां येतील. परंतु अर्वाचीन युगांतील जीवनकलहाची तीव्रता राजकीय जागृती व भौतिक सामर्थ्यांची हांव या गोष्टींनीं भेदाभेद मिटवून सात्मीकरणाचा मार्ग सुलभ करण्या ऐवजीं भेदाभेद अधिकाधिक स्पष्ट व उठावदार केले व चढाओढीचें युग आरंभून राष्ट्रवादाची अभेद्य तटबंदी जिकडेतिकडे उभारून सवत्या सुभ्याच्या कल्पनेचा विस्तार केला. ही सात्मीकरणाची क्रिया नसती तर इंग्लंडमध्यें कमींतकमी चारपांच राष्ट्रांच्या स्वयंनिर्णयानें तितके सवतेसुभे निर्माण होऊन इंग्लिश राष्ट्र कधींच जन्माला आलें नसतें **अँग्लीज, सॅक्सन, वेल्स, स्कॉच, नॉर्मन्स्, डेन्स, जर्मन**, इत्यादि अनेक जातींच्या मिश्रणापासून आजचें इंग्लिश राष्ट्र बनलें. पण हाच सात्मीकरणाचा प्रभाव आयर्लंडच्या धार्मिक व वांशिक भेदरूपी खडकावर आपटून परतला व सातशेंवर्षांच्या दीर्घप्रयत्नानंतरहि आयरिशराष्ट्र इंग्लिशजातीशीं एकरुप होऊं शकलें नाहीं. याला सर्वस्वी कारण सात्मीकरणाची जुनी क्रिया, परंपरा टाकावू ठरली, नव्या क्रियेंत कुत्रिमता आणि अत्याच्यार यांचीं बीजें असल्यामुळें ती यशस्वी होऊं शकली नाहीं. आज सातशें वर्षांनंतरहि काळाच्या खोल दडपणाखालीं दबलेली आयरिश संकृति पुन्हां डोकें वर काढीत आहे. जुन्या आयरिश भाषेचें पुनरुज्जीवन करून स्वत: आयरिश लोकांनीं आत्मसात् केलेल्या इंग्रजी भाषेची हकालपट्टी करण्याचा प्रयत्न जोमानें सुरू आहे. या विभक्तीकरणाचें खरें मूळ जर कोठें असेल तर वंशभेदापेक्षां इंग्लंड व आयर्लंड यांतील धर्मभेद व वर्चस्व गाजविण्याची इंग्लंडची

इच्छा यांतच आहे: याच्या उलट अल्स्टरची आयरिश प्रजा इंग्रजांच्या मिश्ररक्तापासून बहंशीं बनलेली असून धर्मानें इंग्लंडशीं एकरूप असल्यामुळें स्वातंत्र्या करितां आयर्लंडशीं एकरूप होण्याऐवजीं पारतंत्र्य पत्करुनहि इंग्लंडशीं नातें कायम ठेवणें जास्त पसंत करते. अल्स्टरच्या बेडपट माथेफिरू आणि देशद्रोही फितूरीला इंग्लंडनें सदैव उत्तेजन दिलें व आयरिश स्वतंत्र राष्ट्राच्या काळजांत सदैव रुतणारा हा कांटा पक्का करून ठेवला व या कुटिल राजनीतीला स्वयंनिर्णयाच्या नांवानें संबोधलें. अर्वाचीन इतिहासांतील या एकाच उदाहरणानें विपर्यस्त राष्ट्रवादाचा फोलपणा व स्वयंनिर्णयाची कुटीलनीति या दोहोंची स्पष्टपणें कल्पना येऊं शकते. कृत्रिम उपायानें आपल्या राजकीय सामर्थ्याच्या जोरावर इंग्लंड व आयर्लंड यांचे एकराष्ट्र बनविण्याचा प्रयत्न हा विपर्यस्त राष्ट्रवादाचा नमुना व सर्वतोपरी एकराष्ट्र असलेल्या आयर्लंडमध्यें फूट पाडून तेथील अल्पसंख्यांकांना आपल्या राष्ट्रापासून फुटून अलग निघण्याचा हक्क देणें ही स्वयंनिर्णयाची कपटी राजनीति. साम्राज्याच्या स्थैर्याकरितां एकीकडे कृतिमराष्ट्रें बनविण्याचा प्रयत्न व दुसरीकडे स्वभावत:च एकराष्ट्रियत्वाची शक्यता असतांना तेथें स्वयंनिर्णयरूपी दुहीचें बंड माजवून परिणामीं आपलें वर्चस्व कायम ठेवणें हें वाणिज्यराष्ट्रां-च्या मुत्सद्दीगिरीचे डाव होत. समानसंस्कृति, समान सुखदु:खांची इतिहासपरंपरा, एकराष्ट्रियत्वाची जाणीव, सामाजिक एकरूपता, समानधर्म अथवा निदान धार्मिक विरोधाचा अभाव, एकभाषा अथवा संलग्न भाषा भगनीच्या संसारांतील एकतानता, समान राजकीय ध्येय इत्यादि गुणांनींयुक्त असलेली जाति खरोखर एकराष्ट्र या संज्ञेस पात्र आहे. कुटुंबाचा विस्तार झाल्याबरोबर, गोत्राचे अलग-अलग कुटुंबांत भाग पडून प्रत्येकास सुलभतेनें आपापला जीवनक्रम

चालवितां येतो, त्याच प्रमाणें मानव जातीचें असे एक राष्ट्ररूपी स्वाभाविक गट पडण्यांत मानव जातीचें कांहीच नुकसान नाही उलट संघटित रूपानें कार्य करण्याची शक्ति वाढून भिन्न भिन्न मार्गानें मनुष्य जातीला आपली उन्नति करून घेतां येते. पण स्वाभाविक परिस्थिति दुर्लक्षून या विभक्ति-करणांत कृत्रिम आणली कीं जोड लावून चालू केलेल्या यंत्राप्रमाणें कोठेंतरी खटका उडून शक्तिक्षय झालाच म्हणून समजा. निसर्गनियमानुसार स्वाभाविक-रीतीनें केलेलें कार्य नदीच्या प्रवाहाशीं समदिश होऊन चालणाऱ्या नौकेप्रमाणें मोठ्या वेगानें ध्येयसिद्धीचा मार्ग आक्रमूं शकते. त्याच्या उलट परस्पर विरुद्ध दिशांना वाहाणाऱ्या वाऱ्याचा व विरुद्ध बाजूनें येणाऱ्या प्रवाहाच्या फेरचक्रांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें निसर्ग-विरुद्ध अशास्त्रीय, व कृत्रिम धोरणावर अधिष्ठित असलेलें सामुदायिक कार्य कितीहि नेटानें चालविलें व कितीहि दीर्घ-कालपर्यंत सामुदायिक शक्तीचा जोर लावला तरी केव्हांना केव्हां अपयशाच्या खडकावर आदळून त्याचा विनाश झाल्याविना राहात नाहीं. जगांतील किती तरी समाजाची सांघिक शक्ति असल्या अज्ञान-जन्य व चूक कार्य-क्रमाच्या मागें लागून विफल झाली आहे. सत्याचें मार्गदर्शन करणारा योजक अज्ञान तिमिराचा भेद करून आपली तीक्ष्ण दृष्टी कालक्षितीजाच्या पैलतीरापर्यंत पोहोंचाऊन प्रकाशाशीं सन्मुख होत्साता शास्त्र-शुद्ध तत्त्वज्ञान, तर्कशुद्ध विचारसरणी, व अंतीं यश देणारा परिणामकारक कार्यक्रम राष्ट्रासमोर ठेवून त्यांना उन्मार्गगामी करूं शकतो. पण त्याच्या आदेशापासून स्फूर्ति घेण्याकरितां देशांतील लोकांच्या अंगीं पात्रता पाहिजे. त्यांची बुद्धि अविकृत व मानासिक अवस्था अदूषित पाहिजे. पण जानपदसंस्कृतींत मुरलेल्या दास-जनांच्या वांट्याला एवढें भाग्य येणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष हिंदुस्थानचें

उदाहरण घेतल्यास गेल्या शंभर वर्षांपासून आंग्लप्रणीत हिंदु-मुस्लिम मिश्र राष्ट्रियत्वाच्या स्थापनेसाठीं हिंदुस्थानांतील लोक एकसारखें मूर्खपणाचें प्रयत्न करीत आहेत. मलिन झालेल्या राष्ट्रियत्वाच्या भावनेला उजळा देऊन राष्ट्राला नवजीवन देणें हें निराळें, व नवीन राष्ट्र अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न करणें हें निराळें. जवळजवळ सातशें वर्षांपर्यंत हिंदुस्थानचें सत्ताधारी म्हणून राहिल्यावरहि जे हिंदुस्थानच्या राष्ट्रीय जीवनाशीं एकरूप झालें नाहीत किंवा साम्राज्य सत्तेचे अलोट सामर्थ्य हातीं असतांहि ज्यांनी देश संस्कृतीला आत्म-सात् केलें नाहीं ते आजहि आपल्या संकुचित व माथेफिरू हट्टानें दुराग्रही बनून अलग राहाण्याचा प्रयत्न करीत असतां जबरदस्तीनें त्यांच्या गळां पडून आज आत्म बलीदानाचें व कदाचित् उद्याच्या आत्म–विलीनतेच्या तयारीनें संमिश्र हिंदु–मुस्लिम भारतीय एक राष्ट्रीयत्वाची अशक्य कोटींतील कल्पना मूर्त स्वरूपांत आणण्याचा प्रयत्न करणें हें शुद्ध वेडेपणाचें व गुलामांच्या विकृत मनोवृत्तीचें निदर्शक आहे.

एका विशिष्ट देशांत एकच विशिष्ट राष्ट्र असावें ही कल्पना अगदीं स्तुत्य आहे. पण कल्पकांच्या योजनेनुसारच सृष्टीची रचना असती तर मनुष्याला जगांत करण्यासारखें कांही उरलेंच नसतें. बहु संख्यांकांच्या संस्कृतीपासून भिन्न असलेल्या संस्कृतीचे अल्प संख्यांक गट सर्वच देशांत असतात. पण त्याचा विशेष बाऊ कर-ण्याचें कांही कारण नसतें. बहु संख्यांकांची संस्कृति ही त्या देशाची राष्ट्रीय–संस्कृति राहून देशाची राजकीय उन्नति होण्यास कांहीच प्रत्यवाय नाहीं. देशांतील सर्व संस्कृतिचें एकीकरण झाल्या-शिवाय राष्ट्रियत्व प्रस्थापित होत नाही. ही कल्पना बहुशः परकीय सत्ताधाऱ्यांनी निर्माण केलेली असते. कृत्रिम उपायाने सांस्कृतिक

एकीकरणाचा प्रयत्न करीत अल्पसंख्यांकांना फाजील महत्व देऊन त्यांची हीन संस्कृति आपल्या डोक्यावर लादून घेण्याचा प्रयत्न करणें हें आत्मघातकीपणाचें तर आहेच पण त्यावरून त्या देशांतील बहुजन समाज अजून राजकीय स्वातंत्र्याच्या लढ्याला पात्र झाला नाही याची खात्री पटते. राष्ट्रीय एकीकरणाच्या काल्पनिक ध्येयाला बळी पडून जे सहजासहजी स्वतःचें बलिदान देऊं शकतात ते राजकीय स्वातंत्र्याला लायक नाहींत व देशांतील राज्यकारभाराचीं सूत्रें परिणामीं कधींहि त्यांच्या हातीं येऊं शकणार नाहींत हें निश्चित समजावें. अल्पसंख्यांकांचें संरक्षण ही कोणत्याहि राज्यघटनेंतील आवश्यक अट असली पाहिजे हें जरी खरें असलें तरी त्यावरून सर्वांना समान हक्क देण्याची घातुक आणि वेडगळ कल्पना समर्थनीय ठरूं शकत नाही. राजकीय सत्ता हा भागीदारीचा विषय कधींहि होऊं शकणार नाहीं. समान हक्काच्या तत्त्वाचा अपरिहार्य परिणाम देशाचें राजकीय विघटन हाच होय. नागरिकत्वाचें मूलभूत हक्क व प्राथमिक स्वरूपाचें निव्वळ सामाजिक प्रकारचे आत्मसंरक्षक संघटन करण्याचें स्वातंत्र्य हें देशांतील कोणत्याहि व्यक्तीला अगर गटाला मिळूं शकतें. पण जेव्हां अशा सामाजिक संघटनेचा दुरुपयोग करून देशांतील राजकीय सत्ता बळकावणें, आपल्या हीन संस्कृतीचा प्रसार करून बहुसंख्यांकांची राष्ट्रीय संस्कृति परिणामित करण्याचा प्रयत्न करणें व आर्थिक, धार्मिक नि सांस्कृतिक आक्रमणाचे आपले नीच, स्वार्थी हेतू तडीस नेणें इत्यादि कार्यक्रमांकरितां एक साधन म्हणून त्या संघटनेचा हक्क वापरला जाईल तेव्हां अल्पसंख्यांकांच्या संरक्षणाच्या मर्यादा उच्चतर तत्त्वासाठीं इतर गटांवर बंधन घालणें आवश्यक होतें. पण लोकशाहीच्या सिद्धांताबरोबर त्याचे उपसिद्धांत म्हणून प्रस्थापित झालेल्या अल्पसंख्यांक

संरक्षणाच्या तत्त्वाने, जानपद संस्कृतीच्या प्रभावाने, मनोविकृत व तर्कांध झालेल्या हिंदुस्थानांतील दुर्बल, परप्रत्ययनेय व परधार्जिण्या हिंदू समाजाची बुद्धि दूषित करून पोट नियमानें सिद्धांत खोडून काढावा, फांद्यांनीं झाड खाऊन टाकावें अथवा कुंपणानें शेत खावें त्या प्रमाणेंच लोकशाहीच्या मूळ तत्त्वालाच हरताळ फांसून अल्प संख्यांकाच्या समान हक्काचें स्तोम माजविलें व हें द्रुहि नि फितुरीचें पिशाच्च मित्यापाठीं ब्रम्हराक्षस या न्यायानें विस्कळित हिंदु समाजाच्या दुर्बलतेनें, पौरुषहीनतेनें, व चितविभ्रमानें उत्तेजित होऊन हिंदुस्थानांतील राजकीय चळवळीच्या मानगुटीवर बसलें व त्यानें बुद्धिभेदाचें तिमिर–जाल ध्येयक्षितिजावर पसरवून सर्वत्र अंधार करून टाकला. ‘ बुडत्याचा पाय खोलांत ’ या म्हणीप्रमाणें या अंधारांतून मार्ग काढण्याकरितां झटणारा प्रत्येक तथा कथित पुढारी आपल्या हताश नि पराभूत मनोवृत्तीला बळी पडून देशाला अधिक अधिक चूक मार्गावर नेऊन देशाला विनाशाच्या जवळ व ध्येयापासून दूर खेचीत चालला आहे. मदिरेच्या अमलांत झिंगून अवनतीकडे धांव घेणाऱ्या पामराला मदिरेच्या अपायकारकतेचा उपदेश जास्त रुचत नाहीं, पाप्याला प्रायश्चित्ताचा मार्ग सुचत नाहीं, वरदानानें उन्मत्त व बेहोष झालेल्या पुराणकालीन दैत्यांना भवितव्यतेच्या उदरांत दड-लेल्या भयानक परिणामांची जाणीव पटत नाहीं, अथवा अंध श्रद्धा-वान् असत् धर्माच्या तमोगुणी अनुयायांना तर्कप्रणीत ज्ञानसूर्याच्या प्रकाश दृष्टीनें पहावत नाहीं तद्वतच जानपद संस्कृतीची भुरळ पडलेल्या हिंदु बहुजन समाजाला विकृत तत्त्वावर आधारलेल्या प्रति-गामी, भोंदू, व आत्मघातकी जानपद चळवळीच्या वावटळींतून बाहेर पडावेंसें वाटत नाहीं. टेनिसनच्या कवितेंतील Lotus Eater कमलभुक्ताप्रमाणें मायामोहांध होऊन निष्क्रिय नेभळटपणानें प्राप्त

होणाऱ्या आभासात्मक यशाची माधुरी जिव्हाग्रीं चट लावीत असल्यामुळें त्या मधुबिंदूच्या मागून येणाऱ्या विषाच्या लोटाची कल्पना न येतां तो भराभर पोटांत खांचविला जात आहे. मरणापूर्वीच्या घडपडीला क्रांतीची आंदोलने व अज्ञानानें केलेल्या आत्मनाशाला त्यागाचें भव्य नि उदात्त स्वरूप देऊन आपल्या अवनतींत रममाण होणारी हिंदुजनता जानपद संस्कृतीच्या प्रभावाचें उत्कृष्ट उदाहरण दाखवून देत आहे. रंगदोष असलेल्या डोळसाला डोळे असूनहि सृष्टीचें सत्य स्वरूप कळत नाही त्या प्रमाणें बुद्धीला तमोगुणाचें पिशाच्च झपाटल्यामुळें बहुजन समाजाला सत्याचा मार्ग दिसत नाहीं, दाखविला तरी समजत नाहीं, समजला तरी पटत नाहीं आणि पटला तरी त्या मार्गानें जाण्याची इच्छा होत नाहीं, सामर्थ्य नाहीं, व विधीचा तसा संकेतहि दिसत नाहीं सत्य मार्गाचें दिग्दर्शन करणारे, परित्यक्त, समाज बहिष्कृत, लोकनिंदेला पात्र व बहुजन समाजाची अनास्था व कधीं विरोध यांच्या दडपणाखालीं कार्यनष्ट, हतप्रभ, व गुदमरून गेले आहेत व नवरंगानें नटलेल्या वनदेवतेच्या राज्यांत, शांत नि स्तब्ध वातावरणांत, गर्द झाडांच्या छायेखालीं बसलेल्या गुहेकडे मेंढ्यांच्या कळपांना आपल्या नादीं लावून ओढून नेणारे फितूरी लांडगे देशाचे पुढारी बनून यश, कीर्ति, वैभव इत्यादि पार्थिव सुखसाधनांच्या विपुलतेनें डौलाने मिरवीत आहेत.

स्वयं–निर्णय आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य या अत्यंत परस्पर विरोधी तत्त्वांची सांगड घालून देण्यांत आधुनिक वितंडवाद्याचा एकमेव हेतू हा होय कीं स्वयंनिर्णयच्या तत्त्वाची आग पसरवून वाटेल त्या एकसांधी बहुजनसमाजास विदीर्ण करतां यावें व प्रत्येक देशांत असंख्य अल्पसंख्य गट व त्यांच्या स्वयंनिर्णयावर आधारलेली विस्कळित राज्यघटना उत्पन्न केली ह्मणजे त्या सर्वांवर आंतरराष्ट्रीय नियंत्रण ठेवणे

वाणिज्यप्रधान-साम्राज्य-सत्तेला सोपें जावें व जगाच्या पाठीवर शेंकडों लहान लहान राष्ट्रें उदयाला येऊन त्यांना आपल्या संरक्षणासाठीं सदैव साम्राज्यांचा आश्रय घेणें भाग पडावें. या प्रकारें साम्राज्यसत्तेचा विस्तार वाढत राहून अखिल मानवजात सहास्रावधि भेदाभेदानें युक्त, मतमतांतरानें बुद्धिभेदित, स्वयंनिर्णित गटांनीं विभक्त अशी त्यांच्या छत्राखालीं जमा झाली म्हणजे या वाणिज्य संस्कृतिच्या कवचाखालीं जानपद संस्कृतिचें विघटनात्मक, अवनतिकारक, मनुष्यत्वाला हीनतर व मानवतेला लघुतर करीत मानवजातीच्या अवाढव्य विस्ताराचें कार्य चालू ठेवतां येईल. समानशील अशीं हीं साम्राज्यें मात्र जगाची वांटणी आपसांत करतांना परस्पर कलहानें एकमेकांचा नाश न होईल अशा बेतानें वाटाघाटी करीत असतात. राष्ट्रकल्पनेच्या ज्या हत्यारानें मध्ययुगीन साम्राज्यांचा नाश करून त्यांच्या चितेवर युरोपांतून अनेक राष्ट्रांच्या इमारती उभारल्या त्याच हत्याराची धार अधिक तीव्र नि विषारी करून स्वयंनिर्णयाची ठिणगी पाडून एक शतकापर्यंत सगळ्या जगांत वैभवानें डोलणाऱ्या या इमारती कोसळून त्याचा धुरळा चितेवरील धुराच्या लोटाच्या मागोमाग उडविण्याचें कौशल्य जर कोणी दाखविलें असेल तर तें केवळ वाणिज्यसंस्कृतीनें व तिच्या पुरस्कर्त्या इंग्लंडसारख्या राष्ट्रानेंच. गारुड्याच्या पिशवींतून निघणारा सांप उलटून गारुड्याला दंश करतो अथवा काष्टाच्या उदरांतून निघणारा अग्नि तात्काळ काष्ट भक्षण करून तृप्त होतो त्याप्रमाणेंच मध्ययुगीन साम्राज्याच्या आपसांतील कलहानें राष्ट्रकल्पनेला जन्म दिला, व त्या राष्ट्रकल्पनेनेंच साम्राज्याच्या नाश केला. राष्ट्रांराष्ट्रांतील आपसांतल्या संघर्षानें परस्परांवर वार करण्यासाठीं जे स्वयंनिर्णयाचें हत्यार आपल्या मुत्सद्देगिरींतून बाहेर काढलें त्यानेंच राष्ट्रविनाशाची होळी

पेटविली. आंतरराष्ट्रीय मुत्सद्देगिरीची ही किमिया वाणिज्यसंस्कृतीचें एक वैशिष्ट्य आहे.

वसंत यौवनांत पदार्पण करणाऱ्या सृष्टीच्या निसर्गरम्य उपवनांत शांतशील जलाशयाच्या पृष्ठभागीं शैवलांतून जन्म पावणाऱ्या कमलिनीच्या विकासाला अनुकूल असें वातावरण सूर्याच्या कोमल किरणांनी निस्तब्ध वातावरणाच्या अवकाशांत सहज लीलेनें वहाणाऱ्या वायुलहरींनी व वनस्पतींना जीवन देणाऱ्या चंद्राच्या अमृतधारांनी प्राप्त करून द्यावें व बीजाचा अंकुर, अंकुरापासून लता व लतेच्या मस्तकावर विराजणारी पुष्पवती कलिका व फलवती निसर्ग वधू या श्रेणीनें विकास व्हावा त्याप्रमाणेंच ज्ञानकर्म याच्या सहाय्यानें व्यक्तित्व, व्यक्तिसामर्थ्याला संरक्षक कवचाचा लाभ करून देणारी समाजरचना, समाजविकास करणारी संस्कृति व मानवी जीवनांत आनंद आणि प्रगति यांचे संदेश देणारी संस्कृति व तिचें संवर्धन करणारी राष्ट्रीय घटना, राष्ट्रविकासाला अनुकूल वातावरण प्राप्त करून देणारी आंतरराष्ट्रीय संघटना इत्यादि निर्माण झाल्याशिवाय प्रलयकालीं, महासागराच्या पृष्ठभागीं वडाच्या पानांवर तरंगणाऱ्या अंगुष्ठमात्र जीवरुपी बालकाप्रमाणें निसर्गाच्या भव्य जगतांत पदार्पण केल्या बरोबर असहाय्यपणें रडणाऱ्या मानवाचें व्यक्तित्व वर्धिष्णु व जयिष्णु होत, दीर्घकालीन तपस्येच्या जोरावर विकसित, रुपांतरित व परिणत होऊन अतिमानवतेच्या पदाला पोहोंचणार नाहीं. या सर्व गोष्टी घडून येण्याकरतां पुरुष-श्रेष्ठांच्या प्रत्येक सत्कार्याला विरोध करणाऱ्या जानपद-संस्कृतीशीं अंगींभूत असलेल्या उपरिनिर्दिष्ट अज्ञानजन्य लोकभ्रमाचा प्रथम नाश झाला पाहिजे व जाणूनबुजून केवळ दंभ आणि स्वार्थ यानें प्रेरित होऊन आपल्या चैनीखातर ज्यांनीं या लोकभ्रमाचा पुरस्कार केला त त्याला उत्तेजून आपलें

हुकुमी साधन बनविलें त्या वाणिज्य संस्कृतिप्रधान राष्ट्रांच्या भौतिक सामर्थ्याचा नायनाट झाला पाहिजे म्हणजेच त्या संरक्षक कवचाचा भेद करून त्याच्या आंत हीणकस आणि नासक्या कुजक्या जान-पद संस्कृतीवर प्रहार करतां येईल.

---

# गीर्वाण-संस्कृति

या विश्वाची निर्मिति व रचना कोणत्या हेतुनें व कां झाली व अखिल विश्वाच्या विस्तीर्ण सागरांत केवळ एक जलबिंदुवत् अस-णाऱ्या या मानवप्राण्याचा जीवन-हेतु काय, हे प्रश्न मानवजातीच्या इतिहासांत आदिमानवापासून तों अद्याप पावेतों विद्वान् लोकांच्या चिंतनचर्चेचा विषय होऊन बसले. पण कोणत्याहि तत्त्ववेत्त्याला याचें बराबर उत्तर देतां आलें नाहीं. नास्तिक्य पक्षांच्या मनांत प्रत्यक्ष कर्त्याच्या अस्तित्वाविषयीं संशय असल्यामुळें त्यांच्या दृष्टीनें हेतूचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. आस्तिक्यवाद्यांच्या कर्त्याच्या स्वरूपाविषयींच्या कल्पना इतक्या अनिश्चित नि अमर्याद आहेत कीं हेतूचा निर्णय करण्यांत साहजिकच त्यांच्या भिन्न भिन्न गटांत गोंधळ उत्पन्न होतो. सपाट जमीनीवर सांडलेलें पाणी जसें चौफेर पसरते त्याप्रमाणें हेतू आणि ध्येय यांची निश्चिती नसल्यामुळें प्रगती करतां हपापलेल्या मानवजातीचें शक्तिक्षेपण सर्व बाजूंनीं झालें आहे. कांचेचा आडोसा निर्माण करून त्याच्या बंधनांतून तेजाचें प्रक्षेपण व परावर्तन कराविल्यानें ज्योतीचें तेज वाढतें तसेंच मानवानें आपल्या

उन्नतिकरितां ज्या सांधिक शक्तिला उपयोगिलें तिला विशिष्ट पद्धत, वळण नि दिशा लावल्याशिवाय तिचें कार्य कदापि वाढणार नाहीं. आध्यात्मवादाचा प्रश्न असिद्ध म्हणून बाजूस ठेवला तरी सर्वांस मान्य होईल अशा साध्या तर्कवादानें आपणांस एवढें समजूं शकतें कीं मनुष्यानें जगलें पाहिजे. सुख आणि आनंद याच्या प्राप्तीनें त्याचें जीवन यशस्वी झालें पाहिजे. जीवनाची परंपरा कायम राहिली पाहिजे. मनुष्याच्या जीवनांत व्यत्यय आणणाऱ्या आंतरिक नि बाह्य निसर्गाच्या शक्तींचा निरास झाला पाहिजे. सृष्टीचा भरपूर उपयोग उत्कृष्ट जीवन जगण्यासाठीं आवश्यक असलेल्या सामर्थ्याची प्राप्ती व जेणेंकरून आयुष्याची अंतिम घटना म्हणजे मरण ही कमींतकमी दुःखकारक ठरेल अशी योजना करणें या सर्व गोष्टी व्यक्तीशः प्रत्येक मनुष्याला अगदीं प्राथमिक म्हणून तरी आवश्यक वाटतात. व्यक्तीचें कुटुंब, कुटुंबाचें गोत्र, गोत्राचा समाज बनत चालला, तों तों व्यक्तीच्या परस्पर संघर्षापासून उत्पन्न होणाऱ्या संबंधानें या प्राथमिक भावनांत कांहीं नव्या भावनांची भर घातली. या नव्या भावना बहुतेक तुलनात्मक असतात. उदाहरणार्थ, इतरांपेक्षां चांगले दिसणें, इतरांहून श्रेष्ठ असणें, इतरांवर सत्ता गाजविणें, इतरांसंबंधींच्या सहानुभूतीनें अनुकंपित होऊन त्यांच्या हितासाठीं प्रयत्न करणें, या सर्व भावनांतूनच सर्वसाधारण रीत्या बहुतेक नीतिविषयक कल्पना, मनुष्याच्या उच्चनिचत्वाचें आदर्श आणि मनुष्याच्या व्यक्तिगत अगर सांधिक कृतींचें मोजमाप करण्याचें परिमाण हे निर्माण झाले आहेत. एकदां अमुक गोष्ट चांगली हें निश्चित ठरलें म्हणजे तिच्या प्राप्तीचा प्रयत्न करणें हें क्रमप्राप्तच झालें. आपणांस ज्ञात असलेल्या मानवजातीच्या आजवरच्या इतिहासांत सर्व घडामोडी या ध्येय प्राप्तीसाठीं केलेल्या प्रयत्नाची परंपरा दर्शवितात.

अर्थात् जाणतेपणी व उघडउघड ध्येयाच्या नांवाखालीं झालेले प्रयत्न फार थोडे व बहुतेक इतर प्रयत्न, घटना व चळवळी यांचे पृथक्करण केल्याशिवाय त्यांचें खरें स्वरूप कळत नाहीं. वरकरणी जरी भिन्न भिन्न व विसंगत हेतूंच्या सरमिसळीनें मानवाच्या सामुदायिक कार्याचें स्वरूप अस्ताव्यस्त भासत असलें तरी शास्त्रज्ञाच्या शोधक बुद्धीनें पाहिलें म्हणजे या अव्यवस्थित व ओबडधोबड घटनांच्या मागें एक नित्य, अप्रतिहत व उर्ध्वगामी अशी शक्ति सूत्ररुपानें कार्य करीत आहे असें आढळून येईल. वर निर्देशिलेल्या जीवध्येय पूर्तीच्या दृष्टीनें त्या शक्तीची परिणामकारकता, उपयुक्तता व यशस्वीतता याचें जें मोल आपण ठरवूं त्यावर इतिहासांतील त्या सर्व सामाजिक घटनांची व त्या घटना घडवून आणणाऱ्या लोकसमूहाची उच्च-नीचता अवलंबून राहील. ज्या जीवनपद्धतींत व ज्या प्रकारच्या समाज पद्धतींत सांघिक आणि वैयक्तिक सुख, आनंद, आणि सामर्थ्य यांची प्राप्ती होण्याचा मार्ग सुलभपणें सांपडतो, प्रत्यक्षपणें संघ-सदस्यांचा उत्कर्ष होत राहून यशाचें दृश्यफळ त्यांच्या पदरीं पडतें तीच जीवन पद्धति चांगली असेंच कोणालाहि वाटणार. या जीवन पद्धतीच्या व्यापक स्वरूपाला संस्कृति हें नांव आहे. संस्कृति हें एकाद्या वस्तूचें नांव नसून तें एका प्रणालीचें अथवा पद्धतीचें नांव आहे हें लक्षांत ठेवलें म्हणजे त्या शब्दाच्या व्यापक आणि लवचिक अर्थाची कल्पना येईल. खासगी आचार विचार, आहार विहार, समाजांतील घटकांचें परस्परांशीं संबंध, समाजरचना व संस्था वाङ्मयविचार परंपरा, धर्म, व सामाजिक ध्येयें, कुटुंबव्यवस्था व गृहजीवन पद्धति, समाजांतील घटकांचा विशिष्ट स्वभाव, व आवडी निवडी या सर्व गोष्टींचे समुच्चयरुपी नांव म्हणजे संस्कृति. जगांतील सर्व राष्ट्रांच्या संस्कृतींत शतकानुशतकापासून जी असंख्य प्रकारची

विविधता व वैचित्र्य आढळून येतें त्याला पुष्कळ अंशीं कारण त्या त्या देशांची भौगोलिक परिस्थिति, जगांतील इतर देशांशीं त्या विशिष्ट राष्ट्रांचा संघर्ष झाला त्यांतून निर्माण होणारा त्यांचा इतिहास, वंश वैशिष्ट्य, व त्या जातींत जन्मलेल्या अनेक वीर पुरुषांच्या कार्याचा परिणाम, दळणवळणाच्या साधनांची अतिरिक्त वाढ होऊन जगांतील सर्व देश आज घर-आंगण याप्रमाणें निकटवर्ती झाले असूनहि संस्कृतींचें वैचित्र्य कायम आहे व सांस्कृतिक एकीकरणाचें प्रयत्न होऊन यशस्वी झाल्याचें एकहि उदाहरण ठळकपणें सांपडत नाहीं ही बरीच विचारणीय गोष्ट आहे. सत्याकडे जाणारा मार्ग एकच असतो तेथें विरोधाला अथवा विविधतेला वाव नाहीं, सत्याच्या नियमाला अपवाद चालत नाहींत म्हणून ज्या संस्कृतीनें मनुष्य-जातीचा परमोच्च उत्कर्ष होऊन मनुष्य विकासाला अंतिम ध्येय प्राप्तीचें स्वरूप प्राप्त होईल, व्यक्तीच्या सुखैश्वर्याचें व विकासाचें साधन असलेला समाज आपल्या ध्येय प्राप्तीच्या महाद्वारावर विसर्जन पावेल व मनुष्य आपल्या सामर्थ्यानें अतिमानव या परमोच्च कोटीला जाऊन पोहोंचेल अशी संस्कृति निःसंशय एकच असणार. अशा संस्कृतीचें स्वरूप आपणांस पाहावयाचें आहे. त्या संस्कृतीचें नांव " **गीर्वाण-संस्कृति** ".

मानव जातीच्या प्रगतीचें सर्वांत जास्त श्रेय आधिभौतिक प्रगतीला आहे. भौतिकवाद हा मानवीजीवनाचा पाया आहे. भौतिक-साधनांनींच त्याला आजवर जगतां आलें व कदाचित् यापुढेंहि त्याच्या जीवनाचा एकमेव आधार भौतिक सामर्थ्यच राहील. ज्या विचारपरंपरेच्यायोगे भौतिकसामर्थ्याचें हें महत्व दृष्टिआड होईल, भौतिक सामर्थ्याची वृद्धि आधिभौतिकशास्त्रांची वाढ व जीवनाकडे जडवादाच्या तर्कशुद्ध भूमिकेवरून पाहाण्याची वृत्ति यांना मनुष्य

पारखा होईल व जगाच्या पार्थिवतेला कसपटासमान समजून काल्पनिक ध्येयांच्या मागें धांव घेऊन घसरत जाईल ती विचार परंपरा निःसंशयपणें मनुष्य समाजाला अधोगतीला नेईल हें निश्चित ! विषारी सर्पाच्या मस्तकावरील तेजस्वी मणि त्याच्या विषाची यत्किंचित् बाधा न होऊं देतां सहजलीलेनें काढून घेतां यावा त्या प्रमाणेंच सृष्टीचें आदिकारण असलेलें हें भौतिक सामर्थ्य लीलेनें आपल्या हातीं खेळवितांना त्याच्या सत्परिणामाचा लाभ होऊन दुष्परिणामाची हानि टाळण्याचें कौशल्य मनुष्याच्या अंगीं आलें पाहिजे नाहींतर शिवधनुर्भंगाच्या वेळीं जी अवस्था रावणाची झाली तशीच मानवाची व्हावयाची. भौतिक सामर्थ्याच्या प्रखर तेजानें डोळे दिपून गेल्यामुळें भौतिकवादाची झांपड डोळ्यावर येतें व एकदां या भौतिकवादाला जीवनाचें स्वयंपूर्ण तत्त्वज्ञान मानलें म्हणजे ‘ भूल भुलयां ’ मध्यें अडकलेल्या प्रमाणें जन्मभर फिरत राहूनहि तो त्या चक्राबाहेर पडत नाहीं. कलह आणि नाशयाची बीजें भौतिक वादाच्या आरंभ बिंदूपासूनच त्यांत समाविष्ट आहेत. निव्वळ भौतिकवादाच्या पायांवर आधारलेली इमारत आकाशांत उंच उंच चढत जात असतांच गुरुत्वाकर्षणाच्या मध्यरेषेचें अतिक्रमण करून घराच्या स्थैर्याला सुरक्षिततेच्या मर्यादेबाहेर ढकलित जाते व लौकरच ती सबंध इमारत पायाच्या मुळासकट खालीं कोसळते. हे अनर्थ टाळण्यासाठीं या भौतिकवादी जीवनाला स्वयंपूर्णत्व, निश्चित ध्येय, आणि शाश्वती यांचा भक्कम पाया जेणेंकरून लाभेल व राष्ट्राराष्ट्रांतील आणि समाजांतील घटकावयवांचें संबंध पाणिनीय सूत्राप्रमाणें संस्कृतीच्या सुखद बंधनानें सांधले जाऊन विविधतेला परस्पर पूरकतेची, मृत्यूला क्रांतीची, परिवर्तनाला पुनर्जन्माची, चंचलतेला स्फूर्तीच्या अग्निस्फुल्लिंगाची, सामर्थ्याला संयमाची, बुद्धिला शुचितेची,

पराक्रमाला क्षमतेची, जीवनाला उदात्ततेची, सामाजिक संघटनेला शरीर व्यापाराच्या सौकर्याची जोड मिळून समाजाची संघटना ही व्यक्तिविकासाला पोषक आणि एका व्यक्तिचा व्यक्तिविकास इतरांना उपकारक, व्यक्तीच्या भौतिक सामर्थ्याची परिणति त्याच्या सुख-शांतिमय नि आनंदकारक जीवनांत होऊन आप्तकाम होतांना मृत्यूचें स्वागत करण्याला सज्ज व्हावें या श्रेणीने अखिल मानव-जातीची उन्नति होईल तरच ती जीवनपद्धति, ती समाजरचना, व त्या विचारपरंपरा गीर्वाणसंस्कृतीच्या निदर्शक होऊं शकतील गीर्वाण-संस्कृतीचें सत्यस्वरूप वर्णन करण्याकरतां केवळ ऐतिहासिक पुरावा हाताशीं घेऊन काम भागणार नाहीं तर प्राचीन युगांतील अल्पांशात्मक दाखल्यांना कल्पनेची जोड देऊन Deductiue Logic—( गृहीतागमतर्क--श्रेणीनें-- ) च्या सहाय्यानें मन:चक्षूसमोर आदर्श निर्माण करूनच गीर्वाण—संस्कृतीची यथार्थ कल्पना करतां येईल. अध्यात्मवाद खरा कीं खोटा या वादाचें सरळ उत्तर न देतांहि असें खात्रीनें म्हणतां येईल कीं व्यक्तित्वाच्या विकासाशीं समव्याप्त असलेल्या भौतिक विकासानें मानवीसमाज परिणत होऊन गीर्वाणसंस्कृतीच्या प्रांगणांत उभा असतांच यदाकदाचित् अध्यात्मवाद खरा असेलच तर भौतिक-वादाच्या उंबरठ्यावरूनच अध्यात्मवादाचें महाद्वार त्याच्या हाताशीं लागेल व सदाविकसनशील, संयमी नि शांत अशा त्याच्या जीवन-शक्तीला अज्ञाताच्या अडगळी दूर सारून, मायेची बंधनें तोडून आणि मृत्यु नि जीवन याच्या सीमेवरची निसर्ग मर्यादेची तटबंदी फोडून आध्यात्मिक सामर्थ्याच्या अमर्याद, अनंत व शाश्वत अशा जगतांत सहज पदार्पण करतां येईल व सहस्रावधि वर्षांपूर्वी प्राचीन आर्यांच्या मंत्रद्रष्टया ऋषींना जें अतिमानवाचें जगत् कल्पनेनें प्रतीत

झालें तें मूर्त स्वरूपांत अस्तित्वांत येईल. कृमिकीटकांपासून रूपांतरित होत होत चौऱ्याँशीं लक्ष योनीतून भ्रमण करीत, जंगली मर्कटांशी निकटवर्ती साम्य असलेला अज्ञानी दुर्बल मानव आपल्या पराक्रमाच्या जोरावर युगानुयुगाच्या तपस्येनंतर उत्क्रांतीच्या अंतिम टोकावर जाऊन अधिष्ठित झाला तर हा मानवजातीचा सर्वांत मोठा विजय व कदाचित् हाच मानवीजीवनाचा अंतिम हेतु असेल. कदाचित् विश्वाच्या उभारणीचें अंतिम साध्य हेंच असेल. सारांश अतिमानव निर्माण करणें हें गीर्वाणसंस्कृतीचें ध्येय व ज्या संस्कृतीच्या शीतल छायेंत जन्म घेऊन विकास पावणारा प्रत्येक मानव अतिमानवतेच्या उच्चपदाला सहज पोहोंचूं शकतो अशी गिर्वाणसंस्कृति भूतलावर अवतीर्ण करविणें हेंच जगाचें ध्येय असलें पाहिजे !

गीर्वाणसंस्कृतीचें सत्यस्वरूप स्पष्टकरून दाखविण्याचा प्रयत्न करतांना हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे कीं त्या संस्कृतीचा सर्व तपशील आज सांगतां येणें शक्य नाहीं एवढेंच नव्हे तर त्याचें प्रत्यक्ष व्यावहारिक स्वरूप विशद करून सांगणेंहि अशक्यच आहे. प्राचीन भारतांतील गीर्वाण संस्कृतीच्या उषा दर्शनाचीं स्मृतिचिन्हें घेऊन त्यांना कल्पनाशक्तीच्या संजीवनीने जिवंत करून त्याचीं शब्दचित्रें रेखाटणें याच एका मार्गानें आपणांस आपल्या ध्येयरूपी गीर्वाणसंस्कृतीचें जेवढें ज्ञान होईल तेवढेंच ! मानवबीजाच्या स्वरूपा-पासून गीर्वाणसंस्कृतीच्या क्रांतिकारक संस्कारांना आरंभ होतो. अतिरिक्त शक्तीचें केंद्र असलेला बीजगर्भअणु, बीजवृद्धि त्याचा परिपोष व प्रकर्षानें परिणति इत्यादि श्रेणींनीं विकसित होऊन जीव रूपांत प्रकट व्हावयाचा. अत्यंत तेजस्वी, सौंदर्यसंपन्न, सामर्थ्यवान, व सप्रमाण आरोग्यसंपन्न शरीर दीर्घकालपर्यंत जगांतील वाटेल त्या संकटांशीं झगडून निसर्गाच्या कसल्याहि उत्पाताला पचवून व

कालाच्या अप्रतिहत विषारी व कांटेरी संघर्षानें प्राप्त होणारी झीज सोसून, चिकाटीनें जगणारी जीवनशक्ति, आधिभौतिक शास्त्रांचा आत्यंतिक विकास करून विश्वाच्या अणुरेणुचें पृथक्करण करून सूक्ष्म दृष्टीनें रेणुगर्भात संचार करणारी व विशाल व्यापक दृष्टीनें विश्वाच्या अथांग विस्ताराचें अवगाहन करून साकल्यानें अनंताचें स्वरूप प्रतीत करून घेणारी अशी दिव्य बुद्धिमत्ता, जगांतील काल आणि अवकाश यांच्या बंधनावर विजय मिळविणारे, जन्ममृत्यूचा त्रिकाला-बाधित क्रम उलटवूं शकणारे, पंचमहाभूताला आपला सेवकगण बनविणारें, बाह्यनिसर्गावर विजय मिळवून प्राप्त झालेलें भौतिक-सामर्थ्य, सत्यं, शिवं, सुंदरम् या उक्तीप्रमाणें परिपूर्ण असलेलें शील व रत्नाला सुवर्णाचें कोंदण मिळावें त्याप्रमाणेंच शोभणारें चारित्र्य मानसिक शक्तीचा विकास करून धारणा व संयम यांच्या जोरावर आपलें मन बुद्धि व शरीर हे तिन्ही ताब्यांत ठेवून आयुष्यांतील सर्व कर्मांचें नियंत्रण करणारें आत्मिक सामर्थ्य, या सर्वांनीं युक्त असलेला अतिमानव गीर्वाणसंस्कृतीच्या आश्रयानेंच अवतीर्ण होत असतो. बाह्य निसर्ग आणि आंतरिक निसर्ग हीं दोन्हीं ज्यांनीं जिंकून घेतलीं त्याच्या सामर्थ्याला मर्यादा कोण घालणार? अनंताला गवसणी घालण्याइतकें व्यापक व विशाल ज्ञान होऊन विश्वाच्या सत्यस्वरूपाशीं सन्मुख झालेला मानव तरलभावनांच्या बाबतींतहि मागें राहाणें शक्य नाहीं. प्रकाशाबरोबर सौंदर्य नि सौंदर्याबरोबर कल्याणकारकता यांनीं युक्त असलेल्या सूर्यप्रकाशाप्रमाणें अति-मानवाच्या ज्ञानाला तपस्येची जोड असूनहि वेदाभ्यास जडपुराण-मुनींप्रमाणें विद्येनें येणारी रुक्षता, क्लिष्टता व तपस्येमुळें येणारी निष्क्रिय, निरस, भावनाहीनता ही येत नसून स्वसंवेद्य व अतिसं-वेदनशील अशी भावना प्रधानता ऋजुता, सौहार्द व अंतःकरणांतील

आर्तता हीं प्राप्त होतात व सामर्थ्यसंपन्न अतिमानवाला सर्वांगसुंदरतेचें स्वरूप येतें. सद्गुणाला कर्तव्य-निष्ठेची जोड असल्यामुळें आणि उत्पादकता व कार्य-प्राविण्य ही सामर्थ्याशीं अंगीभूत असल्यामुळें जीवनभर अखंड कर्मयोग्याप्रमाणें कार्य करीत राहाणें अतिमानवाला सुलभ होतें. दया आणि न्याय, बुद्धि, प्रेम आणि कर्तव्य, क्षमा आणि दंड, अहिंसा आणि त्याग या सर्व द्वंद्वावर विजय मिळवून भेदातीत आणि कालातीत झालेलें त्याचें व्यक्तित्व उत्तुंग गिरीशिखरावर प्रभातसमयाच्या आगामी तेजानें विलसणाऱ्या **शुक्राच्या-ताऱ्याप्रमाणें** मानवजातीच्या यशाची पताका रोवून जगाला अंतिम कल्याणाचा संदेश देत असते. परमेश्वराचें अस्तित्व, त्याचें स्वरुप व त्याचे अधिकार या विषयीं जगांतील तत्त्ववेत्ते खुशाल काथ्याकुट करोत, या विश्वाचें धनीपद अशा अतिमानवाकडेच आहे हें निःसंशय. अशा मानवाच्या समाजाची रचना व घटना कशी राहील? त्यांची कुटुंब व्यवस्था कशी असेल? स्त्रीपुरुषांचें संबंध कसे राहातील? आहार विहार, आचार विचार व संस्कार इत्यादि तत्कालीन स्वरूप काय असेल? सांगतां येणें कठिण आहे. आपल्या सूक्ष्म दृष्टीनें अज्ञाताचा भेद करून कालाच्या उदरांत खोल दडलेल्या भूतकालाचें सारें रहस्य जाणतां येईल पण वाटेल त्या ज्ञानानेंसुद्धां भविष्यकाळाच्या क्षितिजाकडे काय आहे याची जाणीव करून घेतां येणार नाही. प्राचीन भारतीय आर्य संस्कृतीच्या विशाल राजमंदिरांचा विध्वंस होऊन त्याच्या जीर्ण व ओसाड भग्न परिकरांत जे स्मृतिरूप अवशेष विखुरलेले असतील त्यांना एकत्रित गोळा करून एखाद्या खऱ्या इतिहास--संशोधकाप्रमाणें त्यावर एखादी कल्पनेची इमारत उभारली तर कदाचित् या विषयाचे कांही ज्ञान होण्याचा संभव आहे. पण तें ज्ञान पुष्कळ अंशीं आभासात्मकच राहील. इतिहासाला ज्ञान

असलेल्या सर्वांत पुरातन कालीं भारतीय आर्यांची जी जीवन–पद्धति नि समाज संस्कृति होती **तीच** भावी कालांत अवतीर्ण होणाऱ्या गीर्वाण–संस्कृतीचा पाया असेल एवढें मात्र निश्चित सांगतां येतें. प्रत्यक्ष स्वरूपांत गीर्वाण–संस्कृति तत्कालीन आर्यांच्या समाजांत आस्तित्वांत होती किंवा नाही याचें उत्तर देतां येणें कठिण आहे. इतिहास संशोधकांच्या भेदक ज्ञान-दृष्टीला हिणवून मानवी बुद्धीच्या आटोक्याबाहेर कालानें तें इतिवृत्त आपल्या उदरांत दडवून ठेवलें आहे. पण तत्कालीन आर्यांनी प्रस्फुरित केलेलें जतन करून ठेवलेलें, आणि शद्ब रूपानें नित्य करून ठेवलेलें जें ज्ञान आज आपणांस उपलब्ध आहे, त्यावरून आपणांस ही निश्चित कल्पना करतां येते कीं अति मानवतेला जन्म देणाऱ्या गीर्वाण-संस्कृतीचें सम्यग दर्शन त्यांना घडलें होतें एवढेंच नाही तर त्या संस्कृतीच्या सर्व कल्पनांना प्रत्यक्ष त्यांच्याच दैवी प्रतिभेनें जन्म दिला होता. अतिमानवांची निर्मिती स्वतः करून दाखविली एवढेंच नव्हे तर विश्वांत अधिकांत अधिक जे श्रेष्ठ असूं शकतें असें सत् तत्त्व आपल्या मुठींत असतांहि आपल्या उच्च आत्म्याला मानव शरीररूपी सांताच्या मर्यादेंत कोंडून अति मानवतेचें एकापेक्षां एक उच्चतर असे आदर्श निर्माण केले. सृष्टि निर्माण करणारे देव, अवतार घेणारा परमेश्वर व या सर्वांहून श्रेष्ठ असणारे परब्रम्ह वैदिक ऋषींच्या अगाध व्यक्तित्वाच्या ठायीं लीन व विलीन झाल्याचें शुभ वृत्त आपणांस वैदिक वाङ्मयांत सांपडतें. ते काय करूं शकले या बरोबरच जग काय करूं शकेल व काय करावयास हवें हेंहि पण त्यांनी दाखवून दिलें. त्या आदर्शाच्या पुढें जग जाऊं शकेल याची शक्यता नाही. याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं जगाची प्रगति पांच हजार वर्षांपूर्वीच खुंटली असून आतां फक्त जुने धडे गिरविण्याचेंच काम मानव जातीला करावयाचें शिल्लक राहिलें आहे. कारण त्रिकाल

दर्शी ज्योतिषी आपल्या ज्ञानाच्या बळावर भविष्याचा सर्व इतिहास कल्पनेनें जाणून त्याची मांडणी जगासमोर करीत असला तरी भविष्याचा इतिहास त्यामुळें जुना होत नाहीं व माहित असलेल्या मार्गावर अतिक्रमण करणारें जग प्रतिगामी ठरत नाही. शिवाय कांहीं विवक्षित मानवांना एका विशिष्ट कालीं आपल्या तपस्येच्या प्रभावानें प्रगतीचें अत्युच्च शिखर गांठतां आलें व गीर्वाण संस्कृति व अति मानवतेचें प्रत्यग्दर्शन घडलें, म्हणून जगाच्या इतिहासकाराला कालक्रमाची मांडणी करतांना तत्कालीन अखिल मानव जातीला तेंच स्थान देतां येणार नाहीं व प्रगति पथावरील तो टप्पा जगानें ओलांडला असेंहि म्हणतां येणार नाहीं. आधुनिक विकासवादाच्या प्रगतिकारक श्रेणीला यत्किंचितहि बाध न आणतां हजारों वर्षांपूर्वी ज्ञानाचा प्रकाश फेंकून सुप्रकाशित केलेल्या भविष्यकालीन मार्गावर प्रत्येक पाऊल पुढें टाकीत मानव जातीला उन्नतीचें ते टप्पे अजून गांठावयाचे आहेत. भौतिक विकासवादाच्या नियमांना अनुसरूनच आपल्या प्रगतीच्या कमाल मर्यादा गांठण्यापूर्वी पासूनच भौतिकतेला गीर्वाण तत्त्वाची जोड देऊन व अंतर्गत कलहरूपी विनाश बिजांचा जेणेंकरून नाश होईल अशा व्यक्तिविकास नि संयम या उदात्त तत्त्वावर आपल्या उन्नतीचा मार्ग अधिष्ठित करून संकलन मार्गानें आपणांस भौतिकविकासाची उत्कृष्ट परिणति अनुभवण्यास मिळेल. शरीर, मन, बुद्धि व अंत:करणांतील सद्भावना यांच्या आत्यंतिक विकासावर व्यक्ति विकास अधिष्ठित असला पाहिजे. चारित्र्य व शील यांच्या संवर्धनानें मानवतेला सामर्थ्यसंपन्न दानवांच्या स्वरूपाहून भिन्न असे सद्गुणी व सामर्थ्यवान् देवांचें स्वरूप आलें पाहिजे. ज्या विकासाला संयमाची गवसणी नाहीं तो विझतांना थोर होणाऱ्या दिव्याच्या वातीप्रमाणें उत्कर्षाच्या परिसीमेवरच विनाशाच्या वर्तुळांत प्रवेश करतो. सोसाट्याच्या

वाऱ्यानें व समुद्राच्या कल्लोळानें शीघ्रवेग प्राप्त झालेल्या नौकेवरील सूत्रधार भांबावून गेला व त्याच्या हातांतील सुकाणूं सुटलें म्हणजे नौकेच्या शीघ्रवेगाची परिसमाप्ती ध्येयप्राप्तींत न होतां समुद्राच्या तळाशीं अथवा अपयशाच्या खडकावर शतश:विदीर्ण होऊन नाहींसे होण्यांतच होईल. अरणीच्या उदरांत सांठवलेला अग्नि घर्षणाच्या सहाय्यानें जागवून, प्रदीप्त करून, त्याची शक्ति वाढविल्यानें पंच-महाभूतांतील एका महान् भूतशक्तीला जागृत केल्यासारखें होतें. पण अग्नीच्या वाढीच्या बरोबर त्याच्या दुप्पट वेगानें ज्याचें सामर्थ्य वाढलें अशा मानवाच्या हातांत व त्याच्या नियंत्रणाखालीं आलेला अग्नि त्याचा नम्र सेवक होऊन जनहितासाठीं देह झिजवूं लागतो. व याच्या उलट मानवाची शक्ति यत्किंचित् जरी कमी पडली, नियं-त्रणाचें सामर्थ्य अपुरें पडलें कीं आपलें रौद्र स्वरुप प्रकट करून अग्निच्या ज्वाला भडकतात, वणव्याप्रमाणें इतस्तत: पसरून रानें, घरें, व गावेंच्यागांवें जाळीत सुटतात तद्वतच भौतिक सामर्थ्याची व्यवस्था होऊं शकते.

गीर्वाण-संस्कृतीचें दुसरे वैशिष्ठ्य म्हणजे समाजाला दिलेलें गौणत्व विजय प्राप्तीच्या हेतूनें आरंभिलेल्या युद्धांत शस्त्रास्त्रांची योग्यता अपरंपार वाढून शत्रूंचा प्राण घेण्याकरतां सज्ज केलेलें शस्त्र आपल्या प्राणापेक्षां अधिक मोलाचें वाटणें साहजिक आहे. शस्त्रा-स्त्रांच्या बळावरच युद्धाचा निर्णय अवलंबून असल्यामुळें लढणाऱ्या सैनिकापेक्षां, योजना आंखणाऱ्या सेनापतीपेक्षां, फार काय ज्या विशिष्ठ ध्येयानें युद्ध आरंभिलेलें असतें, त्या ध्येयाच्या व युद्धोत्तर कालीन सर्व योजनांचा क्षणमात्र विसर पडून युद्धरत सैनिकांचें मन सर्वस्वीं शस्त्रास्त्रमय होऊन जातें. युद्धाच्या क्षेत्रावर युद्धनीति हेंच नियंत्रणाचें सूत्र, सेनापति हाच शास्ता, उपदेशक, सत्यधर्माचा

प्रेषित व सर्वस्वी पूजनीय अशी देवता. युद्ध हा त्या जगांतला धर्म व विजय हाच तात्पुरता मोक्ष. युद्धाच्या काळांत संपूर्ण युयुत्सु-मानव-समूह या सर्व भावनांशीं इतका समरस होऊन जातो कीं या पलीकडे कांहीं जग आहे, विजयाच्या पुढेंहि आपल्याला जीवन आहे, या युद्धक्षेत्राच्या बाहेर व युद्धकालाच्या पलीकडे अनंतकाल अवकाशाची भवितव्यता, अज्ञाताचें द्वार उघडें करून आपणांस आव्हान करीत आहे याची त्यांना शुद्ध नसते. कदाचित् संग्रामाच्या शेवटपर्यंत ही वृत्ति उपयुक्त राहील पण संग्राम हें मानव-जातीचें अंतिम ध्येय असूं शकत नाहीं. येशू खिस्तानें म्हटल्या-प्रमाणें आत्म्याचा नाश होऊन त्रैलोक्याचें राज्य जरी मिळालें तरी त्याचा काय उपयोग? ज्या हेतूनें संग्रामाची आग डोक्यावर घ्यावी त्या हेतूचा धुमश्चक्रींत नाश झाला तर संग्रामाचा विजय कोणाचा व कशाकरितां? निसर्गाशीं जीवनधारणा नि जीवनविकास या करतां केलेल्या युद्धांत निसर्गावर विजय मिळविणाऱ्या मानवाच्या देहात सूक्ष्मरुपानें वास करणाऱ्या आंतरिक निसर्गानें गुप्तरुपानें अंतर्गत कलहाचा संग्राम सुरू केला व युद्धाच्या विजयावरच जीवन सर्वस्व केंद्रित केलेल्या व विजयोत्तर जीवनाचें सत्व संग्राम कालींच विजयाच्या प्राप्तीस्तव बलिदान करून टाकलेल्या, अज्ञानानें स्वयंपूर्णत्व अनुभवणाऱ्या मानवाला परास्त करून आपला दास बनविलें, तर मरणापूर्वींच पंख फुटून विहार करणाऱ्या मुंगळयांच्या शक्तिविकासा-प्रमाणें मानवजातीचें भवितव्य होईल हें निश्चित. समाजरचना, समाजधारणा, व समाज विकास हीं युयुत्सु मानवजातीचीं शस्त्रास्त्रें युद्धनिति व विजयाची साधनें होत. आपले प्राण रक्षण करणाऱ्या शस्त्राचें मोल स्वतःच्या प्राणापेक्षां अधिक असूं शकत नाहीं तसेंच निसर्ग-मानव युद्धाच्या विजयानंतर मानवाला ज्या ध्येयाची प्राप्तीकरून

घ्यावयाची आहे तें ध्येय दृष्टिआड झाल्यावर ही समाजरूपी शस्त्रास्त्रांची शक्ति आपल्या भौतिक सामर्थ्याच्या प्रवाहांत मानवाला वाहून नेल्याशिवाय राहाणार नाहीं. म्हणून समाज विकासाच्या एका विशिष्ट मर्यादेनंतर समाजाचें साधन अनवश्यक व निरुपयोगी होऊन जाईल. शिस्त, संघटन, व नियंत्रण निर्बंध यांच्या सहाय्यानें कुटुंबाची जोपासना, कुटुंबीयांच्या जीवनाचा परिपोष व त्यांचा सर्वांगीण विकास होण्याच्या सीमेवर कुटुंब घटनेचें नियंत्रण जीवन शक्तीचा विकास होऊन बाहेर पडणाऱ्या शावकांनीं संरक्षक कवचाचा भेद करून तें गळून पडावें तदनुसारच निरुपयोगी होऊन सैल झालें अथवा नाहींसे झालें तर तें सृष्टिक्रमाला धरूनच आहे. व्यापक प्रमाणावर हीच प्रणाली समाजालाही लागू आहे. समाज हें व्यक्ति जीवनाचें कवच आहे. बाह्य निसर्गाच्या युद्धांत मनुष्याला विजयी करून देणारी संघटना, आंतरिक निसर्गावर विजय मिळवून देण्याकरितां आवश्यक परिस्थिति, जीवन कलह आणि समर्थाचें जीवन या जगद्व्यापी निसर्ग नियमांवर नियंत्रण ठेवण्याकरतां केलेली समाजधारणा व अंतिम ध्येयासाठीं मानवी जीवनाचा विकास करून बंधनाच्या पलीकडे यशाच्या मार्गावर व्यक्तिमात्रांना पोहोंचवून देणें एवढेंच समाजाचें कार्य. या पलीकडे त्याची गति नाहीं व त्याचा उपयोगहि नाहीं. शासनरहित समाज ही राज्यघटना विकासाची अंतिम अवस्था आहे, तसेंच समाजरहित मानव हे समाजविकासाचें अंतिम साध्य आहे. एक कुटुंब संघटनेचें कवच फोडून जीवनसंग्रामाच्या मैदानांत स्वतंत्रपणें उभा राहाणारा मनुष्य आंतरिक दुर्बलतेनें पुन्हां आपल्या भोंवती दुसऱ्या कुटुंबाचें आवरण निर्माण करतो व आपल्या संरक्षणाकरितां आपल्या अंगच्या स्त्रावापासून आपल्या भोंवती गुरफटणारें चिवट कवच निर्माण करणारा

किडा जसा त्या घरट्यांतच विलीन होऊन जातो, तसेंच प्रत्येक मनुष्य समाजघटनेच्या बाबतींतहि करीत राहील तर मात्र हें ध्येय साध्य होणार नाहीं. या ध्येयाची सिद्धी हें गिर्वाण संस्कृतीचें वैशिष्ठ्य होय. ज्ञानयुक्त शक्ति, संयमनशील विकास व मृत्यूवर विजय मिळविणारें जीवन असें निर्माण करणें हा गीर्वाणसंस्कृतीचाच अधिकार होय. जगांतील कवि लोकांनीं केलेलें मनोराज्य, भविष्यवाद्यांना पडलेलीं सुखस्वप्नें, विकृत बुद्धीनें केलेल्या अतिरिक्त आत्मचिंतनानें भासमान होणारा मायावी साक्षात्कार असें गिर्वाणसंस्कृतीचें स्वरूप नाहीं तर निर्भेळ भौतिक शास्त्रप्रवीण तर्कवादानें ज्याची सिद्धि करतां येईल, ज्याला ऐतिहासिक आधार आहे, व जगांतील अत्यंत सुधारलेल्या देशांतहि ज्याची आत्यंतिकतेनें प्रत्यहीं गरज भासत आहे व समाजाला प्रगतीच्या मार्गावर सतत ओढीत राहाणाऱ्या तत्त्ववेत्यांना ज्याची आंतरिक ओढ लागली आहे अशी प्रत्यक्ष पार्थिव, अनुभव योग्य व परमकल्याणकारक संस्कृति आहे. आजपर्यंत जगांत निर्माण झालेल्या सर्व वीरश्रेष्ठांच्या कार्यांचें समीक्षण केल्यास त्या कार्यामागें असलेला हेतु हा समान असलेला आढळून येईल. **प्लेटोच्या** काल्पनिक ध्येयवादापासून तों **नीत्शेच्या** अत्यंत अद्भुत-सत्यनिष्ठित व अनंत भविष्यकालचें सूत्र सांगणाऱ्या तेजस्वी तत्त्वज्ञानापर्यंत मानवीबुद्धीनें आपल्या विकासाच्या भिन्नभिन्न श्रेणीनुसार जें तत्त्वज्ञान प्रसृत केलें, त्या सर्वांतून या गीर्वाणसंस्कृतीचें सूरच उमटले आहेत. जगाचा सर्व इतिहास एकाद्या स्थापत्य शास्त्रज्ञानें इमारतीची आंखणी करून ठेवावी त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वींच सुसंगतपणें क्रमवार रेखाटून ठेवला आहे. व जगांत जें जें काय घडतें तें सर्व त्या क्रमानुसारच असल्यामुळें मनुष्यमात्रानें प्रयत्न केले अथवा न केले तरी भविष्यकालांतहि 'नियति' व 'क्रम'

या नुसारच सर्व घटना घडून येणार आहेत, अशी कल्पना करणाऱ्यांच्या दृष्टीनें जगाच्या इतिहासाला वस्तुत: कांहीं किंमतच नाहीं. भौतिक वादाच्या अंतर्गत दोषांमुळें भौतिक सामर्थ्याच्या अपरंपार वाढीबरोबर भौतिकवादी मानव समूहाच्या विनाशाचा काळ अधिकाधिक जवळ येत जाईल असें सांगतांना अनेक गोष्टी गृहीतकृत्य म्हणून मानलेल्या असतात त्या गृहीत परिस्थितींत थोडासाहि बदल झाला अथवा मनुष्याच्या सामूहिक कृत्याचा परिणाम म्हणून कांहीं अनपेक्षित घटना घडून आल्या तर भविष्यकालासंबंधीं कल्पनेनें बांधलेले अंदाज खोटे ठरतात व मूळ तर्क पद्धतींतच दोष असल्याचा आरोप येऊं शकतो. आहे या परिस्थितींत भौतिकवादाचा सारखा विकास होत जाऊन परस्पर कलहानें त्याचा नाश होण्याची पाळी येईल हें जरी खरें असलें तरी अधून मधून डोकें वर काढणाऱ्या अपवादात्मक भिन्न भिन्न शक्तींच्या परिणामामुळें या घटना केव्हां व कोणत्या स्वरुपांत घडून येतील हें सांगतां येणार नाही. तसेंच त्या विनाशांतून पुढें काय निर्माण होईल याचेंहि स्वरूप आज जाणतां येत नाहीं. सांघिक मानस शास्त्राच्या नियमांत एक सूत्रीपणा, नियम बद्धता व निश्चिति, निसर्गशास्त्राच्या मानानें कमीच असणार. तेव्हां नियमानुसार घडून येणाऱ्या सामाजिक घटनापेक्षां अनियमितपणें घडून येणाऱ्या उलाढालींतूनच मानवीसमाजाचा इतिहास उत्क्रांत होत जावा हेंच अधिक साहजिक आहे. याकरितां भविष्यकालांत गीर्वाणसंस्कृतीचें युग आपोआप अवतरणार आहे असे अट्टाहासानें कालनियतिक्रमाचा आधार घेऊन प्रतिपादन करीत स्वस्थ राहण्याऐवजी भविष्यकालीन पुनर्घटनेची योजना आतांपासून सतत दृष्टीसमोर ठेवून कालाच्या फेऱ्यांतून समाजाला सुखरुपपणे पैलतीराला कसें नेतां येईल याचा मार्ग आंखणें हेंच खरें मार्गदर्शन

होय. घिरट्या घेत वर चढणाऱ्या वातनौकेप्रमाणें समाजप्रगतीचें फेरे पूर्ण करीत मानवाला आपल्या उच्च ध्येयाचें शिखर गांठावयाचें आहे हें एकदां नक्की ठरल्यावर ध्येयाची अस्पष्ट व अंधुक कल्पना जरी मनश्चक्षूंसमोर असली तरी कालचक्राच्या प्रत्येक फेऱ्यागणिक अधः-पतनाने प्राप्त होणाऱ्या मूळपदावर येण्याचें संकट हमखास टाळतां येईल. अखिल मानव जातीला विकासाची, सामर्थ्याची व अंतिम सुखशांतीची जी आंतरिक ओढ लागली आहे ती मनुष्यमात्राला सदैव गतिमान करीत राहील, ध्येयाकडे खेंचीत राहील, या सर्व-साधारण नियमानें मनुष्यजातीच्या उन्नतीची खात्री पटून स्वस्थ राहातां येणें शक्य नाहीं. ज्ञानसाधनेच्या बळावर ध्येयाचें सम्यग्-दर्शन जों जों अधिक स्पष्ट व आत्मप्रतीतिपूर्ण होऊं लागेल तों तों मार्गांत येणाऱ्या सर्व विघ्नांना दूर सारण्याचें सामर्थ्य वाढत जाईल, पण अतिश्रमानें येणारी श्रांतता, अज्ञान, वंशपरत्वें असणारे निसर्गदोष मानवीसमाजांत परस्परांत चाललेला सुंदोपसुंदी कलह या योगें दृष्टी-वर पटल येऊन ध्येयावर रोंखलेली नजर क्षणभर चळली तर लगेंच जीवनाचें क्षेत्र संकुचित होऊन दृष्टीसामर्थ्याशीं समप्रमाणांत अस-णाऱ्या क्षितिजाप्रमाणें दिक्कालाच्या बंधनानें जीवनविकासाला मर्यादित स्वरुप प्राप्त होतें व विकासाचीं नि सामर्थ्य इच्छेची सारी शक्ति भोंवऱ्यांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें मानवाला भौतिक-वादाच्या क्षुद्र वावटळींतच भ्रमण करीत लावून मानव-जातीची सामुयिक कार्यशक्ति आपल्या भोंवतीच पिंगा घालूं लागते. सदा बहिर्मुख असलेल्या मानवाला अंतर्मुख बन-विल्याशिवाय गीर्वाण संस्कृतीचें ध्येयदर्शन कठिण आहे. शरीराला विष बाधा झाल्यामुळें कितीहि पौष्टिक द्रव्याचा भडिमार केला तरी तें द्रव्य पोटांत जातां क्षणींच स्वतःचे गुणधर्म सोडून विषाच्या

प्रभावानें स्वत: विषमय होऊन जातात व रोग्याला त्याचा कांहीं उप-
योग होऊं शकत नाहीं, त्या प्रमाणेंच जानपद संस्कृतीनें दूषित
झालेल्या समाजाची नैतिक मूल्यें त्यांचा उद्धार करण्याऐवजीं स्वत:
आपल्या विकृत स्वरूपांत समाजाच्या दुर्गुणाचा विकास करूं लाग-
तात. अज्ञानापेक्षां ज्ञानाचा आभास केव्हांहि भयंकरच ! तद्वत् गीर्वाण
संस्कृतीचें प्रत्यक्ष-ध्येय दर्शन न झालेल्या समाजास आपल्या प्रगतीचें
ध्येय स्थान मृग-जळाप्रमाणें सतत बुद्धिभेद व चित्तविभ्रम निर्माण
करून खऱ्या ध्येयापासून अधिकाधिक दूर नेत जाईल. ही संकट
परंपरा टाळावयाची असल्यास सत्ता, सामर्थ्य व ऐहिक उपभोग या
कडे वळलेली मानवाची दृष्टी अंतर्मुख करून त्याच्या कार्यशक्तीला
देहविकास व आत्मविकास, समाजविकास व व्यक्तिविकास, शक्ति-
विकास व गुणविकास अशा दुहेरी मार्गावर लावलें पाहिजे. मनुष्य
मात्रानें आजवर बाह्य निसर्गावर विजय मिळविण्यासाठीं जे आटोकाट
प्रयत्न केले त्यांत त्याला सर्वांत जास्त सहाय्य करणारी देवता म्हणजे
बुद्धि. या देवतेनें पशु पक्षादिकांहून त्याला श्रेष्ठ करून पंच महाभू-
तांना आपल्या हातांत खेळविण्याचें सामर्थ्य त्याला प्राप्त करून दिलें.
पण ही मानव बुद्धि स्वत:च जेव्हां भौतिक वादाच्या रंगांत रंगून
निघाली तेव्हां सदा बहिर्मुख असलेल्या मनुष्याच्या आंतरिक निस-
र्गानें केलेल्या बंडाचा उपशम करणें तिला अशक्य झालें. भौतिक
शास्त्राची वाढ व सामर्थ्याचा विकास व त्याच्या विरुद्ध बाजूस मानवी
समाजांतील परस्पर कलह, मानवाच्या व्यक्तित्वाचा ऱ्हास व जीव-
नाची अस्थिरता, ध्येयशून्य चढाओढ व ज्याला कधींहि अंत नाहीं
असा लघु मानवाचा वंश विस्तार या दोन्ही घटना जगांत इतक्या
बरोबरीनें घडून आल्या कीं यांच्या अपरिहार्य परस्पर संबंधांतून कार्य
कारण परंपरा सहज सिद्ध होऊं लागली, या इतिहासाच्या साध्या

दाखल्यावरून सुद्धां सहज असें अनुमान काढतां येईल की एकाला कायम ठेवून दुसऱ्याचा नाश करावयाचा असल्यास या दोन्हींपेक्षां प्रबल अशी निराळीच एखादी शक्ति मानवाला प्राप्त झाली पाहिजे. विशिष्ट प्रकारच्या सामर्थ्याचा उपभोग घेत असतां त्या सामर्थ्यापासून होणारे दुष्परिणाम जर टाळवयाचे असतील तर त्या सामर्थ्यांतील अंतर्गत दोष काढून टाकण्याची शक्ति आपल्यांत पाहिजे. पण सर्वस्वी त्या सामर्थ्यावर ज्याचे व्यक्तिमत्व अवलंबून आहे त्याला अशी शक्ति प्राप्त होणें तर्क शास्त्राच्या नियमानुसार तरी शक्य दिसत नाहीं, शिवाय भौतिक सामर्थ्याचे अंगीभूत दोषच या दुष्परिणामाला कारणीभूत आहेत हेंहि नक्की सांगतां येत नाहीं. जठरांतील अन्न पचविणें आणि जठरधारी देहाला जाळून भस्म करणें या दोन्ही क्रिया अग्नीला करतां येत असतां जर जीवन पोषणा ऐवजीं सर्व नाशाचेंच कार्य अग्निकडून घडत असेल तर तो दोष अग्नीचा खास नव्हे तर अग्नीला धारण करण्याचें सामर्थ्य अंगी नसतांना त्याला प्रज्वलित करणाऱ्या दुर्बल मानवाचाच तो दोष आहे. जपतपादि देहदंडानें प्राप्त झालेल्या योगिक सामर्थ्याला स्वतःच्या आटोक्यांत नसलेल्या इच्छेचा सेवक म्हणून राबविणाऱ्या पुराणकालीन तपस्व्या प्रमाणें मनुष्याची अवस्था होऊन ज्या हेतूनें कार्यसिद्धीचें व्राण हातीं घेतलें तो हेतुच विसरून कार्य अथवा यांत स्वयंपूर्णता मानून मायेभोंवती पिंगा घालणाऱ्या तपस्व्याला तुलाधारानें जो आदेश दिला अथवा अगदीं अलीकडच्या काळांत योगराज **चांगदेवाला** संत सम्राट् **श्री ज्ञानेश्वरानें** जो सत्याचा मार्ग दाखविला तसलें मार्गदर्शन करणारी गीर्वाण-संस्कृति मनुष्यांत खरी दैवीशक्ति निर्माण करूं शकते. मानवाला आज सर्वांत जास्त आवश्यकता अशा शक्तीची आहे कीं ज्या योगें त्याच्या व्यक्तित्वाचा

खरा खरा विकास होऊन मानवी समाजाच्या हातीं आलेल्या भौतिक ज्ञानजन्य सामर्थ्याला धारण करणें त्याला सुलभ होईल. ज्या विकृतीमुळें मानवी समाजांत हजारों दुष्ट संकटांची परंपरा उद्भवली आहे ती भौतिकवादानें निर्माण केलेली असो किंवा आंतरिक निसर्गाशीं मूलत: अंगीभूत असलेली असो, तिचा नाश करणें मानवाला ज्या योगें शक्य होईल अशी शक्ति मानवाचा खरा व्यक्तिविकास घडवून आणील. ही शक्ति मानवाला अति-मानव करून त्याला सर्वांगीण उन्नतीच्या मार्गावर लावू शकेल. असा अतिमानव निकटच्या भविष्यकालांत आपणांस निर्माण करतां आला नाहीं तर लघुतर होत चाललेले मानवाचें हें व्यक्तित्व भौतिक सामर्थ्याच्या वाढी बरोबर सतत अध:पतित होत जाऊन शेवटीं विनाशाच्या खोल गर्तेत विलीन पावेल. अखिल जगांतील मानव-समाजाला सुसंघटित शांततापूर्ण व उन्मार्गगामी समाज संस्थेचें स्वरूप देऊन मानवाला उच्चतर भूमिकेवर आणणें व त्या भूमिके-वरून प्रत्येक व्यक्तिमात्राला आपल्या अंतिम जीवन ध्येयाची सिद्धि करून घेण्याची स्फूर्ति, वाव, उत्साह, व यशाचें मार्गदर्शन हीं देण्याचें सामर्थ्य प्राप्त करून देण्यासाठीं अतिमानवांचा समाज अस्तित्वांत आणण्याखेरीज अन्य मार्ग नाहीं. भौतिक सामर्थ्याची बेसुमार चढाओढ, भौतिकतेची धुंदि चढलेल्या मानवाची उपभोग-परायणवृत्ति स्वत:च्याच दुर्बलतेनें साऱ्या जगभर पेटवून दिलेला जीवनकलहाचा अग्नि आणि कलहावर अधिष्ठित असलेली समाज संघटना, वंश विस्तार नि जीवन सातत्य याला साध्य समजून त्यांत गुरफटलेली संस्कृति, दिवसेंदिवस ऱ्हास पावत चाललेलें मान-वाचें व्यक्तित्व यांतून मार्ग काढण्यासाठीं सध्यां अस्तित्वांत असलेली कोणत्याहि मानवी समाजाची संस्कृति उपयोगी पडणार नाहीं कारण

काळ्याकुट्ट अंधारांतून प्रकाश निर्माण होत नसतो तर त्या अंधाराच्या विनाशानेंच प्रकाशाची शक्यता निर्माण होते. देहात्मनिष्ठ असलेला कलह अधोमुख अग्निज्वाले प्रमाणें सदैव भडकत राहून कलहस्थानाची राखरांगोळी केल्याशिवाय राहणार नाहीं तर ह्या कलहाच्या अग्नि-ज्वालांना ऊर्ध्वमुख केल्याबरोबर त्याच्या संथ आणि दिव्य प्रकाशानें व्यक्ति विकासाची चढाओढ सुरू होऊन खऱ्या प्रगतिला मार्ग सुलभ होत जाईल. गीर्वाण संस्कृति भूतलावर अवतीर्ण झाल्यावर मानवाचें स्वरूप काय राहील याचें स्पष्ट चित्र जरी काढून दाखवितां आलें नाहीं तरी तिचा अविष्कार मानवी हितासाठीं किती आवश्यक व तिचें ध्येय दर्शन न झाल्यास जगाची किती भयानक हानि होईल याची कल्पना आपणांस सहज करतां येते. अमावस्येच्या अंधाऱ्या रात्रीं वादळाच्या सोसाट्यांत सांपडून पंचमहाभूतांचे रौद्र स्वरूप पाहून जीविताच्या अस्थिरतेनें बावरलेली नौका मूर्तिमंत काल तिच्या समोर थैमान घालीत असतां पर्वत प्राय उसळणाऱ्या समुद्र लाटावर हेलावत अज्ञाताच्या संदेहावस्थेंत जीवनमरणाच्या सीमेवर उभे राहून काळ्याभोर गडद आस्मानांत लपलेल्या ध्रुवताऱ्याच्या दर्शनासाठीं तळमळत असते व त्या ताऱ्याचें खऱ्या खगोल शास्त्रज्ञाप्रमाणें सम्यग दर्शन न घडतांहि आपल्या कल्पनाशक्तीला ताण देऊन व होका-यंत्राच्या सहाय्यानें ताऱ्याच्या दिशेची व त्याच्या स्वरूपाची अंधुक पुसट कल्पना घेऊन सुकाणूवरील तिचा कर्णधार धीर, गंभीर, निश्चल वृत्तीनें मार्ग काढीत काढीत किनाऱ्याच्या संरक्षणाला नांव आणून पोहोंचवूं शकतो त्या प्रमाणेंच यापुढें बीज रूपानें अतिमानवतेचा अविष्कार ज्यांच्या अंतःकरणांत झाला आहे अशा महात्म्यांच्या सहा-य्यानें व प्राचीन कालच्या त्रिकालदर्शी ज्ञानवंतांच्या पुण्याईनें गीर्वाण

संस्कृतीच्या ध्येय दर्शनाचा मार्ग मानव जातीला आंखतां आला तरी पुष्कळच कार्य होईल.

गर्भाशयांत स्थिर झालेल्या समरूप द्रव्यांत जडत्व, भिन्नत्व विकार योगें अवयवीकरण, वैचित्र्यपूर्ण व विविध अंगोपांगांनीं विकसणारें शरीर-व्यापार-यंत्र, व जडांतून उत्स्फूर्त होणारा चैतन्यांश इत्यादि श्रेणींनीं गर्भाचें जीवांत व जीवाचें सदेह साकार मानव बालकांत रूपांतर होत असतां समतेंतून विषमतेकडे विकास होत आहेसा वाटतो. पण याच विषमतेचा आविष्कार होण्यावर साऱ्या जगाची उन्नति अवलंबून आहे. या विषमतेचा अधिकाधिक विकास करण्यानें मनुष्याच्या शरीर विकासाचें सामर्थ्यसंपन्न व सर्वांग सुंदर स्वरूप अवतीर्ण होऊं शकते. साहजिकच स्थिरत्वांतून गति प्राप्त झाली असतां गतिला अंतिम विश्रांतीचें स्वरूप असलेल्या स्थिरत्वाचें ध्येय नसलें तर ती गतिमानता जड द्रव्याचा गुणधर्म होऊन चक्रनेमिक्रमाच्या फेऱ्यांत अनंतकालपर्यंत भटकत राहील व शक्तिक्षयामुळें प्राप्त होणाऱ्या अधःपतित स्थिरत्वांत तिचा शेवट होईल तद्वतच विषमतेच्या विकासानें आपला समतेचा पाया सोडला किंवा अत्यंतिक विकासानंतर ज्या अवस्थेंत विलीन अथवा एकरूप व्हावयाचें असेल त्या ध्येय स्थानाच्या दिशेपासून पदभ्रष्ट झाला तर तो विषमतेचा विकास विषमतेच्या आंतरिक दोषामुळें सहस्रमुखानें अधःपाताकडे जाईल. मनुष्य देहाची अशीच अवस्था होऊन विकासाचें तारूं मृत्युच्या खडकावर आदळतां क्षणींच त्याचें विघटन होऊन मिळविलेली सारी पुण्याई स्वप्नासारखी नष्ट होते. उत्क्रांति तत्त्वाला अनंतकाल पर्यंत ध्येयहिनतेनें गतिमान होऊन विषमतेच्या विकासावर अधिष्ठित असलेली उत्क्रांति असें स्वरूप दिलें तर त्या उत्क्रांतीला कांहीं अर्थ राहणार नाही. ज्या ठिकाणीं गेल्यावर पुन्हां परत यावें लागत नाहीं असें

शेवटचें ध्येय माहीत असल्याशिवाय सृष्टीचा नियम म्हणून घडून येणाऱ्या उत्क्रांतीसमोर मान वांकवित जाणें हें मनुष्य जातीला निसर्गाचा दास बनविण्यासारखें होय. भिन्न भिन्न परिस्थिति व भिन्न भिन्न कालखंडांत अनेक अवस्थांतरांतून परिणत होत सृष्टीला आजचें हें स्वरूप प्राप्त झालें आहे. तसेंच लक्षावधि योनींतून उत्क्रांत होत होत होत जीवाला मानव देहाचा हा सांगाडा लाभला असतां जीवाच्या भौतिक विकासाचा क्रम थांबून निसर्गाला जें काय परमोच्च निर्माण करतां आलें तें हेंच अशी कल्पना होऊन मनुष्यानें निसर्गाच्या उत्क्रांति तत्त्वाचा तुटलेला धागा आपल्या हातीं घेतला व व्यक्ति-विकास नि समाजविकास या रूळावर मानवी उत्क्रांतीची गाडी आणून उभी केली. निसर्गाच्या विश्वांत अनादिकालापासून चालत आलेल्या उत्क्रांतीला मानवोत्पत्तिपर्यंत येतां क्षणींच एकदम परिवर्तन करावें लागलें व चंद्राच्या हिम प्रदेशापर्यंत पोहोंचून तत्क्षणींच परावर्तित होणारी सूर्याची प्रखरदाहक किरणें आपल्या असह्य तेजाचें स्वरूप बदलून कोमल सुधामृताच्या स्वरूपांत वसुंधरेच्या दुःखार्त अंतःकरणावर सिंचन करूं लागतात त्या प्रमाणें जीवाच्या भौतिक विकासाचा क्रम मानव जन्माक्षणीं गति कुंठून परावर्तित विकासाच्या मंगलकार्यांत या पुढें घडून यावें असा निसर्गानें कौल दिला, याचा अर्थ एवढाच कीं जी उत्क्रांति पायऱ्या पायऱ्यानें क्रमशः वर चढत आहे तिला उच्च गिरीशिखरांवर विराजमान होणाऱ्या मंदिराच्या पायथ्याशीं थांबलेंच पाहिजे. मंदिराच्या शिखरापर्यंत पोहोंचवूं शकत नाहींत. मंदिराचें महाद्वार उघडून गाभाऱ्यांतील ध्येयमूर्तीशीं एकरूप होण्याकरितां ज्याची धडपड असेल त्याला उन्नतीच्या सर्व क्रमांना केवळ साधन म्हणूनच समजावें लागणार नसतां नित्य गतिमानतेच्या अशास्त्रीय सिद्धांतावर आधारलेली अनंत

उत्क्रांति म्हणजे खरी उत्क्रांति नसून उत्क्रांति व अपक्रांति यांच्या फेऱ्याचें चक्र होय हें त्यास अंतीं आढळून येईल. पाण्यांत पडलेल्या टेकडीच्या प्रतिबिंबाकडे पहांत टेकडीच्या पायथ्याशीं व पाण्याच्या कांठाशीं उभा असलेल्या ध्येयकांक्षी तरुणानें टेकडीच्या छायेला टेकडीच समजून तिच्या शिखरावर आरोहण करण्या करितां पुढें सरसावें व जों जों तो आपल्या काल्पनिक गिरीशिखराच्या जवळ जवळ जात जाईल तों तों खऱ्या टेकडी पासून दूरदूर व पाण्यांत खोल खोल त्याचा पाय घसरत जावा त्या प्रमाणेंच सत्याचें ज्ञान नसलेल्या मानवाची अवस्था होईल. आजपर्यंत जगांत होऊन गेलेल्या सर्व महात्म्यांचें कार्य यशस्वी झालें असतें तर जगाचा इतिहास निराळ्याच रीतीनें घडला असता. जानपद-संस्कृतीच्या नाशाकरितां आजवर जेवढे म्हणून प्रयत्न झाले त्या सर्व प्रयत्नांना अपयश येण्याचें कारण बहुतांशीं सांस्कृतिक विकासाच्या ज्या भिन्न भिन्न पायऱ्यांवरून ते प्रयत्न झालें त्या श्रेणीचे गुणदोष व जानपद-संस्कृतीचा प्रभाव हेंच प्रामुख्यानें कारणीभूत आहेत. मागील सर्व अनुभवावरून धडा घेऊन विशुद्ध पायावर आधारलेली नवी योजना आंखल्याशिवाय अपयशाचें संकट निश्चितीनें टाळतां यणार नाहीं.

पुत्र, भ्राता, भर्ता, व पिता या सर्व कौटुंबिक जबाबदाऱ्या सुसंगतीनें पाळून, नागरिक, समाजघटक, मानव व परमेश्वरी सृष्टींतील जीव या सर्व आवस्थांचा सुसंगत विकास, स्त्री आणि पुरुष या दोघांचें आत्यंतिक विकासाचें परस्परपूरक स्वरूप व जीव-विकासाच्या चढाओढीनें निर्माण झालेल्या द्वंद्वाचा व्यामोह नाहींसा करून परस्पर मीलन, एकरूपता, व एकानें दुसऱ्यांत विलीन होऊन परस्परांचा केलेला उद्धार, सामर्थ्य विकासाच्या खवळणाऱ्या सागराला संयमाचें धरण बांधून त्यांत मानवहित पोषक उत्पादक

विद्युत शक्तीचा उद्भव करणें व उत्क्रांतीच्या गतिमानतेला अंतिम विकासाच्या शिखरांवर पूर्ण विश्रांतीचें अढळस्थान प्राप्त करून देणें हे सर्व ज्या संस्कृतींत साध्य होईल तीच खरी गीर्वाण संस्कृति ! पराभवानें हताश बनलेल्या दुर्बल जीवाची कडेलोटानंतर प्राप्त होणारी अवस्था ही खरी शांतता नसून समर्थ आत्म्याच्या सर्व आकांक्षांची सुसंगतपणें पूर्तता झाल्यावर आप्तकाम अवस्थेंत प्राप्त होणारी निर्भेळ शांतता जेथें मिळेल त्या जगताकडे मानव-जातीला नेलें पाहिजे. विकारांचें दमन, अज्ञानानें प्राप्त होणारें अल्प समाधान, शक्तिक्षयामुळें आलेलें लघुत्व, आत्मघातामुळें प्रतीत होणारी त्याग-भावना, व अतिश्रांत झालेल्या दुबळ्या जीवाला ज्याची अंत:करणांतून ओढ लागली असेल अशी शून्यमय विश्रांती ही एकीकडे व हिंस्त्रश्वापदांच्या पाशवी वासनेप्रमाणें ज्याची स्वार्थ मूलक उपभोगपरायणता भडकली असेल, ज्यांचा सामर्थ्य विकास नवनवोन्मेषकारी उत्क्रांतीच्या गतिमानतेचें खरें रहस्य न कळल्या-मुळें अंधतेनें सदागतिमान होऊन अनंत स्पर्धेच्या वावटळींत फिरत आहे त्याच्या ध्येय हीनतेनें व्यक्तीला समाजाचें व समाजाला भौतिकवादाचें साधन बनवून अप्रतिहतपणें विनाशाकडे वहात नेलें अशा मानवी प्रगतीच्या विकृत विचारपरंपरा यास दुसरीकडे दोन्ही बाजूस सारून त्यांतून आपला मार्ग कसा काढावा व जीवनाचें अंतिम ध्येय जाणून त्या ध्रुवताऱ्याच्या अनुरोधानें आपली जीवित नौका संसार सागरांत कशी हांकारावी हे सप्रयोग दाखवून देणारी गीर्वाण संस्कृतीच होय. ज्ञान आणि सामर्थ्य ही दोन्हीं साधनें हातांत घेऊन जगदितिहासाच्या अनुभवाचें अंजन डोळ्यांत घालून आपल्या शुद्ध सदसद्विवेक बुद्धीच्या होकायंत्रानें मानवी ध्येयाच्या ध्रुवाची जो दिशा ओळखील तोच महात्मा या गीर्वाण

संस्कृतीचें याहून अधिक स्पष्ट असें स्वरूप सांगूं शकेल. पण सांगण्यापेक्षां जाणण्यानें व जाणल्यापेक्षां प्रत्यक्ष भूतलावर अवतीर्ण करविण्यानेंच त्याचें खरें खरें मूर्तिमंत स्वरूप मानवी बुद्धीला गोचर होईल.

प्राचीन आर्यांचें तत्वज्ञान, आर्यांचा विजिगीषु सनातनधर्म, मनूची समाजरचना, व **व्यासांनीं** अठरा पुराणांतून जिचा आविष्कार करून दाखविला ती प्रभावी संस्कृति, संस्कृतभाषा आणि त्यांतलें वाङ्मय या सर्वांचें ठायीं गीर्वाण संस्कृतीचें अधिष्ठान होतें हें निस्संशय. या गीर्वाणसंस्कृतीच्या तेजामृताचें प्राशन करून आपल्या अमर कार्यानें प्राचीन आर्यजाति अतिमानवतेच्या पदाला कां पोहों-चली नाहीं हें गूढ इतिहासकाराला उलगडणारें नाहीं. ज्ञाताच्या गुरूकिल्लीनें अज्ञाताचें भांडार उघडणारा सांगूं शकेल. तत्ववेत्ता त्याचें रहस्य सांगूं शकेल. श्रेष्ठज्ञानाला धारण करण्याला लागणारें सामर्थ्य, उच्चमानवाचें जीवन जगण्याकरतां लागणारी शक्ति, अध्यात्म-वादाचें शिखर गांठण्याकरतां आवश्यक असणारा भौतिक विका-साचा भक्कम पाया व निसर्गाचें भयानक आक्रमण व साऱ्या जगांतील जानपद-संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांनीं आपल्या जहाल विरोधानें उठविलेला कहर याला पचनीं पाडून - नव्हे त्यावर विजय मिळवून जगांत सत्ताधारी म्हणून जगण्यासाठीं आवश्यक असणारी जीव-नाची चिकाटी व भौतिक सामर्थ्याचें अभेद्य कवच या सर्वांचा कालक्रमानुसार होत चाललेला लोप संजीवनी विद्येच्या अभावीं त्यांना सांवरून धरतां आला नाहीं. उदात्ततेला कणखरतेची जोड राहिली नाहीं, कधीं रास्त आक्रमण करून, कधीं पोटांत शिरून, कधीं चौफेर फितुरीची गर्दी उसळवून, शक्तीनें, मायेनें व कधीं कधीं आपल्या विषारी आत्मसमर्पणानें गळीं पडून दुसऱ्याला विषबाधा करणाऱ्या

विषकन्ये प्रमाणें जानपद संस्कृतीनें उठाव करून उदयोन्मुख गीर्वाण-संस्कृतीचा बाल्यावस्थेंत गळा दाबून प्राण घेतला. अनेक शतकानंतर **ॲरिस्टॉटलच्या** बीजमंत्रानें उपदेशित होऊन व युरोपियन पुनरुज्जी-वनाच्या तेजानें सबळ होऊन भौतिक सामर्थ्यावर अधिष्ठित झालेली पाश्चिमात्य संस्कृति शक्तीची उपासना करीत जन्माला आली व उत्त-रोत्तर वर्धमान होत जाऊन तिनें आपल्या भौतिक सामर्थ्याच्या व शास्त्र प्रभावाच्या जोरावर सारें जग पादाक्रांत केलें. मूलत: तिच्या अंगी हजारों दुर्गुण आणि अंतिम विनाशाचीं बीजें दिसत असलीं तरी मायेच्या या लौकिकी जगांत जीवन जगण्याकरतां आवश्यक अस-लेली संजीवनी मात्र तिच्यांत आहे. त्या विद्येला हस्तगत करण्या-करतां आपल्या **कचाला** दैत्यांच्या **शुक्राचार्यांकडे** पाठविलें पाहिजे. भारतांतील कृमिकीटकरूपी कोट्यवधि अध:पतित मानवांच्या—क्षुद्र दासजनांचा उद्धार करण्यासाठीं अहर्निश झटणाऱ्या देवदूतांनीं आपल्या **बृहस्पतिपुत्रकचाला** दैत्यांच्या राज्यांत पाठविलेंच पाहिजे. दैत्यांची संजीवनी विद्या प्राप्त झाल्याखेरीज जगाचा उद्धार होणार नाहीं, देवांची संस्कृति पुन्हां एकवार मूर्तिमंत प्रगटणार नाही एवढेंच नव्हे तर देवांची अमरपुरी युगानुयुगाकरितां दैत्यांच्या राक्षसी महत्वा-कांक्षेखाली चिरडली जाऊन **इंद्राचें** सिंहासन दुष्टांच्या पायाखालीं तुडविलें जाईल व हजारों वर्षेपर्यंत **शचिदेवीच्या** विटंबनेचा कलंक गत-कालीन यशाला मलिन करीत राहील. कुल पूर्वजांची पुण्याई, तपोधन ऋषींचा पवित्र ठेवा व स्वर्गांतील देवांचें सत्वरक्षण करणें अस-ल्यास घोर मृत्युच्या आणि विनाशाच्या भयानक संकटांपासून वांच-विणारी संजीवनी प्राप्त झालीच पाहिजे. मात्र संजीवनी विद्येचें हरण करण्याकरितां गेलेल्या कचानें **देवयानीचें** मोहपाश दूर सारले पाहि-जेत नसता देवयानी व संजीवनी दोघांना जन्म देणाऱ्या शुक्राचार्यांची

कुटिलनीति कचाच्या कर्तव्यनिष्ठेवर मात करून देवयानीच्या स्त्रीत्वांत कचाचा आत्मा विलीन होऊन जाईल. शुक्राचार्यांचें उदर विदारण करून कचदेव त्याच्या अंतःकरणांत खोल दडविलेली संजीवनी हरण करून देवांच्या राज्यांत आणील तेव्हांच देवांचा विजय होऊन भारतांतील तमोसागरांत गटांगळ्या खाणारे क्षुद्र पामर मानवतेच्या पदाला प्राप्त होऊन देवांचें नियोजित कार्य पार पाडण्यास समर्थ होतील. व गीर्वाणसंस्कृतीच्या अवतीर्णतेची महान कामगिरी पूर्ण करण्याची पात्रता त्यांच्या अंगीं येईल. इतिहासाच्या नियतिक्रमानुसार शाक्त संस्कृतीच्या संक्रमणावस्थेंतून उत्क्रांत होऊन बाहेर पडल्यानंतरीज जानपद-संस्कृतींत खितपत पडलेल्या भारतीयांना गीर्वाणसंस्कृतीचें ध्येयदर्शन कधींच पडणार नाहीं हें मात्र खास.

---

# शाक्त-संस्कृति

अरण्यांतील निर्जीव वृक्षांच्या घर्षणानें जन्म पावणाऱ्या ठिणग्या एका क्षणांत अरण्यांत वणवा पेटवून देऊं शकतात त्याप्रमाणेंच जडहीन जानपद-संस्कृतीच्या परस्पर संघर्षांत वाणिज्य-संस्कृतीच्या सर्व भक्षक प्रहाराची भर पडली कीं एकाद्या विशिष्ट समाजांत अनेक युगांच्या मानवी प्रयत्नानें सांठविलेली सुप्त शक्ति जागृत होते व समाज सुसंघटित होऊन जीवनमरणाच्या ईर्षेनें आंतरराष्ट्रीय राजकीय जीवनकलहाचा लढा लढूं लागतो. निसर्गतःच त्यांच्या अंगीं असलेली जीवन चिकाटी, उज्वल गतेतिहासाचा पाठिंबा, जोपासनीय नि वर्धनीय अशा समाज हितकारी व तेजस्वी संस्कृतीचा अमोलिक ठेवा, सामर्थ्याकांक्षा व त्या आकांक्षापूर्तिप्रीत्यर्थ आवश्यक असणाऱ्या संघटना, शिस्त, त्याग, कर्तव्यनिष्ठा नि पराक्रम इत्यादि गुणांची

संपत्ति यांच्या सहाय्यानें या लढ्याला लौकरच अतिभव्य व उदात्त अशी तात्विक भूमिका प्राप्त होते. जगण्यासारखें ज्यांच्या जवळ आहे त्यांनीं वाटेल त्या उपायानें जगलेंच पाहिजे, प्रसंगीं जीवनाला अपात्र ठरलेल्या इतर मानव-समूहांच्या जीवनाचा संकोच करून व रक्तपाताचें वाटेल तें मोल देऊन जगण्यासाठीं आवश्यक असणाऱ्या सामर्थ्य प्राप्तीचा व त्याच सहाय्यानें जीवनविकास करण्याचा नैसर्गिक हक्क त्या जातीला आहे अशा तत्त्वाचा पाठिंबा घेऊन सामुहिक रूपानें ही जगण्याची मोहीम अप्रतिहतपणें चालविली जाते. मनुष्य मात्रांत निसर्गत: ज्या इच्छा आकांक्षा निसर्गानें उत्पन्न करून ठेविल्या व ज्यांचें प्रत्यक्ष स्वरूप व्यापक प्रमाणावर मानवी सृष्टींत चालू असलेलें जीवनकलह नि यशस्वितांचें जीवन या दोन सूत्रांवर आधारभूत असलेल्या व्यापक संग्रामांत दृष्टोत्पत्तीस येतें, त्या मूत इच्छांचा व्यक्तिगत अविष्कार हा सांस्कृतिक दृष्ट्या मनुष्यजातीला क्षुद्रतेकडे नेणारा आहे. या निसर्गभावनांना उदात्त तत्त्वज्ञानाची भूमिका प्राप्त होऊन त्यांना अंतर्मुख व बहिर्मुख करणें व त्यांचा विकास करणें हें अनेक युगांपासून मनुष्यजातीचें ध्येय राहिलें आहे. जानपद संस्कृतीच्या विस्तारकाळीं व वाणिज्य-संस्कृतीच्या वैभवकाळांतून मानवी समाजाचें अवस्थांतर होत असतां मनुष्याच्या नैसर्गिक शक्तींचा आत्यंतिक विकास एका विशिष्ट समाजसंघटनेच्या सहाय्यानें घडवून आणण्यासाठीं एका जातीनें बद्धपरिकर होणें ही एक साहजिक घटना आहे. जानपद-संस्कृतीच्या सर्वदोषांपासून अलिप्त होऊन व्यक्तीला व समाजाला सामर्थ्याकडे नेऊं पाहणारी संस्कृति अशा परिस्थितींत अस्तित्वांत येणें अपरिहार्य आहे. आत्मनिष्ठ-व्यक्तिजीवनांत विकृत मनोभावनेनें निर्माण होणारे दोष आणि सुसंघटित समाजनिष्ठ जीवनपद्धतींत व्यक्तिजीवनाचा होणारा संकोच

व व्यक्तित्वाचा नाश ही दोन्हीं संकट-परंपरा टाळून व्यक्ति व समाजाच्या परस्परपूरक संगतीवर आधारलेली, एकसूत्रीपणा, कडक शिस्त, भक्कम संघटना, सामुदायिक जीवनाचें कौशल्य, व समर्थ व्यक्तींच्या समर्थ समाजाची अति सामर्थ्याकरितां चाललेली धडपड एवंगुणविशिष्ट स्वरूपानें तेजस्वी बनलेली संस्कृति प्रस्थापित करणें हें समाजांतील थोर पुरुषांचें ध्येय बनतें. शक्तीची उपासना व त्या शक्तीला धारण करण्याची पात्रता अंगीं बानविण्याच्या दृष्टीनें केलेला व्यक्तिविकास व व्यक्तिजीवनाचें समाजीकरण या स्वरूपांत ही संस्कृति प्रगटूं लागते. शुद्धभौतिकतेच्या पायावर आधारलेली पण भौतिकतेच्या अंतर्गत दोषांपासून अलिप्त, निसर्गावर विजय मिळवून निसर्गाला मानवीजीवनाचें दास्य करावयास लावणारी पण आंतरिक निसर्गाला वळण लावून व्यक्तीच्या जीवन विकासाशीं तिची संगती जोडणारी, पराक्रमी जीवन, उत्तम जीवन, ध्येयनीष्ट जीवन व सामर्थ्य उपासक व्यक्तीचें सामर्थ्यधारी सामाजिक जीवन या प्रणालीनें कार्यरत होणारी संस्कृति, आंतरराष्ट्रीय जीवन कलहाच्या क्षेत्रांत महत्तम शक्तीनें विजय मिळविण्याची स्पर्धा करीत असते. जें भौतिक सामर्थ्य मानवजातीच्या हातीं असूनहि मनुष्याला त्यावर विजय मिळवितां आला नाहीं त्याला समाज संघटनेच्या आटोक्यांत आणून व्यक्तीला त्यावर प्रभुत्व मिळवून देण्याचें कार्य ही संस्कृति करूं शकते. समाजांत चाललेल्या अंतर्गत जीवन कलहाला जरी नष्ट करतां आलें नाहीं तरी आंतरराष्ट्रीय जीवनकलहाच्या स्पर्धेनें व विधायक कार्यक्रमाच्या परिणामकारक वळणानें समाजाला बहिर्मुख करून स्वासर्गा जीवनकलहाची तीव्रता जवळजवळ नाहींशीं करतां येते व जें व्यक्तिसामर्थ्य भौतिक जीवन जगण्यासाठीं अविश्रांत धडपड करून खर्ची पडत असते त्याला संपूर्ण समाज जगाविण्याच्या सामु-

दायिक प्रयत्नांत गुंतविल्यानें उत्पादक शक्तीची निर्मिति होते. समाजांतील सर्व घटकावयवांची उन्नति करीत राहून त्यांतून उत्पन्न होणारें सर्वांचे सामर्थ्य अंती समाजाच्या विघटीकरणाला कारणीभूत न होऊं देतां एकसूत्रीपणें समाजसंघटनेचें प्रतिनिधित्व करणारी व सामाजिक जीवनाचें प्रतीक असलेली जी राजसत्ता, तिच्या हातांत एकवटणें व तिच्या करवीं अधिक सामर्थ्याची निर्मिति करीत राहाणें या योगें सतत वाढत जाणाऱ्या भौतिक सामर्थ्याची समाजहितकारकता व सामाजिक शक्तीची व्यक्तिजीवन-विकास करण्याची पात्रता हीं दोन्हीं वर्धमान होत जातात. या संस्कृतीला शाक्त-संस्कृति हें नांव देतां येईल. या संस्कृतिचा आविष्कार मुख्यत्वेंकरून राष्ट्राच्या राजकीय जीवनांतून होत असतो. या संस्कृतीचा पुरस्कार करणाऱ्या समाजास प्रचंड भौतिक शक्तीचें विक्षेपण करणाऱ्या महान् यंत्राची उपमा देतां येईल. हजारों चक्रें शीघ्र वेगानें व कौशल्यानें परिभ्रमण करीत आपल्या गतिमानतेंतून सतत शक्तीचें विक्षेपण करतात, आपल्याशीं संबद्ध असलेल्या इतर असंख्य चक्रांना अशीच शक्ति निर्माण करण्याकरतां गतिमान करीत राहातात व एकापेक्षां एक मोठ्या अशा असंख्य चक्रांतून अप्रतिबद्ध गतिमानता, शक्ति सातत्य व प्रचंड सामर्थ्याची उत्पत्ति होऊन त्या सामर्थ्याचा समन्वय करणारा सूत्रधार सर्व जगाला अशक्य भासणारें हजारों चमत्कार लीलया करून दाखवितो. सामर्थ्याची निर्मिति, तिची जोपासना पुन्हां सामर्थ्य निर्माण करण्याची उत्पादकता, या सर्व गुणांचा कौशल्यानें संयोग जोडून मानवी समाजाला प्रचंड भौतिक सामर्थ्य प्राप्त करून देणें व त्या सामर्थ्याची धारणा समाजाच्या संघटित शक्तिसहाय्यानें करीत राहाणें हें शाक्त-संस्कृतीचें मुख्य कार्य होय. व्यक्तिजीवनाचा विकास करीत असतां समाजाची संघटना अधिकाधिक घट्ट व मजबूत

करीत राहाणें, व्यक्ति व सामाजिक जीवन यांतील विरोध नाहींसा करून त्यांना एकरूप करणें, जें समाजाचें हित तेंच व्यक्तीचें, जे व्यक्तीचें सामर्थ्य तेंच समाजाचें अशी समरूप अवस्था निर्माण करून राष्ट्राला सामर्थ्यसंपन्न, विजिगीषु, प्रगमनशील करीत राहाणें हा शाक्त-संस्कृतीचा विशेष गुण आहे. जगांतील थोर महात्म्यांनीं जानपदसंस्कृतीच्या बुजबुजाटानें अधःपतित झालेल्या व वाणिज्य-संस्कृतीच्या ओढाताणींत निस्त्राण व छिन्नविच्छिन्न झालेल्या मानवी-सृष्टींत गीर्वाणसंस्कृतीचें बीजारोपण करण्याचा प्रयत्न केला असतां, वीरश्रेष्ठांच्या व जानपदांच्या दीर्घकालीन संग्रामांतून निर्माण झालेली संक्रमणावस्था म्हणजे शाक्त-संस्कृतीचें युग. जानपद-संस्कृतीचा सर्वस्वी नाश करून वाणिज्य-संस्कृतीच्या अभेद्य कवचाचा भेद करण्या॰ करितां धडपडत असलेली शाक्त संस्कृति ही मानव-जातीची एकमेव आशा आहे, रात्रीच्या अंधःकाराचा नाश करण्याकरितां भगवान् सवित्यानें फेंकलेले सहस्र कर रजनीच्या मोहक तिमिरजालांतून पृथ्वीला सहजासहजीं मुक्त करूं शकत नाहीं, पण क्षितिजाच्या पलीकडून आपला दैवीप्रकाश पसरविणाऱ्या किरणांचे प्रयत्न व्यर्थ जात नाहींत. रात्र आणि दिवस यांच्या सीमेवर अहर्निशेच्या घनघोर संग्रामांत परास्त होऊं लागलेली रजनी व विजयी होऊं लागलेला प्रकाशदिन यांच्या मधली संक्रमणावस्था सृष्टीला दृगोच्चर होते व केवळ उषादर्शनाच्या आशेनेंच तेजाचा अविष्कार होण्यापूर्वीच दिशा उजळूं लागतात. गीर्वाण-संस्कृतीच्या प्रत्यग्दर्शनासाठीं आतुर झालेल्या व जानपद-संस्कृतीचें प्राणघातक कवच फोडून वर आलेल्या शक्तिपूजक मानववीरांची संस्कृती या संक्रमणावस्थेंत शाक्त-संस्कृतीच्या रूपानें प्रगट होते. भविष्यकाळीं गीर्वाण-संस्कृतीच्या प्रभावानें अतिमानवतेचें उच्चपद मानवाला प्राप्त करून घेतां येईल याच्या

कदाचित् न कळत झालेल्या जाणीवेने व त्याची पूर्व तयारी म्हणूनच शाक्तसमाजांतील प्रत्येक व्यक्तिमात्रासमोर मनुष्याच्या श्रेष्ठतेचें स्फूर्तिदायक आदर्श ठेवलेले असतात. आपल्या सर्व नैसर्गिक शक्तींचा समन्वयात्मक विकास करून वाटेल तें महत्पद मनुष्याला सहज गांठता येतें हें तत्त्व शाक्तांच्या रोमारोमांच भिनलेलें असते. समानशील, विकसनशील, व सामर्थ्यसंपन्न व्यक्तीमात्रांचें संघटन करून त्या संघटनेच्या सहाय्यानें समाजांत अतिश्रेष्ठ मानवाची निर्मिति सुलभ करीत रहावी हें ध्येय त्यांच्या दृष्टीसमोर ठेविलें जातें. व्यक्तीचा विकास समाजाच्या शक्तिमत्तेशिवाय अशक्य होईल व समाजाची शक्ति ही राजकीय सत्तेच्या प्रभावाशिवाय टिकूं शकणार नाहीं म्हणून उत्तम पुरुषांचा हा संघ प्रबल राजसत्ता प्रस्थापित करून संघ, व्यक्ति, व राजसत्ता या त्रयींच्या सहाय्यानें साऱ्या जगांत राष्ट्राला अग्रस्थान, राष्ट्रांत संघाचें पुढारीपण व संघाच्या सामर्थ्यांत सर्व घटकावयवाची भागीदारी प्राप्त करण्यासाठी ईर्षेने प्रयत्न करूं लागतो. यंत्राच्या प्रत्येक घटकांचे श्रेष्ठत्व, यंत्राची शक्ति वाढवीत राहाते तद्वतच यंत्राच्या संकलनात्मक शक्तीने त्याच्या घटकावयवांचे मोल वाढतें. व्यक्ति अथवा संघ याचें श्रेष्ठत्व टिकविण्याकरतां उत्कृष्ट शरीर, शुद्ध रक्त, तेजस्वी मनोभूमिका, उदात्त प्रेरणा, ज्ञान व सामर्थ्य यांची महत्त्वाकांक्षा, शीलसंवर्धन व कर्तव्यनिष्ठा यांनीं युक्त असलेल्या घटकांचें सुसंगत व प्रभावी कुटुंबीकरण, सांघिक जीवनाला पोषक व समाजाच्या सामुहिक कार्याला प्रेरक असे कौटुंबिक जीवन व राष्ट्राच्या आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक विकासासाठीं आपलें सर्वस्व अर्पण करणारें सांघिक जीवन या सर्वांची संगती शाक्त–संस्कृतीचें वैशिष्ठ्य होय. वाणिज्य संस्कृतीची भयानक स्पर्धा व जानपद–संस्कृतीची विषारी दाहक आंच यांतून सुखरूपपणें

विजयी होऊन बाहेर पडलेली शाक्त–संस्कृति भविष्यकालीं अवतीर्ण होणाऱ्या गीर्वाणसंस्कृतीचा संदेश आजच्या जगांत आणून पोहोंचवूं शकेल. एवढेंच नव्हे तर त्या संस्कृतीचा प्रत्यक्ष आविष्कार जेणें-करून सुलभ होईल अशी भूमिका जगांत तयार करण्याचें कार्य व व्यक्तित्वाच्या विकासानें अधिकाधिक श्रेष्ठतर श्रेणीचा मानव निर्माण करूं शकते. जानपद–संस्कृतीशीं शाक्त–संस्कृतीचें नातें अहिनकुल वैरासारखें आहे. स्वतःभोंवतीं कांटेरी कुंपणाचें संरक्षक कवच उभें करून कूपांतल्या मंडूका प्रमाणें आपल्या संकुचित क्षेत्रांत समाजाची उभारणी व संस्कृतीचा विकास करीत राहाणें शाक्त–संस्कृतीला कधींच शक्य नाहीं. साऱ्या जगाला आपणांसारखे करण्याची तळमळ ही मूलतःच आत्मोद्धाराच्या प्रयत्नाची आवश्यक बाजू आहे. शिवाय भोंवतालीं शत्रूंचा गराडा पडला असतां जानपदसंस्कृतीच्या हीन मायावी चळवळीचें जाळें भोंवति विणलें जात असतां व वाणिज्यसंस्कृतीची सर्वभक्षक शक्ति आपला कराल जबडा पसरून गीर्वाणसंस्कृतीच्या अंकुराला ग्रासण्याकरतां सज्ज होत असतां आंतरराष्ट्रीय कुटिल राजनीतीनें आंखूण दिलेल्या भौगोलिक सीमांच्या आंत राष्ट्रीय तटबंदीच्या बंदिस्त चौकांत समाजोद्धाराचें व जगदुद्धा-राचें सोहळे करीत राहणें शाक्त–संस्कृतीला शक्य नाहीं. अंतरांत दाटलेल्या घनरूप बाष्पाचा स्फोट होऊन साऱ्या जगांवर वर्षाव करणें हीच मेघांच्या वर्धिष्णु शक्तीची परिणती, यौवन मदमत्त झालेल्या षोडषवर्षारतिसुंदरीच्या अंगांत खेळणाऱ्या आनंद विलासाची अंतिम परिणती म्हणजे पार्थिव देहाच्या मर्यादा ओलांडून कांठोकांठ भरलेल्या अमृतकुंभांतून ओसंडणाऱ्या रसाप्रमाणें मुसमुसून व रसरसून अंगांतून फुटून बाहेर पडणें व भोंवतालच्या जड सुष्टींत सत्य, सौंदर्य नि माधुर्य यांचें चैतन्य खेळवून आत्मार्पणानें दुसऱ्या आत्म्याशीं मधुमीलन

घडवून आणण्यांतच होतें. गिरिकंदरांतून सूक्ष्मरूपाने प्रस्फूर्त होणाऱ्या सरिता गतिमानतेनें हळूंहळूं विराटरूप धारण करीत सांताच्या मर्यादा उल्लंघून अनंत सागरांशीं एकरूप होतात त्या प्रमाणेंच गतिमानता व प्रसरणशीलता या गुणधर्मानेंयुक्त असलेल्या शक्ति जगाशीं एकरूप होण्याकरतां धडपडत असतात. अंत:करणांत निर्माण होणाऱ्या-तरल भावना, समानधर्मी रसिकांच्या अंत:करणांत वाव मिळण्या करतां धडपडत असतात, त्या प्रमाणेंच शाक्त–संस्कृतीनें पुनीत झालेल्या समाजाची आत्मोद्धाराची चळवळ ही आपल्या बाह्य रुपांत आपल्या प्रसरणशीलतेचा आविष्कार करतो निव्वळ व्यवहारी दृष्टीने पाहतां ओबडधोबड नि अवाढव्य अशा सहस्रावधि प्राण्यांच्या संहारकर्मी हिंस्रश्वापदांच्या व सूक्ष्मरूपानें जगाचें रक्त शोषण करणाऱ्या कोट्यावधि कृमिकीटकांच्या जगत्प्रसाराला विरोध करून व त्यांच्या अपहार शक्तीचा विध्वंस करून तसेंच मोकाटपणें जगावर पसरून जागा अडविणाऱ्या वनस्पति सृष्टीचा संकोच करून मानवानें आपल्या जीवितसातत्य व विस्तारासाठीं ही भूमिका योग्य करून घेतली. श्रेष्ठांचा जगण्याचा हक्क हे निसर्गातील त्रिकालाबाधित सत्य होय. समर्थांच्या जीवनासाठीं आवश्यक असणारीं साधनें कृमिकीटकांप्रमाणें जीवन जगणाऱ्या व मानव जातीला कलंकवत् असणाऱ्या हीन असंस्कृत व अध:पतित दुर्बल दासजनांनीं आपल्या विस्ताराच्या बलावर अपहारिली असतां, जगांतील साऱ्या नैतिक मूल्यांचा विनिमय करून सामर्थ्याला उपभोगपरायणतेचें साधन बनविणाऱ्या वाणिज्य-संस्कृतिविलासकांनीं अपहारिली असतां, राष्ट्रीय तटबंदीच्या मर्यादेंत राहून जीवन-संकोच करीत अपमृत्यु कवटाळणें शाक्त-संस्कृतीला कदापि पटणार नाहीं. पृथ्वीच्या साऱ्या जीवनसाहित्यावर, पंचमहाभूतांवर व जीवन

जगण्याच्या हक्कावर सर्वांत श्रेष्ठ अधिकार शाक्त-संस्कृतियुक्त मानव समूहांचाच असावा हेंच मानव-हिताच्या दृष्टीनें अतियोग्य आहे. आपल्या सामाजिक राजकीय जीवनाचा विस्तार करीत जगांतील सर्व उत्कृष्ट मानवांना आपल्यांत आत्मसात करून घेण्याची योजन करणें शाक्त-संस्कृतीला आवश्यक आहे. उत्तमांगांची वृद्धि व कनिष्ट अंगांचा लय, सद्भावनांचा परिपोष व असत् प्रवृत्तींचा नाश यांतूनच व्यक्तीचा विकास शक्य होईल तद्वतच मानवसमाजरूप विराट् पुरुषाच्या शरीरांतील दुर्बलता, अशुद्ध रक्त, रोगजंतू, व निसर्गविरुद्ध असलेल्या असत्प्रवृत्ति इत्यादि सर्व दोषांचा नायनाट केल्याशिवाय त्याचा उद्धार होणे अशक्य. प्राणायामादि ध्यान धारणेनें हृदयाच्या गाभाऱ्यांत निर्माण केलेली शक्ति व त्यायोगें शुद्ध झालेल्या रक्ताचा सांठा मंदिरांतील तिमिरजालाचा नाश करीत चौफेर पसरणाऱ्या नीरांजनीच्या प्रकाशाप्रमाणें सर्व शरीरांत संचार करणार नाहीं तर त्या बिचाऱ्या जीवाला त्यांचा काय उपयोग? येशू ख्रिस्तानें म्हटल्या-प्रमाणें दिवा लावून कोणी टोपीखालीं झांकून ठेविला आहे काय? तो टेकडीच्या उंचावर ठेवून त्याचा प्रकाश चोंहीकडे पसरविण्यानेंच ज्योतीच्या जीवनाचें सार्थक होईल. आसमंताला प्रकाशित करणें अथवा अंधःकारांत लुप्त होऊन जाणें हें दोनच मार्ग संभवतात. सभोंवतालच्या जगांतील जानपद-संस्कृतीची आंच लागून समाजांत उत्पन्न झालेला शाक्त-संस्कृतीचा अंकूर बाल्यावस्थेंतच होरपळून जाऊं नये अशी इच्छा असल्यास बीजाचा परिस्फोट करून बाहेर पडणाऱ्या अंकुराला भूमिगर्भाच्या वरचा मार्ग दाखविला पाहिजे व ऊन, वारा, पाऊस, विद्युत आणि उत्पात, अग्नि आणि जलप्रवाहाचे धक्के, धरणीचा कंप व लाकुडतोड्याची कुऱ्हाड यां सर्वांच्या विरोधांतून यशस्वीतेने जीवनविकास करून घेणारा शाखापल्लव-

पुष्पफलयुक्त महावृक्ष निर्माण झाला पाहिजे. ज्यानें अशी व्यवस्था केली नाहीं अशी स्पार्टासारखीं शाक्त-संस्कृतिसंपन्न अनेक राष्ट्रें जानपद-संस्कृतीच्या भोंवऱ्यांत सांपडून कालाच्या उदरांत गडप झाली. स्वत:च्या श्रेष्ठतेची संपूर्ण जाणीव प्रत्येक व्यक्तिमात्राला व सांघिकरुपानें समाजला तीव्रतेने असणें, अट्टाहासानें त्याचें प्रतिपादन करणें व ज्ञानकर्मांच्या सहाय्यानें श्रेष्ठत्वाचा आविष्कार करून आपलें श्रेष्ठत्व सिद्ध करून दाखविणें हें शाक्त-संस्कृतीचें प्रमुख लक्षण होय. आत्मानुभूति आणि स्वत:च्या आत्म्याचें श्रेष्ठ स्वरुप प्रत्ययास आणून घेण्यानेंच आत्मोद्धाराचा मार्ग सांपडू शकतो या वेदांताच्या सिद्धताप्रमाणें आपल्या ज्ञातिश्रेष्ठत्वाच्या जाणीवेने मानवहितकारक अशीं अनेक महत्कार्ये पार पाडण्याचें व अतिमानवतेचें उदात्त ध्येय साधण्याचें सामर्थ्य समाजाच्या अंगीं उत्पन्न होऊं शकते. शिवाय या भावनेंत आभासानें निर्माण होणाऱ्या दोषांची भीति नसते कारण केवळ काल्पनिक श्रेष्ठतेच्या घोषणेने समाजाला आत्मप्रत्यय घडून येणें शक्य नाहीं. शाक्त-संस्कृतीचा पुरस्कार करणाऱ्या समाजाला जी खडतर तपश्चर्या करावी लागते व कष्ट, त्याग, आत्मबलिदान, अविश्रांत परिश्रम इत्यादि दुष्कर नीतिमार्गानें जावें लागतें, या सर्वांचा विचार केला म्हणजे साध्या मनोविकृतींतून निर्माण झालेलीं आभासात्मक श्रेष्ठत्वाची जाणीव ही शेवटपर्यंत टिकाव धरूं शकत नाहीं. ‘चणे खावे लोखंडाचे तेव्हां ब्रम्हपदीं नाचे’ या तुकोबांच्या उक्तिप्रमाणें श्रेष्ठत्वाची जाणीव ही मोहानें अभिलाषा धरण्याजोगी सोपी गोष्ट नसून जगांतील एका अत्यंत कष्टप्रद नि असाध्य तत्त्वमार्गाचे आव्हान आहे. सर्व प्रकारच्या संकटपरंपरांतून पुढें जात असतां ही भावना टिकली तरच शाक्त-संस्कृतीचें अस्तित्व सिद्ध होतें. स्वत:ला सूर्यप्रभव समजणाऱ्या जापान्यांची भावना

असो अथवा स्वतःला Herrenfolk ( master race प्रभुज्ञाति ) समजणाऱ्या जर्मनांची भावना असो, या भावनेंत मनुष्याला खरोखरच श्रेष्ठतेकडे नेण्याची किमिया आहे हें निःसंशय. ग्रीकनागर राज्यांची पौर-संस्कृति हेलेनिक-संस्कृतीच्या अभिमानानें साऱ्या जगावर ग्रीसचे अधिराज्य स्थापूं पहाणाऱ्या मॅसिडोनीयाची संस्कृति व रोमची सामर्थ्य संपन्न संस्कृति याच भावनांनीं प्रस्फूर्त झाली होती. निसर्गानें मानवाच्या अंतःकरणांत उपजतच निर्माण केलेल्या सामर्थ्येच्छा ( Will to power ) व जीवनविकास यांना पूर्णत्वाकडे नेऊं शकणारी संस्कृति वावभूमि ( Living space ) च्या प्राप्तीसाठीं आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या क्षेत्रांत हत्याकांडाचें तांडवनृत्य सुरुं करीत असेल तर तो शाक्तांचा दोष नव्हे. जगांतील साऱ्या तेजस्वितेचा, व मानवजातीच्या व्यक्तिसामर्थ्याचा नाश करण्या करतां टपून बसलेले, साऱ्या जगांवर कृमिकीटकरुपी दासजनतेचें जाल पसरवून मानवतेला कलंक लावणारे नीच योनींतील लघुमनवांचा वंश विस्तार करून भूमिद्रव्याचा अपहार करविणारें, वीरश्रेष्ठांचे शत्रू, अतिमानवतेचे वैरी व गीर्वाण संस्कृतीचें मारेकरी असलेले जानपद संस्कृतीचें पुरस्कर्ते व वाणिज्य - संस्कृतीचें दलाल, यांचा दोष आहे. कोट्यावधि कावळ्यांनीं मानस सरोवरावर चौफेर हल्ला करून व अब्जावधि पंकमग्न बेडकांनीं खळबळ माजवून मानस सरोवरांतील पाणी भ्रष्टविले नि आटविले तर पक्ष्यांना देवस्थानीं शोभणाऱ्या राजहंसावर पाण्यावांचून तडफडून मरण्याचा प्रसंग येईल. या वावभूमीच्या कल्पनेला इतिहासांतील अनेक शाक्तराजांनीं ' कृण्वंतो विश्वमार्यम् ' या दैवी उक्तीच्या स्वरुपांत, अश्वमेधाच्या धार्मिक स्वरूपांत, चक्रवर्तित्वाच्या राजकीय कल्पनेंत अथवा अगदीं अलीकडच्या काळांत Lebensraum ज्या जर्मन प्रणीत अर्थ शास्त्रीय

ारणाच्या स्वरुपांत जगासमोर मांडले असो, समर्थांच्या जीवन-
िकासाचा संरक्षणीय हक्क म्हणून वाटेल त्या रक्तपाताचें मोल
ऊन त्याची प्रस्थापना करावी यांतच मानवी समाजाचें अंतिम
ित आहे. ' एकश्चंद्रस्तमोहन्ति नच तारागणोपिच ' या काव्योक्ति
माणें दुर्बल राष्ट्रांची शेंकडों घुंगुरटीं पायाखालीं तुडविलीं गेलीं
नष्ट झालीं तरी बहेत्तर पण शक्तीची उपासना करीत मनुष्य
त्राला लघुत्वाकडून श्रेष्ठतेकडे नेणारे शाक्तसंस्कृति संपन्न राष्ट्र
गांत सत्ताधीश होऊन जगलें पाहिजे तरच मानवजातीचा खरा
द्धार होईल. आजपर्यंच्या इतिहासांत शाक्तसंस्कृतीच्या प्रस्थापने-
ाठीं वीरश्रेष्ठांनीं केलेले वैयक्तिक प्रयत्न सोडले तरी ज्या प्रयत्नांना
र्तस्वरुप आलें अशा यशस्वी शाक्तराष्ट्रांचा इतिहास मगधाचें
ाद, पाटलीपुत्राचें **मौर्य**, उज्जयनीचें **गुप्त** व पाटणाच्या **पृथ्वी-
ल्लभाचें** राज्य यांच्या स्वरुपांत भारतीय-इतिहासकाराचे मार्गदर्शन
रीत आहेत. निर्भेळ शाक्तसंस्कृति साध्य करण्याच्या प्रयत्नांत
िश्रशाक्तसंस्कृतीची स्थापना करणाऱ्या हजारों राष्ट्रांची उदाहरणें
गाच्या इतिहासांतून दाखवितां येतील.

आत्म्यानें सांताच्या मर्यादा उल्लंघून अनंताच्या सीमेवर टेवलेलें
ाऊल मानवाला तमोगुणाच्या खोल गर्तेतून काढून प्रकर्षित रजो-
णाचें प्राप्त करून घेतलेलें अत्युच्च शिखर, अपूर्णत्वानें पूर्णत्वाला
वटाळून त्यांत विलीन होण्याकरतां पसरलेले बाहू, मानवाच्या
घुत्वानें आपल्या विनाशांतून क्षितिजा पलीकडील श्रेष्ठजीवनाच्या
येय-दर्शनासाठीं घेतलेली धाव, मानवजातीनें निसर्गावर विजय
िळविल्या नंतर आंतरिक निसर्गावर नियंत्रण ठेवून अलौकिक
ामर्थ्याच्या प्रभावानें पंचमहाभूतांचें स्वामित्व हातीं घेण्याचा केलेला
ादर्श-प्रयत्न व सरते शेवटीं मानवी जीविताच्या अंतिम ध्येय

सिद्धिसाठीं केलेल्या प्रयत्नांत अर्ध्यावाटेवर प्राप्त होणारी संक्रमणावस्था अथवा अंधारांतून प्रकाशाकडे जात असतां क्षितिजाजवळचा उष:काल म्हणजेच सहस्त्रावधि वर्षानंतर मानवांच्या इतिहासांत वीरश्रेष्ठांच्या प्रयत्नानें ऐतिहासिक आक्रमण नियतीनुसार शक्तिविकासाची परिणती होऊन भूतलावर अवतीर्ण होणारी शाक्तसंस्कृती; या शाक्तसंस्कृती-च्या गवाक्षांतूनच मनुष्याला गीर्वाण-संस्कृतीच्या अवतीर्णतेचा मार्ग दिसूं शकतो.

---

# वाणिज्य-संस्कृति

गीर्वाण-संस्कृति ही सत्वगुणप्रधान; शाक्त-संस्कृति ही रजोगुणप्रधान व वाणिज्य-संस्कृति नि जानपद-संस्कृति ह्या तमो-गुणाच्या दोन अवस्था असें वर्णन केलें म्हणजे या सर्वांचें खरें स्वरूप नीट ध्यानांत येईल. तमोगुण हा स्वतंत्र गुण नसून प्रकाशा-च्या अभावाला सावली म्हणावें तद्वतच सत्त्वगुण अथवा रज याच्या विकृतीला तमोगुण असें म्हणण्यांत येतें. रजोगुणाच्या विकृतीनें ओतप्रोत भरलेली वाणिज्य-संस्कृति नि सत्त्वगुणाच्या विकृतीनें भेसूर नि किळसवाणी झालेली जानपद-संस्कृति होय. जानपद-संस्कृती-च्या सर्व गुणधर्मांनींयुक्त असलेला समाज स्वार्थ आणि उपभोगपरा-यणता याचें साधन म्हणून जीवनासक्तीनें सामर्थ्याची उपासना करुं लागतो तेव्हां राजकीय स्वरूपांत लोकशाही किंवा साम्राज्यशाही, आंतरराष्ट्रीय राजकारणांत Balacne of power (शक्तीचा समतोलपणा) चा पुरस्कार, आर्थिक क्षेत्रांत भांडवलशाही अथवा अर्थ-प्रधानसत्ता, सामाजिक क्षेत्रांत ऐक्य स्वातंत्र्य, धार्मिक क्षेत्रांत स्याद्वाद व सरसकट ध्येयहीनता या स्वरूपांत वाणिज्यसंस्कृतीचा अविष्कार त्या

समाजांत होऊं लागतो. जानपद-संस्कृतीचें संरक्षक-कवच बनून हीन वंश सातत्य व मानव संख्याविस्तार, आंतरराष्ट्रीय शांततावाद, गुलामांचें आर्थिक शोषण, भौतिकशास्त्राच्या संहारक स्वरूपाची अपरिमित वाढ, जीवन कलहाला बेसुमार चढाओढीची जोड देऊन समाजांतील घटकावयवांचा बुद्धिभेद नि शक्तिभेद या सर्व साधनांनीं एका विशिष्ट लोक समूहाचें भोग - विलास, जागतिक उन्नतीचे मोल देऊन सतत चालवीत राहाणें हें वाणिज्य-संस्कृतीचें प्रमुख कार्य होय. जाणूनबुजून पत्करलेली आत्मवंचना ढोंग, ईर्षा. मत्सर, स्वार्थमूलक रक्तपिपासा पार्थिव वैभवाच्या कर्दमींत लोळत भोग-विलासाची सुखासीन निद्रा घेत राहण्याची अनिवार इच्छा व हे सर्व हेतू अप्रतिबंधपणें पार पडावेत म्हणून लुटलेल्या, पराभूत व शरणागत राष्ट्रांची अत्यंत क्रूरपणें खच्ची करून, त्यांचा बुद्धिभेद करून, बौद्धिक गुलामगिरींत, सांस्कृतिक अंधाधुंदींत. अंधश्रद्धा, अज्ञान, बौद्धिक दिवाळखोरी, दुर्बलता व तत्वभ्रम, इत्यादि मोहक पण मजबूत आवरणांखालीं त्यांची माणुसकी दडवून टाकून त्यांची राबणूक व पिळवणूक करीत असतां त्यांची उरली सुरली शक्ति हताशपणें वेड्या मूक हालचाली करण्यांत खर्च व्हावी अशी भरभक्कम योजना आंखणें व सर्व ग्रहांना पालथे निजवून त्यांच्या पाठीवर आपला मंचक ठेवून घोरत पडणाऱ्या **रावणा**प्रमाणें वैभवांत गुंग होऊन जाणें ही वाणिज्य संस्कृति प्रधान साम्राज्याची ऐतिहासिक कामगिरी होय. अधोमुख झालेल्या नवग्रहांपैकीं जर कां एकादा शनी उर्ध्वमुख झाला तर रावणाचें चौदाचौकड्यांचें राज्य एका क्षणांत नाहींसे होईल पण कलहाचा अग्नि भडकविणाऱ्या **नारदानें** त्या **शनीला** स्वत:च्या रूपाची व सामर्थ्याची जाणीव करून द्यावी तेव्हांच ! एवढा मोठा शनी पण अधोमुख होऊन

भूमिगत होतां क्षणींच स्वतःच्या स्वरूपाला विसरून हतबल होऊन पडला, तीच अवस्था जगांतील सर्व गुलाम राष्ट्रांची या वाणिज्य-राष्ट्रानें करून टाकली. स्वतःच्या स्वार्थ साधनासाठीं जगांतील सर्व राष्ट्रांनीं जानपद संस्कृतीच्या कदमींत अनंत काळपर्यंत लोळत पडावें ही मनीषा मनांत ठेवून जानपद-संस्कृतीचा सदैव पुरस्कार करण्यांत वाणिज्य राष्ट्रें फार जागरूक असतात. पण संसर्गजन्य रोगानें पछाडलेल्या गुलामांच्या खांद्यावर बसून आपल्या धनीपणाच्या वैभवाचें प्रदर्शन करणारा वेडापीर लौकरच स्वतः त्या रोगानें ग्रस्त होऊन दुर्गतीच्या फेऱ्यांत सांपडतो तद्वतच गुलामांची गुलामगिरी टिकवून त्यांच्या हीनतेवर आपल्या स्वार्थाची इमारत उभारणाऱ्या वाणिज्य राष्ट्राच्या अधःपाताचें बीज ज्या जानपद संस्कृतीचा ते पुरस्कार करतात व जी खुद्द त्यांच्याहि रोमारोमांत भिनलेली आहे त्यांतच सांठवलें आहे. मातीशीं संपर्क झालेल्या लोखंडाचा जंग लोखंड खाऊन टाकतो त्या प्रमाणेंच इतरांना घाणींत नि कदर्मांत बुडवीत ठेवणाऱ्या नराधमांनाहि घाणीचा उपसर्ग पोहोंचून स्वतःपंकमग्न व्हावें लागतें. शाक्त संस्कृतीच्या आक्रमणा-पासून वांचविलेली जानपदसंस्कृति वाणिज्य राष्ट्रांच्या बालेकिल्ल्यांत सुप्तावस्थेंत दडून राहिलेल्या आपल्या सूक्ष्म बीजाला जागृत करते तेव्हां स्वतःवाणिज्य राष्ट्रेंच जानपदसंस्कृतीनें पोखरलीं जाऊन कोलमडून पडतात. कुरणांतील कुत्र्याप्रमाणें जगदुद्धाराचें कार्य स्वतःहि करा-वयाचें नाहीं व दुसऱ्यासहि करूं द्यावयाचें नाहीं या अधाशी-पणाच्या बाण्यानें मेलेला सबंध हत्ती आपणांसच खावयास मिळावा या आशेनें टपून बसलेला कोल्हा शेवटीं हत्तीचें मांस खातां खातां स्वतः त्या कुजट मांसांच्या परिणामानें हत्ती संपण्यापूर्वींच स्वतः मरून पडतो त्याप्रमाणें जानपदसंस्कृतीच्या भांडवलावर आपल्या

विनिमय-मूल्यानें, भौतिक सामर्थ्यानें प्राप्त झालेलें राजकीय सामर्थ्य, आर्थिक वैभव व लष्करी सत्ता हीं टिकवावी व दासजनांच्या प्रेतांच्या खातेऱ्यावर Monopoly नें चरत राहावें, यांच्या चितेवर आपल्या स्वार्थाची पोळी भाजून घ्यावी, त्यांच्या रक्तामांसांवर आपल्या भोगवसंताचें बगीचे उभारावें, व त्यांच्या प्राणाचें मोल देऊन आपल्या रतिरंगाचे भोगविलास खेळावे अशी महत्त्वाकांक्षा बाळगणारें वाणिज्य राष्ट्र हीं सर्व सुखस्वप्नें खरीं ठरण्यापूर्वीच स्वत:च पसरविलेल्या घाणींतील रोगजंतूंनीं जर्जर होऊन स्वत: आपल्याच हातानें पेटाविलेल्या चितेच्या अग्निज्वालानें भस्मसात् होऊन जाते. आधुनिक युद्धांत शत्रूपक्षाची दाणादाण करून त्यांना गुदमरून मारण्यासाठीं पसरविलेल्या विषारी धुरांत विजयोन्मादाने लढाई जिंकल्याच्या आनंदांत शत्रूच्या प्रदेशांत उतरले असतां स्वत:च गुदमरून मरण्याचा प्रसंग येतो तशीच वाणिज्य राष्ट्रांची अवस्था होते.

प्राचीन काळच्या **अशोक हर्षादि** वाणिज्य सम्राटांची उदाहरणें व मध्ययुगांत होली रोमन साम्राज्य, ऑटोमन साम्राज्य, रक्त पिपासु रानटी इस्लामी साम्राज्यें, मध्य आशियांतील मानव देहधारी नरराक्षसांची मंगोलियन साम्राज्यें या सर्वांचें धोरण Fire & blood policy (जाळपोळ आणि रक्तपात) या निर्लज्ज तत्त्वावर अधिष्ठित असल्यामुळें त्यांच्या कसाबकरणीचें नग्नसत्य इतिहासकाराला प्रत्येक पानापानांतून सांपडूं शकते. पण अर्वाचिन युगांत Atlantic महासागराच्या पलीकडे अर्ध्या जगाची आर्थिक मालकी आपल्याकडे घेऊन बसलेलें संयुक्त संस्थानांचें (अमेरिका) अदृश्य साम्राज्य (Invisible Empire) व दुसऱ्या अर्ध्या जगाची नियंत्रक सत्ता प्रत्यक्ष साम्राज्याच्या स्वरूपांत आपल्या हातीं चार शतकांपासून खेळवीत असलेलें ब्रिटन यांची अगम्य राजनीति नेहमींच

जगांतील विद्वानांची दिशाभूल करीत आली आहे. अखिल मानवजातीला जानपद-संस्कृतीच्या विनाशक गर्तेतून कधींहि वर न येऊं देण्याचा या दोघांनीं चंग बांधला आहे. अनेक गुलाम राष्ट्रांच्या प्रेतावर पाय देऊन वैभवाच्या शिखरावर आरुढ होऊं पाहाणाऱ्या या वाणिज्य-राष्ट्रांची माया इतकी प्रभावी आहे कीं तीन-चारशें वर्षांपासून मानवजातीच्या हिताचा सतत नाश करणाऱ्या, त्याच्या व्यक्तित्वाचा ऱ्हास करणाऱ्या व 'जगा आणि जगवा' या भुलावणीनें स्वत:चा जीवनविलास अधिकाधिक सुलभ करणाऱ्या या राष्ट्रांना मानवजातींत शांतता प्रस्थापित करणारें खरे हितकर्ते म्हणून आंतर-राष्ट्रीय जगतांत अग्रपूजेचा मान मिळत आहे. ज्या भौतिक सामर्थ्याचा नि विकृत तत्त्वज्ञानाचा फैलाव करणाऱ्या कुटिल राजनीतीच्या बळावर साऱ्या जगाची संपत्ति आपल्या स्वार्थी भोगविलासाच्या कारणीं लावण्यांत यांनीं यश मिळविलें, तेंच भौतिक सामर्थ्य यांच्या मानगुटीवर बसत आहे व जानपद-संस्कृतियुक्त दासजनांच्या विस्ताराबरोबर फैलावत जाणाऱ्या विकृत तत्वज्ञानाच्या व हीन संस्कृतीच्या रोगजंतूंनी यांचें स्वत:चे राष्ट्र देह पोखरले जात आहेत. भौतिक सामर्थ्याच्या अतिरिक्त वाढीबरोबर मानवाच्या व्यक्तित्वाचा योग्य तो परिपोष होऊन बाह्य निसर्गाप्रमाणेंच आंतरिक निसर्गावर विजय मिळविण्यासाठीं आवश्यक असलेलें आत्मिक सामर्थ्य, मानवी जीवनांतील बाह्य डोलाऱ्याच्या दडपणाखालीं न गुदमरतां धर्नीपणानें मानवोद्धाराकडे त्याला प्रगत करीत नेणारा आंतरिक जीवनविकास, शील, चारित्र्य, विकास आणि संयम यांची संगति, जीवन कलहाला बहिर्मुख करणारी समाज संघटना, त्याग भावनेनें श्रेष्ठपदाला पोहों-चलेली सामर्थ्य संपन्नता, विकसनशील जीवनांतील अंतर्गत दोष काढून उत्क्रांतीच्या ध्येयाची प्रतिति या सर्व गुणांविरहित असलेली

ही वाणिज्य संस्कृति जानपद-संस्कृतीच्या जोडीला भौतिक सामर्थ्याचें पिशाच्च आणून बसविल्यानें निर्माण झालेला मिश्र परिणाम होय. हताश निवृत्ति ही जितकी वाईट तितकीच भोगपरायण रक्तपिपासु प्रवृत्ति हीहि वाईटच ! अरण्यांत नग्नावस्थेंत हिंडत हिंस्रश्वापदा-प्रमाणें आपल्या रक्ताची तहान भागविण्यासाठीं मार्गानें जाणाऱ्या असहाय्य प्रवाशांवर झडप घालून त्याला मारणारा व त्याचा अपहार करणारा पारधी म्हणजे क्षत्रिय नव्हे. शेणांतील किड्याप्रमाणें तीन रीतीनें आपलें आयुष्य कंठणारा व विषारी जंतूप्रमाणें सर्व जगभर पसरून जीविताचा सर्व नाश करणारा हे दोघेहि सारखेच आत-तायी व निंद्य म्हणून एका क्षणाचाहि विचार न करतां पाहतां-क्षणींच वध्य ! निर्जन प्रदेशांत जाळें घालून कोंवळे कोंवळे प्राणी धरणारा फासे पारधी व शांत सरोवराचा भंग करून खाद्याची लालूच दाखवून माशांना जाळ्यांत अडकविणारा कोळी निरुपद्रवी, असहाय्य प्राण्याच्या तळमळीनें, धडपडीनें व आर्त वेदनांनीं दु:खित होण्याऐवजीं आपल्या उदरभरणाच्या आशेनें अथवा जिव्हा लौल्यामुळें उत्साहित होऊं लागतो, त्याच्या पाशवी वासनांना वेळींच बांध घातला नाहीं तर त्याची रक्त पिपासा वाढत जाऊन स्वार्थाकरितां खून करणाऱ्या मारेकऱ्यापासून तों केवळ मौजे खातर माणसांची पारध करणाऱ्या रक्तपिपासु नरमांस-भक्षकापर्यंत त्याची अवनति होऊं शकते. **तैमूरलंगाची** रक्तपिपासा मध्ययुगीन रानटीपणाचें एकटोंक तर सुसंस्कृत अशा अमेरिकेनें शिकारीचा आनंद लुटण्याकरितां रेड Indian लोकांची केलेली पारध ही अर्वाचीन युगांतील वाणिज्य–संस्कृतीनें प्रगट केलेलें दुसरें टोंक ! सर्व जगाला स्वतंत्र करून मानवजातीला उद्धाराचा मार्ग दाखविणें भौतिक सामर्थ्याचें प्रभावी साधन मनुष्याच्या हातीं देऊन त्याला

व्यक्तिविकासाच्या बळावर अतिमानवतेकडे नेण्याचा प्रयत्न करणें, अथवा ज्यायोगें जगांत समता, बंधुभाव, सुख आणि शांति प्रस्थापित होऊन जीवनकलहाच्या धकाधकींतून मोकळ्या झालेल्या मानवाची बुद्धि जगाच्या भविष्यकालासाठीं विधायक योजना आंखणें, शास्त्रज्ञानाच्या सहाय्यानें विश्वाचें व स्वत:चें स्वरूप जाणणें व मानवी जीविताच्या अंतिम ध्येयाची जाणीव करून त्याच्या सिद्धीसाठीं व्यक्तिश: व संघश: झटत राहणें इत्यादि कार्ये मानवजातीला करतां येतील अशी संस्कृति, असें जगनिर्माण करण्याचें ध्येय वाणिज्य राष्ट्रांच्या दृष्टीसमोर कदापि येऊं शकत नाहीं. आहे ही स्थिति कायम ठेवून ती स्थिति बदलू पाहाणाऱ्या प्रत्येक नावोदित शक्तीशीं प्रचंड भौतिक सामर्थ्य व जगद्व्यापी जानपद-संस्कृति यांच्या सहाय्यानें घनघोर संग्राम करून तिचा तात्काळ नायनाट करणें हेंच वाणिज्य संस्कृतीच्या इतिहासांतील कार्य व गीर्वाण संस्कृतीला जन्म देऊं शकणाऱ्या शाक्त-संस्कृतीचें अंकुर दृष्टीस पडलें कीं अनेक जन्माच्या वैऱ्याप्रमाणें सरसावून त्यांवर झडप घालणें हेंच यांचें राजकीय धोरण.

वाणिज्यसंस्कृतीचें अत्यंत महत्त्वाचें ऐतिहासिक वैशिष्ट्य म्हणजे स्वत:च्या निर्भेळ राष्ट्रीय संस्कृतीचा प्रसार करून इतर राष्ट्रांना आपल्यांत आत्मसात् करून घेण्याची त्यांना कधींच प्रवृत्ति होत नाहीं हें होय. आपल्या अंकित राष्ट्रांना आपणाशीं एकरूप केल्यानें समानतेचें नातें निर्माण होईल व सेव्य सेवक भाव नष्ट होऊन आपल्या स्वार्थविलासा करितां इतरांची राबवणूक व पिळवणूक करण्याचें कार्य स्थगित होईल या भीतीनें इतर राष्ट्रांचें सांस्कृतिक भिन्नत्व कायम ठेवून त्यांच्या हीनकस प्रवृत्ति, त्यांचा असुसंस्कृतपणा प्रतिगामित्व व अज्ञान यांच्या भक्कम पायावरच आपले परस्पर संबंध

उभारण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असते. शिवाय त्यांची स्वत:ची राष्ट्रीय शक्ति अथवा सांस्कृतिक चैतन्य इतकें प्रभावी कधींच नसतें कीं विकसनशील नि प्रसरणशील बनून इतर अनेक समाजांना विशिष्ट प्रकारचा जीवनोद्धारक मार्ग दाखवूं शकेल. ज्याच्यापाशीं सांगण्या-सारखें कांहीं नाहीं, तो श्रोत्यांच्या बौद्धिक समरसतेची अपेक्षा कशास करील ? वाणिज्य-संस्कृतीची सर्वशक्ति स्वयंपूर्णतेच्या आभा-सानें कूपांतील मंडुकाप्रमाणें आपल्या मर्यादित जीवनक्षेत्रांत उपभो-गाचे विलास करण्यांतच मग्न होते.

अर्वाचीन युगांतील महान् आर्थिक नि राजकीय घडामोडीनें एका अद्भुत पण अपरिहार्य अशा परिस्थितीला जन्म देऊन वाणिज्य-संस्कृतीचा एक निराळाच प्रकार अस्तित्वांत आणला, ती म्हणजे **रशियाची** समाजसत्तावादी संस्कृति. वास्तविक समाजसत्तावादाचा संबंध केवळ एका विशिष्ट देशाच्या राज्यघटनेपुरताच मर्यादित असतां त्याच्या मागें एका प्रचंड तत्त्वज्ञानाची भूमिका कृत्रिमतेनें उभी करून त्यांतून समाजरचना, संस्कृति व जगद्व्यापी राजकारण याचें निक्षेपण करण्याचा प्रयत्न केला जात आहे. अर्थ–प्रधान जीवनपद्धतींत आर्थिक समतेवर आधारलेली सामाजिक-राजकीय संघ-टना ही स्वर्गतुल्य वाटावी हें साहाजिकच आहे. निर्भेळ राजकीय दृष्ट्या शाक्तराष्ट्रांच्या जोडीला बसूं शकेल अशी रशियाची परिस्थिती असतांहि केवळ त्याच्या संस्कृतिहीनतेमुळें समाजरचना, राज्यघटना व आर्थिक व्यवस्था यावरच मानवी जीवित केंद्रित केल्यामुळें व व्यक्तिजीवनाच्या विकासाचें ध्येय दृष्टीसमोर ठेवण्या-ऐवजीं व्यक्तीला सामाजिक जीवनांत विलीन करून समाजाला संघश: भौतिक सामर्थ्यानें संपन्न करण्याच्या ध्येयहीन मार्गावर मानव जातीला आणून ठेवल्यामुळें शाक्तसंस्कृतीच्या बाह्य स्वरूपांत लपलेली

वाणिज्य-संस्कृति असें मिश्र स्वरूप रशियाला प्राप्त झालें आहे. ब्रिन-शिखराच्या टेंकड्याप्रमाणें भोंडीं दिसणारी ध्येयहीन जीवनपद्धति निर्माण करून व आंतरराष्ट्रीय राजकारणांत तत्त्वहीन स्वार्थसाधनासाठीं साम्राज्य संवर्धन करण्याचें धोरण आंखून रशियानें वाणीज्य संस्कृतीचा एक प्रभावी तितकाच विनाशक, जगाची दिशाभूल करणारा, स्वयंपूर्णत्वाच्या आभासानें आत्मघातकी झालेला असा एक निराळाच प्रकार जगासमोर मांडून दाखविला आहे. ज्या एका विशिष्ट अर्थ-व्यवस्थे-मुळें इतिहासकार व मानवहितैषी यांच्या दृष्टीनें त्याला महत्व प्राप्त झालें त्या सुंदर, सोयशीर व उपयुक्त अर्थव्यवस्थेचें आवरण काढून त्याच्या खालीं शास्त्रज्ञाच्या भेदक दृष्टीनें न्हाहाळून पाहिलें तर **स्लाव्ह** वंशाची ध्येयहीन, रानटी व प्रतिगामी स्वरूपाची जानपद-संस्कृतीच दडलेली दिसून येईल.

---

# जानपद-संस्कृति

संस्कृति या शब्दाच्या पारिभाषिक अर्थानें पाहूं जातां जानपद राष्ट्रांत अथवा वाणिज्य राष्ट्रांत संस्कृतीचा जवळ जवळ अभाव असतो असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं तर वास्तविक खऱ्या अर्थानें राष्ट्राच्या शाक्तसंक्रमणावस्थेंत खऱ्या संस्कृतीचा उदय होऊन तिच्या उत्कर्षकालीं ती गीर्वाण रूपांत स्पष्टपणें प्रगट होत असते. पण आज संस्कृति हा शब्द ज्या लवचिक नि व्यापक अर्थानें रूढ झाला आहे त्या दृष्टीनें जानपद-राष्ट्रांतहि संस्कृतीची कांहीं पूर्वचिन्हें दिसून येत असतात असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. सामान्यिकांच्या

सांघिक मानसशास्त्रानुसार ज्या विचारपरंपरा, मतप्रणाली व जे स्वाभाविक कल सामुहिक कार्यरूपानें लौकिकी चळवळी घडवून आणतात त्यांनाच आपण वीरपुरुषांच्या कार्याचा व जानपद-संस्कृतीचा संघर्ष असें म्हणतात. ज्या राष्ट्रांत सामान्यिकांच्या मतप्राबल्यानुसार समाजरचना, राज्यघटना व वाङ्मय, तत्वज्ञान, कला आदि मानवी जीवनाच्या बाह्यांगाचें मूर्तस्वरूप प्रगट होतें त्या राष्ट्रांना जानपदराष्ट्रें म्हणतां येईल. चारित्र्य, शील, सामर्थ्य इत्यादि गुणांचा अभाव, संघटनशक्तीची कमतरता, व्यक्तिमात्रांचें क्षुद्रत्व व सरसकट ध्येयहीनता या सर्व गोष्टींनीं युक्त असलेली लौकिकांची जीवनपद्धति यालाच आपण जानपद-संस्कृति असें नांव देतो. तमोगुणप्रधान अशी जानपद-मनोवृत्ति हें जानपद-संस्कृतीचें प्रमुख लक्षण होय. निर्भेळ जानपद नांवाची संस्कृति अस्तित्वांत असणें शक्यच नाहीं, कारण रानटी अवस्थेपासून अर्वाचीन सुधारणेच्या युगापर्यंत ज्या भिन्नभिन्न सामाजिक अवस्थांतून मानव जात. प्रगत होत आली आहे त्या सर्व स्थित्यंतराचें श्रेय जगांतील सहस्रावधि थोर पुरुषांना द्यावें लागेल. अशा प्रत्येक प्रयत्नाच्या वेळीं ज्या अवस्थेंत समाज असेल तदनुसार त्या अवस्थेंत परिवर्तन घडवून आणून समाजाची उन्नति करण्यास्तव झटणाऱ्या थोरपुरुषांची श्रेणी निश्चित होते. अशा प्रत्येक प्रयत्नाच्या वेळीं बहुजन समाजाकडून जो प्रतिकार प्रागतिक कार्याला झाला त्या प्रतिकाराच्या मागली मानसिक भूमिका दर्शविण्यासाटीं ' जानपद-संस्कृति ' हा शब्द मुख्यत्वेंकरून वापरला आहे. उघडउघडपणें

दोन मत-सांप्रदायांचा लढा युगानुयुगापर्यंत चालावा असें स्वरूप या कलहाचें नाहीं. एक हजार वर्षांपूर्वी कोणत्याहि राष्ट्रांतील बहुजन समाजाला उन्नतिकडे नेण्यासाठीं ज्या थोर लोकांनीं आटोकाट प्रयत्न केले असतील त्यांची श्रेणी व विसाव्या शतकांत त्याच राष्ट्राला नवी पुष्टी, नवी तुष्टी व नवें ध्येय दाखवून उन्नतीच्या मार्गाकडे खेंचीत नेणाऱ्या थोर पुरुषांची श्रेणी ही किती तरी भिन्न असणार. त्याचप्रमाणें प्राचीन काळच्या बहुजन समाजाचा विरोध व आजच्या बहुजन समाजाचा विरोध यांच्याहि श्रेणी भिन्नच आहेत. श्रेणींतील भिन्नता, कार्याचें वैचित्र्य, व साधनांची विविधता ही इतकी स्पष्ट असतांहि दोन्ही प्रयत्नांत आढळून येणाऱ्या समान गुणधर्मांचा आढावा घेऊन असे प्रयत्न करतांना वीर पुरुषांची जी मनोभूमिका असते त्याला एका विशिष्ठ संस्कृतीच्या नांवानें संबोधता येतो तसेंच प्राचीनकाळचा बहुजन समाज सुधारणेच्या दृष्टीनें आजच्या बहुजन समाजाच्या मानानें कितीहि मागासलेला असला तरी दोघांच्याहि प्रतिगामित्वांत भासमान होणाऱ्या समान गुणधर्मांना विचारांत घेऊन या विरोधाच्या मागें असलेली मनोभूमिका व बहुजन समाजाचें सर्वसामान्य कल या सर्वांना जानपद संस्कृति हे सांप्रदायिक नांव दिलें आहे. जानपद आणि अतिमानव यांचा हा अनादि झगडा अज्ञात, अगोचर व अगम्य अशा स्वरूपांत न कळत नित्य चालला आहे. निरनिराळ्या कालखंडांत संस्कृति-विकासाच्या भिन्नभिन्न अवस्थांत जानपदांचे आस्तित्व असतें व त्यांच्या विरूद्ध बाजूस त्याहून अतिश्रेष्ठ अशा सांस्कृतिक श्रेणीवर अधिष्ठित असलेले सामर्थ्यवान् वीर पुरुष सूक्ष्म रूपानें आपल्या

चारित्र्यांत अतिमानवतेचा आविष्कार करीत झगडत असतात. कालच्या वीर पुरुषांचें कार्य स्वयंपूर्णत्वाच्या विकृतीनें भ्रष्ट होतांच आजच्या जगांत जानपदांच्या संस्कृतीचें एक अंग समजलें जाऊं शकतें. जगांतील मोठमोठ्या लोकांनी शाक्तसंस्कृति व त्यांतून परिणत होणारी गीर्वाणसंस्कृति यांच्या अवतीर्णतेसाठीं महान् प्रयत्न केले, त्यांच्या व तत्कालीन समाजाच्या प्रतिगामी विरोधाच्या संघर्षांतून मिश्र स्वरूपाची एक निराळीच सांस्कृतिक अवस्था समाजांत प्रत्युत्पन्न होते. या भिन्नभिन्न अवस्थांना संस्कृति म्हणत नसून प्रतिगामि समाजाच्या प्रतिगामी विरोधाची मानसशास्त्रीय भूमिका, जानपदांचें सर्वसामान्य स्वभाव व विचारपरंपरा यांचा समुच्चय म्हणजें जानपद-संस्कृति. निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या कालीं सुधारणेच्या दृष्टीनें जानपदांच्या अवस्थेंत कितीहि फरक असला व त्यांच्या चळवळी नि कार्य कितीहि भिन्न असले तरी सामान्यिकांच्या विचार प्रवाहाची दिशा, लौकिकांच्या आंतरिक निसर्गाचा आविष्कार व स्थिरत्व, शैथिल्य, दौर्बल्य, विकृति नि ध्येयहीनता इत्यादि गुण हे सर्व कालीं समान असल्यामुळें जानपद-संस्कृतींत मुख्यत्वेंकरून यांचाच समावेश केला आहे. व्यक्तित्वाचा संकोच आणि संख्येचा विस्तार या स्वरूपांत जानपद संस्कृतीचा प्रसार अप्रतिहतपणें चालू आहे. भौतिक सुधारणेच्या बाबतींत निरनिराळ्या राष्ट्रांत कितीहि भेद असला तरी जानपदांच्या समानगुणधर्माच्या बाबतीत त्यांच्यांत एकरूपता आहे. जगाच्या इतिहासांत जानपद संस्कृतीचें स्वरूप नेहमींच दुर्बल, निवृत्तिमय, दारिद्र्ययुक्त व राजकीय पारतंत्र्याच्या शृंखलांनीं बद्ध असेंच राहिलें आहे असें मात्र नाहीं. पशुसारखें जीवन जगून देहविक्रय करणारा गुलाम अथवा श्रम-विक्रय करणारा

मजूर म्हणून जगाच्या पाठीवर व्यापक प्रमाणांत पसरणारा आफ्रिकन, अमेरिकन, निग्रो किंवा लांडग्यासारखा खुनशी व क्रूर पण परिस्थितीनें नाडल्यामुळें दुर्बलतेचें पांघरूण घेऊन हीन अवस्थेंत उदरंभरण करीत भटकणारा चीनि, आपल्या गलिच्छ घाणेरड्या संवयी, दुर्बल जीवन, गुलामगिरीचें तत्वज्ञान व निवृत्तिमय जीवन पद्धति या बरोबर घेऊन सहस्रावधि मजुरांच्या रूपानें थव्या थव्यानें बाहेर पडणारा हिंदुस्थानी मजूर अथवा खिशेकापू वाटमाऱ्या आर्मेनियन, हिंस्र रक्तपिपासु मध्य आशियाटिक-मंगोलियन अथवा मोठमोठीं सैन्यें घेऊन खून, जाळपोळ, लूटमार करीत रक्ताच्या नद्या वाहविणारा इराणी - आफगाणी-मुसलमान सेनापति हीं सर्व जानपद-संस्कृतीची प्रतीकें होत. दुर्बलतेला निवृत्तीचें व पराभवाला त्यागाचें स्वरूप देणें अथवा रक्तपिपासेला शौर्याचें व स्वार्थांध अपहराला जीवनविकासाचें स्वरूप देत राहाणें हेंहि एक जानपद-संस्कृतीचेंच अंग होय. **हॅझलिटनें** म्हटल्याप्रमाणें सामर्थ्याकांक्षेचें (Will to power) विकृत स्वरूप (will to mischief) व advancement of life यास रस्कीनूच्या उक्तिप्रमाणें advancement of vanities चें स्वरूप जानपद संस्कृतींत नेहमींच येत असतें. जानपदांविषयींची आस्था, त्यांच्या हिताची तळमळ, त्यांच्या उद्धाराकरितां अविश्रांत परिश्रम करण्याची तयारी असणें निराळें व जानपदांच्या निसर्ग-प्रवृत्तींना उत्तेजन देऊन राजसत्तेच्या जोरावर त्या प्रवृत्तीचे अधिराज्य स्थापण्याचा प्रयत्न करणें हें निराळें; एवढेंच नव्हे तर या दोन्ही गोष्टी केवळ परस्पर विरोधी आहेत. जो जानपदांचा खरा हितकर्ता असेल, तो जानपद-संस्कृतीचा नायनाट केल्याशिवाय कदापि राहाणार नाहीं पण जो जानपद संस्कृतीचा पुरस्कार करील तोच जानपदांचा वैरी व त्यांना

अधोगतीकडे नेणारा. व्यक्तींच्या अंत:करणांतील असद्भावना ह्या व्यक्ति विकासाच्या दृष्टीनें जितक्या त्याज्य, तितकेंच जानपदांच्या असद्भावनांची समुच्चयरूपी प्रणाली अथवा संस्कृति ही जानपदांच्या उद्धाराकरितां सर्वथैव नष्ट करणें आवश्यक आहे. परतंत्र राष्ट्रांत परकीय सत्ताधाऱ्यांच्या कुटिल राजनीतीनें अप्रत्यक्षपणें उत्तेजन दिल्यामुळें व जगांतील लहान लहान स्वतंत्र राष्ट्रांत जानपदांच्या हातीं आलेल्या लोकशाही सामर्थ्याच्या बळावर हा जानपदसंस्कृतीचा विषवृक्ष सदैव फोंफावत असतो. अंतर्गत जीवनकलह व अंतरराष्ट्रीय जीवनस्पर्धा या दोहोंतून सुखरूपपणें मार्ग काढून जानपदांचें तेजस्वी, प्रभावशाली व उन्मार्गगामी राष्ट्र बनावयाचें असल्यास जानपद संस्कृतीच्या अमंगल व हानिकारक प्रवृत्तीवर विजय मिळविणें आवश्यक आहे व हें कार्य शाक्तसंस्कृतीचा अंगीकार करून सामर्थ्योपासनेचें राजकारण स्वीकारण्यानेंच घडून येईल. आजपर्यंतच्या इतिहासाची हीच शिकवण आहे व भविष्यकालीन उन्नतीची गुरुकिल्ली हीच आहे.



# उपसंहार

कोणत्याहि परिस्थितीचा अपरिहार्य परिणाम घडून झालेल्या मोठमोठ्या घटनांनीं जगाचा इतिहास घडविला त्यापेक्षां कितीतरी अधिक व्यापक नि महत्त्वाच्या उलाढाली जगांतील थोर लोकांच्या स्वयंस्फूर्त तत्त्वोपदेशानें व चमत्कृतिपूर्ण दीर्घ प्रयत्नानें घडून आल्या आहेत. मानवजातीचा सांस्कृतिक विकास आजपर्यंत कसा होत गेला व यापुढें त्याचें स्वरूप कसें राहील हें जाणण्याच्या दृष्टीनें जगांतील सर्व थोर लोकांच्या कार्याचें समालोचन करणें उद्बोधक होईल. जगांतील बहुतेक महान् चळवळी व अनेक महत्तम, प्रचंड नि परिणामकारक घटना एखाद्या थोर पुरुषाच्या तत्त्वाचा स्फूर्तिदायक परिणाम होऊन विशिष्ट देशांतील एका वीर पुरुषानें किंवा सामर्थ्य संघटित विशिष्ट ज्ञातीनें अथवा राष्ट्रानें प्रत्यक्ष कृतींत उतरून दाखविले आहेत. आज जवळ जवळ सर्व जगांवर युरोपियन राष्ट्रांचें राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत अधिराज्य असल्यामुळें या युरोपियन राष्ट्रांच्या सांस्कृतिक इतिहासाची छाननी करणें अधिक आवश्यक आहे.

अति प्राचीनकाळीं, येशूख्रिस्ताच्याहि पूर्वीं युरोपमध्यें ग्रीकद्वीपकल्पांतील हेलेनिक राष्ट्रानें मनुष्य जातीच्या सांस्कृतिक उत्कर्षाच्या बाबतींत बरीच आघाडी मारली होती. समाजरचना, राज्यघटना, आर्थिक व्यवस्था, कुटुंबसंस्था व सर्वसामान्य जीवनपद्धति यांच्या अद्यावत् सुधारलेल्या प्रकारची वाढ करून, ज्ञान आणि सामर्थ्य यांच्या प्राप्तींत त्यांनीं बरेंच मोठें यश संपादन केलें. ग्रीक लोकांच्या क्षात्रवृत्ति, ज्ञानलालसा व स्वातंत्र्य–प्रियता या गुणांना-

पोषक अशी लहान लहान नागर राज्यें, **थीब्स स्पार्टा** व **आथेन्स**-येथें स्थापन होऊन त्यांनीं आपली सर्वांगीण उन्नति करून घेतली. कालाच्या अज्ञात उदरांत ज्यांचीं नांवें गडप झालीं आहेत अशा शेंकडो महात्म्यांचे प्रयत्न त्यांच्या उत्कर्षाला प्रेरक झाले. ज्यांचीं नांवें इतिहासानें प्रगट करून अजरामर केली अशा तत्त्ववेत्त्यांत **सॉक्रेटिस, प्लेटो** व **अरिस्टॉटल** हीं नांवें ग्रीस अगर युरोप यांसच नव्हे तर साऱ्या जगाला भूषणावह अशीं आहेत. भौतिक सुधारणेनें सामर्थ्य-संपन्न व वैभवशाली होणाऱ्या ग्रीक राष्ट्राला चारित्र्य आणि नीति यांचा आदेश देणारा सॉक्रेटीस नीतिशास्त्राच्या मागें असलेली उदात्त तत्त्वज्ञानाची भूमिका समजावून देऊन उत्कृष्ट समाजरचना व श्रेष्ठ जीवितध्येय यांचे आदर्श ग्रीक जनतेसमोर ठेवणारा प्लेटो व कल्प-नेच्या राज्यांत गुंग न होतां उघड्या डोळ्यानें जगाकडे पाहून निसर्गाचें व मानवी जीविताचें शास्त्रीय पृथक्करण करणारा व भौतिक-वादाच्या पायावर ज्ञानसामर्थ्यानें संपन्न होऊन वैभवशाली समाज-विकास करण्याचा धडा **ॲलेक्झँडर** सारख्या वीरश्रेष्ठाला शिकविणारा ॲरिस्टॉटल हेंच आजच्या युरोपियन संस्कृतीचा पाया रचणारे होत. **आनॅक्सॉगॉरस, पॅथॅगॉरस** सारखे तत्त्ववेत्ते, **होमर, सोफॉक्लीस, युरिपाइड्स** सारखे वाङ्मय–कलावंत, **पेरिक्लीस** सारखे सेनापति व **डेमॉस्थिनीस** सारखे वक्ते याशिवाय शेंकडों शिल्पकार, कलावंत, शास्त्रज्ञ व राज्यकार्य धुरंधर यांना जन्म देऊन ग्रीसची भूमि पावन झाली. या महात्म्यांनीं जानपदांच्या असत् प्रवृत्तींशीं झगडून व वेळ-प्रसंगीं सॉक्रेटीस सारख्या नररत्नांचा बळी देऊन जानपद संस्कृतीवर विजय मिळविला व ग्रीकराष्ट्राला रानटीपणांतून वर काढून संस्कृतीच्या उच्च आसनावर विराजमान केलें. शाक्तसंस्कृतीच्या बाल्यावस्थेंत असलेले स्पार्टाचें राज्य, व्यक्तिश्रेष्ठत्व, उत्कृष्ट आर्थिक राजकीय

समाज–संघटना, शिस्त, क्षात्रवृत्ति व कर्तव्यनिष्ठा याचें उत्तम उदाहरण दाखवितें. तसेंच जानपदांच्या प्रवृत्तींचें प्राबल्य न होऊं देतां वीर पुरुषांच्या नि माहात्म्यांच्या आशीर्वादानें कांहीं काळ यशस्वी होणाऱ्या लोकशाहीचें स्वरूप अॅथेन्सनें प्रगट केलें. अर्थात् ही सर्व प्रशंसा करतांना हें लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं कोणत्याहि घटनेचे मूल्यमापन करतांना इतिहासकार तत्कालीन पार्श्वभूमीवर त्याचें चित्र काढून इतरांच्या तुलनेनेंच त्याचें मूल्यमापन करीत असतो. या दृष्टीनें ग्रीसची तत्कालीन श्रेष्ठता मर्यादित अर्थानें ध्यानांत घेतली पाहिजे. जोंपर्यंत ग्रीसचा बहुजन समाज प्रभावपूजक व ज्ञान-जिज्ञासू असा होता व त्यांच्या सर्व जानपद मनोवृत्तीवर त्यांच्यांतील थोर पुरुषांना सहजासहजी नियंत्रण ठेवतां आलें तों वरच हा संस्कृति विकास चालू राहिला. पुढें मात्र लौकरच ही स्थिति पालटली. स्पार्टाचें राज्य आपल्या अंतर्गत दोषानें कोलमडून पडलें. रशियानें स्थापिलेल्या आर्थिक-समानतापूर्ण व अर्थ-प्रधान, सर्व सत्ताधीश संघ राज्याप्रमाणें स्वयंपूर्ण व संघटित तत् सदृश राज्यव्यवस्था असलेलें स्पार्टाचें राज्य व्यक्तींच्या बुद्धि विकासाची सोय नसल्यानें व जगण्या पलीकडे मनुष्य मात्राला कांही अधिक ध्येय असतें याचें पुरेसें ज्ञान न होऊं शकल्यामुळें जंग चढून मातीमोल होणाऱ्या लोखंडी हत्या-राप्रमाणें त्याच्या शक्तीची धार लौकरच बोथट झाली. भौतिकतेच्या जड कल्पनांनी भारलें गेल्यानें सुखी नि समर्थ जीवनाचा अत्यंत संकु-चित अर्थ घेऊन जीवन जगण्याचा परिणाम स्पार्टन समाजाला भोगावा लागला. कसल्याहि तत्वज्ञानाची भूमिका नसतांना ध्येयहिन असलेल्या व्यक्तीला व समाजाला स्वयंपूर्णत्वाच्या कल्पना-भासांत रुक्ष जविन जगविणाऱ्या संघटनेच्या चौकटींत गुदमरून क्षीण व्हावें लागलें. उत्क्रांतीचें शेवटलें शिखर जाणण्याची जिज्ञासा, मानवी जीवनाचें

रहस्य जाणण्याची उत्सुकता, ज्ञान लालसा, जडभौतिकतेच्या पलीकडे जाऊन व्यक्तित्वाचा कलात्मक, रसात्मक नि आनंदमय आविष्कार करून भौतिक सुख विलासानें नव्हे तर कर्तव्याचा मार्ग उत्साह दायक व सुखकारी करीत करीत उन्नतीची सतत प्रेरणा करणारी संस्कृति अस्तित्वांत आणण्याची अपात्रता, या सर्व अपूर्णत्वामुळें विकास अथवा उत्क्रांति याची ओढ न लागतां जीवन आणि शक्ति, शक्ति आणि जीवन या दोन बिंदूंच्या मध्यें संघटनेच्या केंद्रावर अधिष्ठित झालेली स्पार्टन-संस्कृति तेथल्या तेथेंच फिरत राहिली व शेवटीं सुकून, कुजून व जीर्ण होऊन खालीं कोसळणाऱ्या निष्फळ, निष्पर्ण, भोंड्या वृक्षा प्रमाणें उन्मळून पडली. याच्या उलट अगोदरच लोकशाहीच्या निर्बल पायावर उभे असलेले अथेनियन राज्य, थोर पुरुषांची नियंत्रक शक्ति, जानपद-संस्कृतीच्या उठावानें क्षीण होऊन बाजूला सरकताच व्यक्ति स्वातंत्र्याच्या विकृतीनें समाज-संघटना सैल पडून मन स्वातंत्र्याच्या विकृतीनें बौद्धिक अराजकता माजवून व फाजील तत्त्वचिंतनानें निष्क्रियता, वैभवानें विलासी दुर्बलता, फाजील अभिमानानें दंभ, आलस्य, अंधश्रद्धा नि लोकशाहीच्या गलबल्यांत असहाय्यता शिस्त आनि संघटनेचा अभाव, लष्करी सामर्थ्याचा लय आत्मनिष्ठा व भोग परायण वृत्तीनें झालेला व्यक्तिसंकोच ही प्राप्त होऊन जानपद संस्कृतीच्या आहारी गेल्यानें दुर्गतीला जाऊन पोहोंचलें. पायाचा आधार नैसर्गिक दुर्बलतेनें अथवा बाह्य आघातानें भग्न विदीर्ण होऊं लागल्यावर तात्पुरती डागडुजी करून एकावर एक सुंदर व कलापूर्ण मजले चढवून सुशोभित केलेल्या इमारतीच्या कोसळणाऱ्या भिंती सांवरतां येत नाहींत. त्या प्रमाणेंच भौतिक सामर्थ्य नि त्याला धारण करणाऱ्या समर्थ व्यक्तींचा संघटित समाज या पायाचें अधिष्ठान सुटल्याबरोबर अथेन्सच्या तत्त्व-प्रधान संस्कृतींत तात्काळ

विकृति निर्माण झाली. व जानपद संस्कृतीचा जोर होऊन अथेन्सचें राज्य मृत्यु पंथाला लागलें. आपल्या विस्तार वैभवानें डोलणारा वृक्ष फळांफुलांनी बहरला असतांना जमीनींत खोल गेलेल्या मुळ्या बुंध्या जवळची माती वाहून गेल्यावर उघड्या पडतात व जीवन पोषणाचें साधन मिळविण्याची शक्ति त्या मुळ्यांतून नाहींशी झाली कीं आकाशांतील उंच वातावरणांत आपल्या सौंदर्य-संपत्तीचें प्रदर्शन करणारा वृक्षाचा वरचा संभार जास्त टिकाव न धरतां लौकरच निस्तेज व निरस होऊन अधःपतित होतो. अथेन्सच्या शेवटच्या काळांत वाङ्मय विहार, कला-विलास, व तत्त्वोपदेश यांना इतका ऊत आला कीं, शेवटी त्याची सर्व शक्ति त्यांतच वाहून गेली. स्पार्टाचें राज्य वाढ खुंटलेल्या निष्पर्ण, निष्फळ व नीरस भोंड्या वृक्षा प्रमाणें तर अथेन्सची अवस्था जीवनाधार तुटल्यावर वर वर वाढूं पहाणाऱ्या अल्पजीवी वृक्षाप्रमाणें दोघेहि आपल्या अपूर्णत्वानें विनाशाकडे गेले. दोघांपैकीं एकांतहि शाक्त-संस्कृति निर्माण करण्याचें सामर्थ्य नाही असें पाहून ग्रीसच्या श्रेष्ठत्वाचा वारसा हक्कानें आपणांकडे घेणाऱ्या मॅसिडोनियांत ॲरिस्टॉटलचा कर्तबगार शिष्य **अलेक्झँडर** उदयाला आला व शाक्त-संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेचें उत्कृष्ट स्वरूप प्रगट करण्याचा त्यानें चंग बांधला व ग्रीस पुन्हां एकछत्री झाला व नवोदित बालकाला लागलेल्या विकासौधाप्रमाणें प्रसाराची ओढ लागलेलें ग्रीकराष्ट्र ज्ञान आणि सामर्थ्य याचा संदेश घेऊन जग पादाक्रांत करीत धरणाचा बांध फोडून चौफेर पसरणाऱ्या जलौदधिप्रमाणें, जगांत संचार करूं लागलें. ग्रीकराष्ट्रापासून जगाला शिकण्यासारखें पुष्कळच होतें. भरतखंडांत आल्यावर मात्र दुसऱ्या एखाद्या शाक्तसंस्कृतीशीं त्यांना सन्मुख व्हावें लागलें तत्कालीन आर्य-ग्रीक-संस्कृतीचा संघर्ष व त्याचें परस्पर देवाण घेवाण याचा इतिहास

सूक्ष्म अध्ययनानें बराच उद्बोधक होण्यासारखा आहे. पण अले-क्झँडरच्या मृत्युनंतर या नवोदित शाक्त-संस्कृतीला धारण करण्याचें सामर्थ्य ग्रीक जनतेंत न राहून जानपद-संस्कृतीनें पलट खाल्ली व रोमन आक्रमणापूर्वी दिसून येणारी परागत अवस्था ग्रीसला प्राप्त झाली. मनुष्याच्या सुसंगत समाजीकरणाचें व समाज विकासाचें प्रचंड कार्य यापुढें टायबर नदीच्या कांठीं सात टेंकड्यावर वस-लेल्या रोमने करून दाखविले. निर्भेळ भौतिकवादावर आधारलेल्या विशिष्ट रोमन पद्धतींत रोमन व्यक्तित्वाचा बराच विकास झाला व शिल्प-कला, काव्य, लष्करी सामर्थ्य, शिस्त, संघटन, रेखीव समाजरचना, व उच्चदर्जाचें कौटुंबिक जीवन इत्यादि गुणांनींयुक्त असलेली रोमन संस्कृति रोमच्या प्रचंड राजकीय उन्नतीला कारणीभूत झाली. राज्यघटना-शास्त्र व नियम निर्बंध-शास्त्र यांचा जागतिक पाया रोमनेंच घालून दिला. **रोम्युलस** पासून ते **जुलीयस सीझर** पर्यंत शेंकडों वीर पुरुषांनीं आपल्या अलौकिक प्रभावानें जानपदांना संघटित करून आपल्या मागें खेंचीत नेलें. समुद्राची राणी आणि अर्ध्या युरोपची धनीण बनलेली रोमन राजसत्ता रोमन लोकांच्या सर्वांगीण उत्कर्षाचें कार्य यशस्वितेनें अनेक शतकापर्यंत करीत राहिली. शाक्त-संस्कृतीचीं पूर्व चिन्हें ठळकपणें नि व्यापक प्रमाणावर रोममध्यें दिसून येतात. जीव-नाच्या बाह्यांगविकासाच्या बाबतींत रोमनें तत्कालीन मानवाला साध्य असलेलें शेवटचें शिखर गांठलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण ग्रीक लोकांपासून घेतलेली तत्वज्ञानाची स्फूर्ति लौकरच आटली व रोमच्या सामर्थ्यशाली व चारित्र्यसंपन्न वैभवात्मक-राजकीय जीवनांत ज्ञानाचें साहारा वाळवंटच दिसूं लागलें. ज्ञान आणि सामर्थ्य यांची फारकत झाल्याबरोबर जीवनाच्या

अंतरंगांतील सुप्त शक्तीचा पाठिंबा नाहींसा झाला व स्पार्टन् लोकाप्रमाणें संघजीवनाचा विनाश व्यक्ति जीवनाच्या संकोचामुळें द्रुत गतीनें घडूं लागला. वीर श्रेष्ठांच्या शक्तीचा प्रभाव, जानपदांच्या अधःप्रवृत्तीचा जोर होऊन निस्तेज व मंद झाला, **ज्युलियस सीझर** सारख्या नर श्रेष्ठाचा बळी होऊन रक्तपिपासा जागृत झालेलें जानपदाच्या पाशवी प्रवृत्तींचें पिशाच्च रोमन संस्कृतीच्या तटबंदीला खिळखिळें करून रोमन नागरिकाच्या जीवन-श्रेष्ठतेचा नाश करीत सुटलें व शाक्त-संस्कृतीचें अंकुर बाल्यावस्थेंतच जानपद-संस्कृतीच्या भडक्यानें होरपळून निघाल्यामुळें रोमचा पराक्रम, त्याचें भौतिक सामर्थ्य व त्यांची सुधारणेची उच्चता यांच्या ऐवजीं क्रौर्य, भौतिक वादाची धुंदी व अतिपक्व होऊन नासणाऱ्या फळांप्रमाणें आलेली अवनत दशा, या विकृतींचा प्रकर्ष झाला आणि जगाच्या धकाधकींत जगून श्रेष्ठत्वाकडे धांव घेणें रोमला शक्य झालें नाही. खुद्द रोमन तटबंदीच्या आंत गतानुगतिक संस्कृतिहीन, मोहांध, अंतःकुष्टपीडित दुर्बल जानपदांचे अधिराज्य झाल्याबरोबर उत्तरेकडून टोळझाडी प्रमाणें हजारोंच्या संख्येंत आक्रमक झडप घालणाऱ्या **गॉथ** जानपदांच्या सर्वनाशक हल्ल्याला रोमन साम्राज्य बळी पडलें. अंतिम विनाशाच्या पूर्वी रोमनें साम्राज्यशाहीच्या प्रथमार्धांत वाणिज्यक नि जानपद या दोन्ही अवस्थांतून भ्रमण केलें होतें. रोमन नागरिकांना कर्तव्यस्फूर्ति देणारा कलाविलास व काव्य-वाङ्मय जीवन विकासाच्या सर्व कार्यास त्यांना प्रेरक होणारा त्यांचा पौराणिक सांप्रदाय, सुसंगत संघटना निर्माण करणारे त्यांचे घटनाशास्त्र व निर्बंध-शास्त्र, त्यांची स्वातंत्र्य-प्रियता व पराक्रम या सर्वांची विकृति होऊन गळ्यांत घातलेल्या पुष्प मालांची फांशी बसावी तशी त्यांची अवस्था झाली. रोमच्या विनाशास सर्वस्वी कारणीभूत त्यांची भोगविलास-प्रियता व अज्ञानी, क्रूर व **ध्येयहीन**

जानपदांचें प्राबल्य हीच झाली. ख्रिस्ती धर्माच्या उदयानंतरहि कांहीं काळपर्यंत रोम व **कांस्टंटिनोपल** या दोन्ही ठिकाणीं दोन रोमन-साम्राज्य-शाखा जीव धरून राहिल्या पण त्या प्राचीन अभिजात रोमन सत्तेच्या केवळ छाया होत्या. ख्रिस्ती सांप्रदायानें त्याग, निवृत्ति, लघुता, दौर्बल्य इत्यादि विकारांचे दैवीकरण करून सबंध युरोपभर आपल्या मोहांधकाराचें विस्तीर्ण राज्य प्रस्थापित केलें व सातव्या आठव्या शतकापासून तों थेट १५ व्या शतकाच्या उत्तरार्धा पर्यंत मध्ययुगीन युरोपनें अज्ञानाच्या अंध:कारांत स्वाभाविक शक्तिक्षयानंतर आलेल्या ग्लानीप्रमाणें इतिहासांतील एक दीर्घकालीन निद्रा अनुभविली. या काळांत राजघराण्यांच्या आपसांतील लढाया, बुभुक्षित जानपदांनीं केलेल्या बंडाळ्या, उदरंभरणा करतां केलेली राजकीय लूटमार, साम्राज्य विस्तार, धर्म आणि राजसत्ता, क्षात्र-वर्ग आणि वैश्यवृत्ति यांचे परस्पर कलह, यांची इतकी खिचडी झाली आहे कीं त्यांतून परागतीच्या सूत्राशिवाय दुसरें कसलेंहि तत्त्व इतिहासकाराला शोधून काढतां येणें शक्य नाही. याच कालांत स्पेनचें पारतंत्र्य, **हूण** व मंगोलियन टोळ्यांची युरोप वरील आक्रमणें व क्रुसेडच्या नांवाखालीं अंधश्रद्धेनें युरोपियन जानपदांतील बाजार बुणग्यांनी केलेल्या व्यापक लढाया या ठळक राजकीय घटना घडून आल्या व या सर्वांतून युरोपची राजकीय नि लष्करी दुर्बलता जगाच्या प्रत्ययास आली. तत्कालीन युरोपची असुसंस्कृत व अज्ञानावस्था स्वतः युरोपच्या प्रत्ययास येण्याकरितां एका प्रचंड नि युगप्रवर्तक क्रांतीची आवश्यकता होती. तुर्कांनी कॉन्स्टांटिनोपल जिंकून पौर्वात्य रोमन साम्राज्याचा शेवटचा बालेकिल्ला जमीनदोस्त केल्याबरोबर ग्रीक संस्कृतीचा तेजस्वी ठेवा जतन करून ठेवणारे विद्वन्मडळ असंरक्षित होऊन युरोपभर पसरलें व त्यांच्या प्रयत्नानें साऱ्या युरोप खंडांत

प्राचीन विद्यांचें पुनरुज्जीवन (रेनेसान्स) करण्याची एक मोठी मोहीम सुरू झाली. खिस्तपूर्व युगांतील ही तेजस्वी दैवी संपत्ति पाहून युरोपियन राष्ट्रांचें डोळे दिपलें व जीवनाचें रहस्य नि सामर्थ्याची गुरुकिल्ली हाती लागलेली युरोपियन राष्ट्रें यक्षिणीची कांडी फिरल्याबरोबर मध्य युगांतील अंध:काराचा अंत करून अर्वाचीन युगाच्या सुप्रभात समयीं नवी तुष्टी, नवी पुष्टी, व नवें जीवन प्राप्त करून घेण्यासाठीं उत्क्रांतीच्या पायरीवर उभे राहिले. या नंतर लौकरच **मार्टिनल्यूथ**च्या प्रयत्नानें धर्म सुधारणेची (रेफरमिशन) अद्भुत क्रांति घडून आली. या दोन्ही चळवळींचें श्रेय रोमच्या धर्म-सत्ते विरुद्ध निधड्या छातीनें झुंज घेणारे वीराग्रणि सत्य सांगण्यासाठी स्वत:ला जिवंत जाळून घेणारे हजारो हुतात्मे व प्राचीन **ग्रीक** पंडितांची पूर्व पुण्याई यांनाच द्यावें लागेल. जानपदांच्या स्थितिस्थापक स्थिरत्व प्रधान नि अवनतिकारक तमोगुणी सर्वंकश मायाजाला विरुद्ध मनुष्याच्या रजोगुणानें विकास नि सामर्थ्य-इच्छेच्या आकांक्षेनें केलेलें अद्भुतरम्य बंड या दृष्टीनें या दोन्ही चळवळींचा समग्र इतिहास अभ्यासानें फार उपयुक्त होईल. भूत कालीन इतिहासाच्या अनुभवानें शहाणे होऊन ग्रीकांचा ज्ञानदीप हाती घेऊन सामर्थ्यदायक भौतिक वादाच्या सहाय्यानें युरोपियन लोक जों जों भवितव्यतेचा मार्ग आक्रमूं लागलें, तों तों वैभव, सुख समृद्धि, सपत्ति व साम्राज्य-सत्ता यांच्या युरोपवर वर्षाव होऊं लागला. चारित्र्य आणि शील यांच्या सहाय्यानें ज्ञान आणि सामर्थ्य यांची सांगड घालण्याचें कठिण कार्य साधण्यापूर्वी युरोपला आपल्या सामाजिक, राजकीय नि आर्थिक विकासाच्या मार्गावर पुष्कळच ठेंचा खावयाच्या होत्या. अठराव्या शतकाच्या शेवटी जानपदांच्या अंतर्गत कलहाचा विकोप होऊन सत्ता, ऐश्वर्य नि सुखसाधनें यांचें केंद्रिकरण एका विशिष्ठ वर्गाच्या हातांत व दारिद्र्य

दैन्यावस्था व सांस्कृतिक हीनता ही बहुजन समाजाच्या वांट्यास अशी स्थिति फ्रान्समध्यें निर्माण झाली व भयानक रक्तपातानें आपली आसुरी तहान भागविणारी फ्रेंच राज्यक्रांती आपल्या अमानुष चमत्कारांसह प्रकट झाली. समाजाच्या भौतिक विकासाला प्राप्त झालेलें भौतिक विलासाचें विकृत स्वरूप, समाज संघटनेला राजसत्तेच्या स्वरूपांत सत्ताधाऱ्यांच्या स्वार्थी उपभोगपरायणतेचें साधन बनण्याचें दुर्भाग्य, धर्माच्या नांवाखालीं व्यक्ति स्वातंत्र्याची झालेली गळचेपी या योगें दारिद्र्याच्या कोंदट वातावरणांत फ्रेंच जनतेचें व्यक्तिगत-जीवन गुदमरण्याची वेळ आली व हताश व बेभान होऊन हात-पाय झाडीत सैरावैरा पळणाऱ्या रानडुकराप्रमाणें समाजाची अवस्था होऊन स्थिरत्व, सहनशीलता व दुर्बलता यांनीं पक्के केलेले बांध फुटतांक्षणींच समाजाची सुप्त पाशवी वृत्ति जागृत झाली व तिनें आपलें रक्तपिपासु भेसूर स्वरूप व्यापक प्रमाणांत प्रगट केलें. राज्य-क्रांतींतील काळभैरवाचें (Reign of Terror) राज्य जगाच्या स्मृतींत अजरामर होऊन गेलें. खून, जाळपोळ, लूटमार, सरसकट कत्तली, रक्तपाताचें बीभत्स पाशवी प्रकार व रक्ताची तहान लाग-लेल्या क्रांतिकारक स्त्रियांच्या अंत:करणांतील असत्प्रवृत्तीचें हिडिस स्वरूप यांचें मोकाट प्रदर्शन फ्रेंच जनतेनें करून दाखविलें. काय करावें हें न सुचल्यामुळें व सामर्थ्याला ज्ञानाचा उजाळा नसल्यामुळें रजोगुणाची स्फूर्ति मावळून तमोगुणाचें तांडवनृत्य कसें सुरू होतें याचें प्रत्यंतर म्हणजे फ्रेंच-राज्य-क्रांति ! जानपदांच्या पाशवी प्रवृत्तींचा सैतान देशांतील अंतर्गत रक्तपाताने शांत झाल्याबरोबर त्यानें आपली दृष्टि फ्रांसच्या बाहेर वळविली. क्रांतीचें सामर्थ्य हातीं घेऊन जगावर आपल्या संहार-सामर्थ्याची अग्नि-वृष्टि करणाऱ्या जानपदाच्या अंगी ज्ञान, चारित्र्य आदि व्यक्ति-विकासाची बहुमोल साधनें श्रेष्ठ

व्यक्तित्वाचें पाठबळ व शाक्त-संस्कृतीच्या ध्येय-दर्शनानें पुनीत झालेल्या महान् वीरश्रेष्ठाचें नियंत्रक नेतृत्व हे असल्याशिवाय केवळ पाशवी सामर्थ्याच्या परिस्फोटानें जानपदांची उन्नति होऊं शकत नाहीं हें फ्रेंच राज्यक्रांतीनें जगाला शिकविलें. जें काय घडलें तें जानपद संस्कृतीच्या अंतर्गत दोष कलहामुळेंच व त्यांतून जें निर्माण झालें तें सुद्धां जानपद संस्कृतीच्या रौद्र स्वरूपाचेंच प्रदर्शन व्यक्ति-स्वातंत्र्य, राजकीय समानता, लोकशाही व राजकीय स्वातंत्र्य इत्यादि सोज्वळ भावनांचें आदर्श जानपदांच्या दृष्टीसमोर असूनहि या सर्वांचें विकृत स्वरूपच त्यांच्या अंत:करणांत बिंबलें व लोकशाहीच्या नांवाखालीं सामुदायिक कत्तली, व्यक्ति स्वातंत्र्याच्या नांवाखालीं व्यक्ति जीवनाची गळचेपी व अंदाधुंद अराजकता, समानतेच्या नांवाखाली केलेली लूटमार व जाळपोळ व स्वातंत्र्याच्या नांवाखालीं हजारों स्वतंत्र स्त्री-पुरुषांचा शिरच्छेद करून गिलोटीनच्या थारोळ्यांतून वाहविलेले निष्पाप रक्त यांचा इतिहास अजून लोकांच्या स्मरणांतून गेला नाहीं. Oh, liberty what, crimes are committed in thy name" ही असहाय्य अबलेनें आर्त कारुण्यानें मारलेली हांक अजूनहि स्वातंत्र्य देवतेच्या कानांत घुमत असली पाहिजे ! याच सुमाराला युग प्रवर्तक महात्म्या प्रमाणें आपल्या अलौकिक सामर्थ्यानें उसळणाऱ्या समुद्राला अडकवून धरण बांधणारा, अरण्यांतल्या वणव्यांतील अग्निडोंबाला आटोक्यांत आणून आपल्या ध्येय मार्गावरील दीपस्तंभ उजळणारा, शक्तीच्या कराल-रूप-दर्शनानें धुंद होऊन वेड लागलेल्या जनतेला, त्याहि पेक्षां मोठ्या शक्तीचें नियंत्रण वापरून आपल्या समोर नमविणारा व बेभान, गैरशिस्त, अत्याचारी फ्रेंच जनतेला सुसंघटित, सामर्थ्योपासक, प्रागतिक समाजाच्या स्वरूपांत पुढें आणणारा एक जादुगार **नेपोलियनच्या** रूपानें पुढें सरसा-

वला. साऱ्या जगाला भीति देणारा वडवानल आपल्या मुठींत घेऊन त्यानें **फ्रान्सच्या** संघटनेला प्रारंभ केला व लौकरच अल्पांशात्मक पण विकसनशील शाक्त-संस्कृतीचें त्याचें ध्येय मूर्त स्वरूपांत प्रकटविण्याचें कार्य आरंभिलें. पण त्याच्या कार्याच्या आरंभ-कालांतच हा भविष्य-कालीन शाक्त-संस्कृतीचा दूत-वाहक आपला नाश केल्याशिवाय राहणार नाही हें तत्कालीन वाणिज्य नि जानपद राष्ट्रांना जाणवतांच **नेपोलियनच्या** अलौकिक प्रभावानें दिपून आपली विरोधाची प्रतिगामी वृत्ति तात्पुरती विसरून त्याच्या कार्याशीं एकरूप होऊन गेलेल्या फ्रेंच-जानपदाला जें करतां आलें नाही तें संयुक्त शक्तीनें करण्याकरतां **रशिया, आस्ट्रिया** व **इंग्लंड** यांनी युरोपांतील इतर लघुराष्ट्राच्या सहाय्यानें करण्याचें ठरविलें. जवळजवळ वीस वर्षेपर्यंत घनघोर संग्राम होऊन नेपोलियनला चौफेर उसळलेल्या शत्रुसैन्याच्या संख्याबाहुल्यापुढें हार खावी लागली व विजयी झालेल्या दोस्तराष्ट्रांनी व्हिएन्नाच्या तहाचें जाळें विणून फ्रान्समध्यें जन्मलेल्या स्वातंत्र्यदेवतेस आपल्या कुटिल राजनीतीनें गळफांस लावला. अर्वाचीन युरोपच्या इतिहासांतील शाक्तसंस्कृतीचा रंग असलेली राष्ट्रविकासाची एक महान् चळवळ युरोपांतील जानपदांच्या प्रतिगामी शक्तीनें हाणून पाडिली व सांस्कृतिक दृष्ट्या युरोपची पिछेहाट झाली. व्हिएन्नाच्या तहांत असलेलीं विनाशाचीं बीजें लौकरच अंकुरित झालीं व दोस्तराष्ट्रांची मैत्री क्षणिक ठरून पुन्हां परस्पर कलह, कुटिल डांवपेंच व बेबंदशाही विजयीराष्ट्रांच्या जानपदांत थैमान घालूं लागली. नेपोलियनकालीन चळवळीच्या स्फूर्तीचा अंश इटली व जर्मनी यांत प्रभावी ठरला व १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत युरोपमध्यें राष्ट्रवादाचें नैसर्गिक, प्रागतिक व हितकारी राजकीय तत्त्व प्रामुख्यानें प्रस्थापित झालें. इटली व जर्मनी यांच्या

राष्ट्रीय स्वातंत्र्याचा इतिहास स्फूर्तिदायक आहे. विशेषतः जर्मनींत अनेक मोठमोठ्या तत्त्ववेत्यांच्या जगद्व्यापी ज्ञानाची स्फूर्ति घेऊन **प्रिन्स बिस्मार्कनें** नवी समाजघटना, नवें राज्ययंत्र व प्रशियन-संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाचा व प्रसाराचा पाया घातला. त्याच्या Iron व Blood या राजकीय धोरणानें जर्मनीच्या लढाऊ संघटनेबरोबर विकसनशील परराष्ट्रीय राजकारणाचा जर्मनींत उदय झाला. कडक शिस्तीवर आधारलेल्या एकसूत्री समाज-संघटनेमुळें समर्थ व्यक्तींचा समाज असें स्वरूप जर्मनीला प्राप्त झालें. कला, वाङ्मय, भौतिक-शास्त्रें व तत्त्वज्ञान यांचें संवर्धन होऊन शिक्षण-पद्धति, कुटुंब-पद्धति व सामाजिक विचारपरंपरा यांच्या उत्कृष्टतेमुळें जर्मन-नागरिकाच्या चारित्र्याचा परिपोष व शीलाचें संवर्धन घडून आलें. ज्ञान-विकास व सामर्थ्यसंपन्नता या योगें जर्मनराष्ट्र सुधारणा, संस्कृति, विद्या व लढाऊ राजकारण या सर्व बाबतींत युरोपांतच नव्हे तर जगांत अग्रेसर झालें. **शोपेनहोअर** याचें Will to Power व **नीत्शेचें** Superman हे तात्त्विक आदर्श जर्मनीला मनुष्यजातीच्या अंतिम जीवन-ध्येयाच्या ध्रुवताऱ्याप्रमाणें मार्ग-दर्शक झालें. जगांत अतिमानव निर्माण करण्याकरितां व गीर्वाण-संस्कृतीला जन्म देण्याकरितां ज्या शाक्तसंस्कृतिसंपन्न राष्ट्राची आवश्यकता असते तसलें राष्ट्र जर्मनीनें बनावें अशी योजना जर्मनीनें दोनवार करून पाहिली पण हेरेनफोल्क व लेबेनस्राम या कल्पनांचें नुसतें नांव ऐकलें कीं युगानुयुगाचें वैर आठवून अंगांतील रक्त सळसळावें तशी जगांतील वाणिज्य-राष्ट्रांची अवस्था होते व जानपदराष्ट्रांची तर भीतीनें पांचावर धारण बसून केविलवाण्या नजरेनें या संकटापासून आपलें संरक्षण करण्याकरितां वाणिज्य राष्ट्रांची याचना करूं लागतात. यांतूनच जर्मनीच्या जगद्विरोधाची लाट पहिल्या महायुद्धांत व

नंतर दुसऱ्या महायुद्धांत जगभर उसळली. जर्मनीच्या दृष्टीनें पहिल्या प्रयत्नापेक्षां दुसरा प्रयत्न सशास्त्र संस्कृति-विकासाचा होता पण जर्मनीच्या पराभवामुळें व त्याहिपेक्षां जास्त जर्मन-संस्कृतींच्या विध्वंसनामुळे मानवी प्रगतीची पिछेहाट होण्याचा प्रसंग आला आहे. फ्रान्सची अवस्था अथेन्सच्या शेवटच्या लोकशाहीसारखी तर रशियाची अवस्था स्पार्टाची सुधारून काढलेली आवृत्ति समजण्यासारखी. इंग्लंड अमेरिकेचें राजकीय धोरण व सांकृतिक दर्जा मध्ययुगीन साम्राज्याच्या फारसा पुढें गेला नाही. केवळ भौतिक सुधारणेच्या दृष्टीनें एखादें राष्ट्र अत्यंत प्रगत दिसत असलें तरी त्याचें सांस्कृतिक श्रेष्ठत्व त्यावरून निर्णायक रीत्या ठरत नाहीं. केवळ ऐश्वर्य आणि भौतिक सामर्थ्य याच्या बळावर जीवनाच्या बाह्यांगांचा वाटेल तितका विकास करून खरें श्रेष्ठत्व प्राप्त करून घेण्याची इच्छा करणें म्हणजे पुराणकालीन दैत्यांच्या मार्गांचेंच अनुकरण करणें होय. अनेक विकारांच्या प्राबल्यानें मनुष्यमात्राचें व्यक्तित्व पोखरलें गेल्यावर त्याच्या हातीं असलेल्या सत्ता आणि ऐश्वर्य यानें त्याचा उद्धार होऊं शकत नाहीं तद्वतच जानपदांच्या असत्प्रवृत्तींच्या प्राबल्याने ज्या समाजाची संघटना पोखरली गेली तो समाज अंतर्गत जीवनकलह व आंतरराष्ट्रीय स्पर्धा याच्या कचाट्यांत सांपडून मनुष्यजातीच्या सर्वांगीण उन्नतीचें कार्य पुढें चालविण्यास लौकरच अपात्र ठरतो. निष्पर्ण कांटेरी बुभुक्षित वृक्षावर एकहि पक्षी विश्रांतिसाठीं येऊन बसत नाहीं अथवा एकही अभागी श्रांत पांथस्थाला आपल्या छायेखालीं क्षणाचेंहि विश्रांतिसुख देण्याचें पुण्य त्याला लाभत नाहीं, अशा वृक्षाची अखेर लांकूडतोड्याच्या कुऱ्हाडीनेंच व्हावयाची व अग्नीचें भक्षस्थान बनणें हीच त्याची अंतिम परिणति. त्याप्रमाणेंच ध्येयहीन पाश्चिमात्य भौतिक

सुधारणेची अवस्था झाली आहे. अद्भुत भौतिक सामर्थ्य हातीं आहे पण तें धारण करण्याची शक्ति नाहीं. वाघाच्या पाठीवर बसून प्रवास करणाऱ्या मक्षिके प्रमाणें सकृत् दर्शनी भौतिक सामर्थ्याच्या शिखरांवर आरूढ झालेली हीं राष्ट्रें स्वत: सामर्थ्याची धारणा करीत आहेत असें म्हणण्यापेक्षां तें सामर्थ्यच यांना वाहून नेत आहे असें म्हणणेंच जास्त सयुक्तिक होईल. भौतिक शास्त्रांचें अतिरिक्त ज्ञान होऊनहि त्या ज्ञानांत संयमाच्या अभावी संरक्षक शक्तिपेक्षां संहारक शक्तीचीं बीजें जास्त सांठविलीं जात आहेत. शिवाय चारित्र्यहीन नि शीलहीन माणसाचें ज्ञान कितपत हितावह होईल ही शंकाच आहे. "सा विद्या या विमुक्तये" या उक्तिप्रमाणें अखिल मानवजातीचें हित करीत व मानवतेचा सामर्थ्यशाली विकास करीत जीवनाचें रहस्य व अंतिम ध्येय याचें रूप-दर्शन घडवून आणील तेंच खरें ज्ञान. नाहीं तर नुसतें पतनाला गुरुत्वाकर्षण व वाहकतेला उद्धरण-शक्ति म्हटल्यानें शास्त्रज्ञानाचा खरा विकास होत नाहीं व केवळ एकाहून एक अधिक भयंकर अशी संहारक अस्त्रें तयार केल्यानें मानवाचें सामर्थ्य वाढत नाहीं. समाज-घटना व राज्यघटना यांतील कौशल्य, भौतिक सुधारणेनें जीवनाचें बाह्यांग अति-सुंदर शृंगारानें सजवून त्याचा विकास, सुलभता, संपत्ती, ऐश्वर्य व शास्त्रज्ञान, या सर्व गोष्टी नि:संशय श्रेष्ठ सुधारणा आहेत पण ह्यांवरून संस्कृतीची उच्चता निश्चित सिद्ध होत नाहीं. जीवनाचें तत्वज्ञान जितकें सत्याच्या अधिक जवळ, व्यक्ति ही सामर्थ्य व ज्ञान यांचें केंद्र बनून जीवनविकास व ध्येय प्राप्तीच्या मार्गावर जितकी अधिक प्रगत व ज्ञान, सामर्थ्य नि विकास यांची सांगड घालून त्यांत उत्पादकता आणणारी समाज-संघटना जितकी जास्त प्रगल्भ आणि कुटुंबसंस्था, जीवनपद्धति विचारपरंपरा नि व्यक्तींच्या आंतरिक निसर्गातील

प्रवृत्ति यांचें स्वरूप जितकें जास्त सोज्वळ तितकीच त्या देशाची संस्कृति अधिक उच्च म्हणतां येईल. नाहीतर सुधारणेच्या भव्य, सुंदर नि मोहक डोलाऱ्याभोंवतीं मायावी राजनीतीचें जाळें विणून आभासात्मक नैतिक मूल्यात्मक तत्त्वज्ञानाच्या स्फूर्तीनें व काल्पनिक ध्येयाच्या धुंदींत, समाजाला कार्यप्रवण व आत्माहुति-तत्पर करणें म्हणजे जीवनशक्तीचा क्षय झालेल्या रोग्यास रसायनादि कृत्रिम उपायानें जागविण्यासारखें होय. अशा समाजांतील व्यक्तिमात्राच्या अंत:करणांतील अंतिम स्वार्थत्यागाची तयारी व कर्तव्याकरितां देहार्पण करण्याची चढाओढ याला आत्महत्येच्या मनोवैकल्यात्मक रोगाचें स्वरूप प्राप्त होतें. भ्रम, बुद्धिभेद व मानसिक रोग यांवर आधारलेला पराक्रम अगर नागरिकांची कर्तव्यनिष्ठा तसेंच तत्त्वहीन नि ध्येय-हीन कार्यप्रणवता मानवी समाजाला खऱ्या उन्नतिकडे कधींहि नेऊं शकत नाहीं, अर्वाचीन युरोपची अवस्था अशीच झाली. समाजांतील अंतर्गत जीवन-कलहाला समाज-हितकारक वळण लावणें व आंतरराष्ट्रीय स्पर्धेत टिकाव धरण्याची शक्ति देशांत उत्पन्न करून विधायक कार्यक्रमानें देशांतील व्यक्ति मात्रांचा जीवन विकास घडून आणणें याचे दोन प्रयोग रशिया व जर्मनींत करण्यांत आले. जर्मनीच्या प्रयत्नाला शास्त्रशुद्ध तत्त्वज्ञानाची भूमिका असूनहि जानपद संस्कृतीपुढें त्याला हार खावी लागली व त्याच जानपद संस्कृतीचा आधार घेऊन रशियानें स्वत:ला टिकवून धरलें आहे पण रशियाचा हा विजय अगदींच क्षणिक व आभासात्मक असून 'मुले कुठार:' या न्यायानें स्वत:ची तात्त्विक भूमिका व ध्येय या दोहोंचा नाश करण्यास कारणीभूत झाला आहे.

जगांतील बहुतेक मानव वंशाचें उत्पत्तिस्थान समजला जाणारा विस्तीर्ण आशियाखंड आज पाश्चिमात्य राष्ट्रांचें केवळ कुरण

मात्र होऊन बसला आहे. ज्ञात इतिहासाच्या आरंभकालापासूनच प्राचीन भारतीयांचें एक उदाहरण सोडल्यास आशियाखंडांत जानपद संस्कृतीचें वर्चस्व पराकोटीला गेलेलें आढळून येतें. पामीरच्या पूर्वेकडे पसरत जाणाऱ्या मंगोलियन महावंशाने मानवी प्रगतीच्या जगद्व्यापी चळवळीत कसलीहि भर टाकिली नाही. मध्ययुगांतील श्वेतहूण, तैमूरलंगाच्या मंगोलियन टोळ्या व अर्वाचीन युगांतील चीनी जमाती, जगांत दुष्काळ, दुर्दैन्य आणि रोगराई यांचा फैलाव करणाऱ्या विषारी जंतूप्रमाणें जागतिक शांतता व मानवी प्रगती यांना मारक ठरल्या. जानपदांच्या सैतानी वासना मोकाट सुटल्या म्हणजे राजकीय क्षेत्रांत काय घडूं शकते याची हीं केवळ उदाहरणें होत. १९ व्या शतकाच्या शेवटीं जापाननें आपले अपवादभूत व चमत्कृतिपूर्ण उदाहरण जगासमोर प्रकट केलें. प्राचीन आर्यांच्या दैवी संस्कृतिपासून स्फूर्ति घेऊन ज्याची उभारणी झाली, अशा जापानी राष्ट्रीय संस्कृतीचा वारसा व पश्चिमेकडून आणलेली भौतिक वादाची संजीवनी या दोघांची अत्यंत कौशल्यानें संगति लावून जापाननें पन्नास वर्षांच्या आंत एक तेजस्वी व उदयोन्मुख शाक्तसंस्कृति अस्तित्वांत आणून दाखविली. पण जी गोष्ट जर्मनीची तीच जापानची. आशियांतील जानपदराष्ट्रांचा हीन प्रवृत्तिजन्य व आत्मघातकी विरोध व पाश्चिमात्य राष्ट्रांची रक्तपिपासु सूडभावना यांना बळी पडून जापानाचें राष्ट्रविकासाचें कार्य भग्न व विदीर्ण होऊन गेलें. जर्मनी व जापान यांच्या राजकीय पराभवाला कदाचित् इतिहासाच्या दृष्टीने विशेष महत्त्व रहाणार नाहीं पण या पराभवांतून त्यांच्या संस्कृति विध्वंसनाचा जो प्रसंग निर्माण झाला व जगाची जी हानी झाली त्यायोगें आपल्या दुष्कृत्याबद्दल जगांतील विजयी राष्ट्रांनाहि पश्चात्ताप करावा लागेल. White man's

burden व श्वेतवर्णीय श्रेष्ठत्व अशा व भ्रामक व अत्यंत अपमान-कारक तत्वांचें स्तोम माजवून जगांतील सर्व देशांतील कच्च्या मालाच्या बाजार पेठा काबीज करून व आपल्या भोगविलासाचे साधन अन्य-राष्ट्रीयांना बनवून राजकीय व आर्थिक पारतंत्र्याचें मायाजाळ आशियाटिक राष्ट्रांवर घट्ट बसविणाऱ्या पाश्चिमात्य राष्ट्रांच्या मगरमिठींतून आशियाटिक राष्ट्रांची सुटका करण्याचें सुख-स्वप्न आपल्याच मूढ कृतीनें नष्ट करणाऱ्या आशियाटिक जान-पदांना आपल्या आत्मघातकी दुष्कृत्याचें दुःख दीर्घकालपर्यंत भोगावें लागेल !

मध्यआशियांतील लुटारू व सुनी मंगोलियन टोळ्यांच्या सैतानी लीलांतून जानपदांच्या पाशवी वासनेचा आविष्कार झाला त्यांहून अधिक भयंकर, पद्धतशीर, दीर्घजीवि व दूरगामी चमत्कार अरबस्तानच्या वाळवंटांत प्रस्फुर्त होऊन आशिया, आफ्रिका व युरोप या त्रिखंडांत अनेक शतकां पर्यंत रक्तपात, जाळपोळ, लूटमार, संस्कृति-विध्वंसन व सर्वनाश यांचा वणवा भडकविणाऱ्या एका सेमेटिक संस्कृतीनें घडवून दाखविला. मनुष्याच्या नैसर्गिक पाशवीवृत्तींना उत्तेजन देऊन नाठाळ पशूचें श्रेष्ठ मानवांत रुपांतर करण्याऐवजीं त्याला हिंस्रश्वापदांचें स्वरूप देऊन लष्करी सामर्थ्य, धर्मवेड व समाज-संघटन यांच्या सहाय्यानें हजारों मानवांना जगांत जे जे काय चांगलें दिसेल त्याचा निःपात करीत व नाशाचा होळी पेटवीत त्रिखंडांत फिरविणारी त्यांची राजकीय नि सांप्रदायिक महत्त्वाकांक्षा जवळ जवळ एक हजार वर्षपर्यंत अर्ध्या जगावर प्रभुत्व गाजवीत होती ही मानवजातीच्या इतिहासाला अत्यंत लांच्छनास्पद गोष्ट आहे. स्पेनमध्यें मूर्सच्या स्वरूपांत ईजिप्तमधील **बदाऊनी शेख, मोरक्कन हबशी** अथवा वाळवंटांतील लुटारू सर्व जगाला अज्ञानी,

मूढ समजणारा, देहात्मभावनेनें मनोविकृत नि उन्मत्त बनलेला अरब सेनापति, इराणी आग्यावेताळ, तुर्क काळभैरव अथवा अफगाणी वाटमाऱ्या, हिंदुस्थानांतील नररक्ताभिलाषी पठाण सरदार अथवा असहाय्य प्रजेच्या प्रेतावर आपल्या ऐश्वर्याच्या इमारती उठवून निरपराधी रक्तानें लांच्छित झालेल्या सिंहासनावर ऐश्वर्याचें किळसवाणे भोगविलास भोगणारा मोंगलसम्राट या सर्वांनीं एकहजार वर्षांच्या जागतिक इतिहासांतील प्रत्येक पान रक्तानें भरून काढले. Alexendria व नालंद येथील ग्रंथसंग्रहालयें जाळून हजारों वर्षांचीं मानवांची ज्ञानसंपत्ति बेचिराख करणाऱ्या ज्ञानशत्रूंनीं रक्तपिपासा व भोगलालसा यांचा उच्चांक गांठून दाखविला. स्त्रिया आणि सुंदर कोंवळीं मुलें यांची आपल्या सैतानी अत्याचारी कामवासना पूर्तीसाठीं अत्यंत निर्लज्जपणें व निर्धृणपणें धूळधाण व लयलूट करणाऱ्या अमानुष संस्कृतीनें खरोखरीच मानवी चारित्र्याला कायमची काळोखी फांसून दाखविली. मानव जातीच्या इतिहासांवरील हा कलंक कधींहि धुतला जाणार नाहीं. जगाच्या प्रगतिचक्राला अनेक शतकांपर्यंत अवरोध करून मानववंशाची कधींहि भरून न येणारी हानि या नरपिशाच्चरूपी जानपदानें संस्कृतीचें मारेकरी बनून केली आहे. अनार्यवंशांच्या अज्ञानी-जानपदांच्या हातीं संघटना आणि सामर्थ्य या सारखीं तीव्र हत्यारें असलीं म्हणजे जगाच्या शांततेला व प्रगतीला किती धोका पोहोंचू शकतो याचें हें संस्मरणीय उदाहरण होय. केवळ भारतवर्षापुरतें बोलावयाचें झाल्यास स्थानेश्वराच्या शेवटच्या लढाईपासून १८५७ पर्यंत हिंदुस्थानचा संपूर्ण इतिहास गाळून टाकला तर हिंदुराष्ट्राचें प्राचीन काळ व अर्वाचीन काळ जोडून तयार केलेलें इतिवृत्त खरोखरच वास्तवतापूर्ण व भावी राजकारणाच्या दृष्टीनें मार्गदर्शक होईल. मध्यंतरीच्या काळांत भारतानें

जतन करण्याजोगी एकहि नवी गोष्ट प्राप्त करून घेतली नाहीं अथवा प्रगतिच्या मार्गावर एकहि पाऊल पुढें टाकलें नाहीं. हिंदु-जातीच्या त्या पारतंत्र्य कालाचा इतिहास युरोपच्या मध्ययुगीन इतिहासापेक्षां अधिक अंधकारमय आहे. अतिप्राचीन आर्यांच्या शाक्त-संस्कृतिसंपन्न राज्यांपासून स्फूर्ति घेऊन महाराष्ट्रांतील मूठभर मराठ्यांनीं राष्ट्रीय संघटन, धार्मिक तत्त्वज्ञानाची भूमिका, गतेति-हासाची प्रेरणा व मुत्सद्देगिरीची धार असलेलें लष्करी सामर्थ्य या साधनांनीं एका स्वतंत्र व विकसनशील राज्याची स्थापना केली ही एकच महान् व अपवादात्मक घटना त्या कालांत घडून अजरामर झाली. जानपदसंस्कृतीच्या अंगीभूत असलेलें शेंकडों दुर्गुण मराठ्यांच्या रक्तामांसांतून काढून टाकतांना पुष्कळदां स्वकीयांचाच रक्तपात करावा लागला. खाल्ल्या अन्नाचें इमान "दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा" अशी देशांतील फितूर नीचांनी दिलेली शरणागत पुण्यपापाच्या खुळचट भावनेने उराशी बाळगलेली अहिंसा, दौर्बल्य-आलस्यादि निवृत्तिगामी दुर्गुण या सर्वांचा नाश करून म्हणजेच जानपदसंस्कृतीचा नायनाट करून ज्ञान आणि सामर्थ्य या दुहेरी पायांवर शाक्तसंस्कृतीच्या नियमांनुसार राष्ट्राची उभारणी मराठ्यांनी करून दाखविली. संभाजीच्या वधानंतर जेमतेम संख्येने एक कोटी असलेल्या मराठ्यांनी दिल्लीच्या सहालक्ष सैन्याशी प्राणपणानें झुंज देऊन राष्ट्रीय स्वातंत्र्याचें संरक्षण केलें. त्या समयीं एक राजा आपलें सिंहासन टिकविण्याकरितां लढत नव्हता, सरदार आणि सेनापति स्वामिनिष्ठेच्या संकुचित कल्पनांनी अथवा आपल्या जहागिरी टिक-विण्याच्या स्वार्थी विचारानें लढत नव्हते व देशांतील बारगीर व शिलेदार भाडोत्री सैन्याप्रमाणें पगारादाखल मिळणाऱ्या मूठभर सुवर्ण तुकड्यासाठीं लढत नव्हते तर सबंध राष्ट्र, घर, दार, वित्त, प्राण

व अब्रू यानिशी स्त्रीपुरुष, अबालवृद्ध हें सर्वच देशांतील प्रत्येक गांव, प्रत्येक किल्ला व महाराष्ट्रांतील एकेक इंच जमीन हेरेन्फोल्क व लेबेन्स्त्रॉम या स्फूर्तिदायक तत्त्वाने व धर्माच्या सर्वगामी प्रेरणे-नुसार जीवनमरणाचें युद्ध लढत होतें; म्हणूनच अहमदनगरच्या शिबिरांत भग्न व विदीर्ण झालेल्या बादशाही सैन्याचे तुकडे गोळा करून व दिल्लीच्या एकेकाळी अपरंपार सुवर्णाने भरलेल्या पण आतां रित्या झालेल्या खजान्याच्या किल्ल्या सांवरित परकीय आक्रम-काला आपले भग्न मनोरथ पाहून हाय खावी लागली. एका विशिष्ट जातीचें चिकाटीखोर स्वातंत्र्यसंग्रामाचें हें अभूतपूर्व उदाहरण हिंदुस्थानच्या इतिहासांत केवळ निरुपमेय आहे. यापुढें लौकरच भाग्यवान् शाहूराजाला पेशव्यांच्या कर्तबगारीची जोड मिळाली व सूक्ष्मरुपाने गिरिकंदरांत उगम पावणाऱ्या सरितेचें समुद्र मिलना-पर्यंत भव्य नि विशाल तर स्वरुप होत जावें त्याप्रमाणें मराठी साम्राज्याचा विस्तार कटक ते कावेरी व मुंबई ते कटकपर्यंत वाढत गेला व प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें वर्धिष्णु होत जाणारी महाराष्ट्राची स्वातंत्र्य मुद्रा विश्ववंद्य होत गेली. यापुढें मात्र शाक्तसंस्कृति संस्था-पनेचें अनुसधान सुटलें व सैल समाज-रचना कसल्याहि प्रकारच्या सांस्कृतिक स्फूर्तीचा अभाव, अज्ञान, अंधश्रद्धा व गतानुगतिकत्व, लष्करी सामर्थ्याची कमतरता व वेळेवर संजीवनी न मिळाल्यामुळें जीवन-शक्तीचा झालेला ऱ्हास या योगें राष्ट्र दुर्बल बनलें, जानपद संस्कृतीचा उठाव झाला, **बृहन् महाराष्ट्रांतील** व परप्रांतीय जानप-दांच्या प्रतिगामी विरोधाची विषारी तीव्रता जाणवू लागली आणि संस्कृति भ्रष्ट झालेलें **मराठ्यांचें** राज्य आपल्यापेक्षां अतिश्रेष्ठ अशा पाश्चिमात्य शक्तींशीं सन्मुख होतांच एक क्षणांत कोलमडून पडलें. या नंतर १८५७ सालीं शेवटच्या पेशव्यानें **झांशी**ची **लक्ष्मीबाई**

व **तात्याटोपे** यांच्या सहाय्यानें केलेला निर्वाणीचा प्रयत्न, साधन वैगुण्य, बल विषमता व राष्ट्रीय पाठिंब्याचा अभाव यामुळें बहुमोल बलिदान देऊनहि अयशस्वी झाला. १९ व्या शतकाच्या शेवटीं वाणिज्य-राष्ट्राच्या **चाणक्य नीतीनें** आपल्या बौद्धिक दासजनांच्या वेड्यामूक हालचालींना वाव मिळवून देण्यासाठीं Indian National Congress नांवाची संस्था स्थापून दिली. सत्ताधाऱ्यांच्या सोईची हिंदुस्थानी राष्ट्र-वादाची एक अशास्त्रीय कृत्रिम कल्पना, तात्त्विक भूमिका म्हणून देशभक्तांच्या माथीं मारली. वास्तविक असलें एक राष्ट्रीयत्व राज्यशास्त्राच्या दृष्टीनें तर्कशुद्ध आहे किंवा नाहीं व पुढें कधीं काळी भारतीयांनी दीर्घ प्रयत्नानें याची प्रस्थापना करावी किंवा नाही हा प्रश्न बाजूला ठेवला तरी जें मुळांत अस्तित्वांत नाही तें गृहीत कृत्य म्हणून उराशीं बाळगण्यानें **हिंदु** पुढाऱ्यांची गेल्या पन्नास वर्षांत किती दिशाभूल झाली हें इतक्या वर्षांच्या व्यापक राजकीय चळवळी नंतर **हिंदु** समाजाची जी दुर्बल, परधार्जिणी, पर प्रत्ययनेय, विघटित व अधःपतित अवस्था झाली आहे, यावरून सहज कळून येण्यासारखें आहे. आजचें **हिंदूंचें** राजकारण सतत शरणागतीचें आत्मघाताचें व मानहानीचें आहे. या सर्व दोषांचें एकमेव कारण जानपदांच्या असत्प्रवृत्तीचें सूत्र हाती घेऊन आपल्या मायावी मंत्रांच्या मोहिनीनें आपल्या सुरावर जानपदांना नाचविणाऱ्या जानपद-संस्कृतींतून वर आलेल्या स्वार्थसाधू गारुड्यांच्या हातांत देशाचें राजकारण गेलें हेंच होय. या जानपद-संस्कृतीचा नायनाट करून हें दुर्बलांचे राजकारण क्षणांत नष्ट करून **हिंदू राष्ट्रानें** वीर श्रेष्ठांच्या नेतृत्वाखालीं प्रभावी राजकारण लढल्याशिवाय भारताचा उद्धार होणें अशक्य आहे. प्राचीन **आर्यांच्या**

इतिहासाचें सूत्र हाती घेऊन आजच्या राजकीय संग्रामाची मुहूर्त-मेढ रोविली पाहिजे तरच या संग्रामांत यशस्वी होऊन उज्वल भविष्य कालाचें नियोजन करण्याचें भाग्य आपल्या वाट्यांस येईल. ज्या राष्ट्रांत **चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** यांच्या सहकार्यानें परकीयांचा पराभव करून देशांतून त्यांचें उच्चाटन करणारे शाक्त संस्कृति-संपन्न **मौर्य** राज्य पाटलिपुत्रांत स्थापन होऊं शकलें, **उज्ज**-यिनीला **चंद्रगुप्ताचें** वैभवशाली गुप्त साम्राज्य अस्तित्वांत आलें व अखंड भारताचा विजेता सम्राट म्हणून **समुद्रगुप्तानें** अश्वमेध यज्ञ साजरा केला. **वीर यशोधर्मननें** अनेक वर्षांपासून सत्ताधारी बनून देशांत दबा धरून बसलेल्या परकीय **शकांचा**, राष्ट्रीय स्वातंत्र्याचा रणयज्ञ पेटवून पुरा निःपात केला व भारताची भूमि परकीयांच्या संपर्कापासून निष्क-लंक ठेविली त्यांना या देशांत एका विजिगीषु ज्ञान-सामर्थ्य-संपन्न, वैभवशाली व शाक्त-संस्कृतीचा आविष्कार करणारे प्रभावी स्वतंत्र राज्य वीर श्रेष्ठांच्या नेतृत्वाखालीं स्थापन करतां येणें कां ंच कठीण नाही. जानपद-संस्कृतीच्या सर्व दोषांपासून अलिप्त झालेली **हिंदु संस्कृति** नव्या स्वरूपांत या स्वतंत्र भारतांत प्रकट होऊन अखिल मानव जातीचें उन्नति विकासाच्या ध्येयाकडे मार्गदर्शन करील हा आशावाद आपल्या गतेतिहासाकडे पाहतां निव्वळ काल्पनिक नि काव्यमय ठरणार नाहीं हें **शालिवाहनाच्या**, पुलिकेशीच्या **व शिवाजीच्या महाराष्ट्रा**ला तरी सांगणें नकोच.

---